*राष्ट्रीय चरित्र माला*

# सयाजीराव गायकवाड

**व्ही. के. चावडा**

अनुवाद

**स. गं. मालशे**



**नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया**

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

भारताच्या पश्चिम किनारपट्टीवर, आताच्या गुजरात राज्यात अगदी अलीकडच्या काळापर्यंत बडोदे म्हणून संस्थान विद्यमान होते. स्वातंत्र्योत्तर काळात जुन्या मुंबई राज्यात ते 1949 मध्ये विलीन झाले. हे संस्थान महाराष्ट्रीय संस्थानिकाच्या आधिपत्याखाली होते आणि या प्रदेशाच्या अठराव्या व एकोणिसाव्या शतकांच्या इतिहासात त्यांचे मूळ व कूळ शोधता येते. लुटीच्या हेतूने गुजरातेत मराठ्यांचे आक्रमण होताच अगोदरच प्रवाही असलेली तेथील राजकीय परिस्थिती अधिकच अस्थिर झाली. गायकवाडांनी आपले राज्य गुजरातेत स्थापन केले, तेव्हा तेथे कायमचा रहिवास करावा असा त्यांचा मनोदय होता, असे दिसून येते; पण आपले वर्चस्व प्रस्थापित करू पाहणाऱ्या अनेक सत्तांपैकी ते एक असल्याने, तेथे शांतता नांदू शकली नाही. एकोणिसाव्या शतकाच्या प्रथम पादात इंग्रज सार्वभौम ठरल्यावरच काय ती तेथे शांतता नांदू लागली. इंग्रजांनी आपल्याबरोबर राज्य व राज्यपद यासंबंधीच्या आधुनिक संकल्पना आणल्या. बडोद्याचे एकामागून एक असे राजे या आधुनिक संकल्पनेच्या चौकटीत बसत नाहीत, हे दिसून आल्यावर शेवटी त्यांनी आपल्या कल्पनेनुसार प्रतिनिधी तयार केला आणि तो म्हणजे तिसरे सयाजीराव हे होत. 1875 साली सयाजीराव बडोद्याच्या गादीवर बसले. सयाजीरावांपासून बडोद्याच्या व काही प्रमाणात गुजरातच्या इतिहासाचा आधुनिक कालखंड सुरू होतो.

इंग्रजांच्या अगदी अपेक्षेपलीकडे, त्यांच्यापेक्षाही वरचढ ठरावा असा राजा सयाजीरावांच्या रूपाने त्यांना भेटला. सयाजीराव केवळ स्वतंत्र वृत्तीचेच होते असे नव्हे, तर प्रगतीच्या वाटचालीत हिंदुस्थान सरकारलाही मागे टाकून त्यांनी आघाडी मारली. इतकेच नव्हे, तर इंग्रजांना मोठे नवल वाटावे, किंबहुना वैषम्यही वाटावे, असे ते राष्ट्र-उभारणी करणारे थोर पुरुष ठरले. सयाजीरावांच्या त्रेसष्ट वर्षांच्या प्रदीर्घ कारकीर्दीत बडोदा या देशी संस्थानाचे व गायकवाडांचे नाव जगाच्या अनेक भागांत पसरले. त्यांच्या राजवटीत संस्थानाने अशी सर्वांगीण प्रगती केली की, अहमदाबादला गुजरातची आर्थिक राजधानी म्हटल्यास, बडोदे ही त्यांची सांस्कृतिक राजधानी ठरावी. प्रजेने

सयाजीरावांवर प्रेम केले आणि त्यांनीही प्रजाजनांवर प्रेम करून त्यांची काळजी वाहिली. त्यांनी जनजीवनात सुधारणा घडवून आणली आणि सर्वोत्तम जीवनाचे अभिवचन दिले. त्याहून आश्चर्य असे की, एक देशी संस्थानिक एवढेच स्थान असूनही हिंदी लोकांना स्वातंत्र्यलढ्याच्या संदर्भात अधिक सन्मानाची वागणूक दिली जावी, अशी मागणी करण्यास ते कचरले नाहीत. अर्थात या बाबतीत त्यांच्या म्हणून काही मर्यादा होत्याच. ब्रिटिशांच्या चष्म्यातून 'राजद्रोही' ठरणाऱ्या चळवळीला साहाय्य करीत असल्याचा वहीम त्यांच्या बाबतीत राज्यकर्त्यांना वारंवार व्यक्त करावासा वाटला, ही एकच गोष्ट राष्ट्रकार्याविषयी त्यांना मनोमन आस्था वाटत होती, हे सिद्ध करण्यास पुरेशी आहे. साहजिकच, स्वतंत्र भारताच्या भावी वाटचालीचा मार्ग उजळणाऱ्या अग्रणींपैकी ते एक ठरले.

**व्ही. के. चावडा**

## एक

# गुजरातेत मराठ्यांचे आगमन

पहिल्या मुसंडीसरशी मराठ्यांचा गुजरातेत शिरकाव झाला, तोच मुळी मराठी साम्राज्याचे संस्थापक शिवाजीमहाराज यांच्याकडून. मोगल सलतनतीच्या दक्षिण गुजरातमधील भरभराटीस आलेले सुरत शहर त्यांनी प्रथम इ. स. 1664 मध्ये व पुन्हा 1670 मध्ये लुटले. अशा रीतीने हा पहिला संबंध काही फारसा सुखावह नव्हता. यात शिवाजीमहाराजांचा दुहेरी हेतू होता. एक तर अचानक हल्ला करून भरपूर लूट गोळा करावी; शिवाय मोगल साम्राज्याचे गुजरातेतील हे शेपूट पिरगाळून पुढे कुरघोडी करीत जावे. शहरातून त्यांना यथेच्छ लूट मिळाली; पण त्याबरोबरच ईस्ट इंडिया कंपनीच्या सुरतेतील वखारीमधील इंग्रजांच्या ठाम प्रतिकाराशी मुकाबला अपेक्षितच होता. पण इंग्रजांना न चाळविण्याचे चातुर्य त्यांनी दाखविले. सव्वाशे वर्षे लोटल्यावर अशाच गुणांच्या बळावर इंग्रजांच्या प्रतिनिधींनी 'मैत्रीचा सहकार' अंगीकारून गुजरातमधील विखुरलेल्या विभागांत आपले स्थान स्थिर आणि बळकट केले. काठेवाडी द्वीपकल्प वगळता ब्रिटिश आणि गायकवाड यांनी गुजरातेतील प्रदेश आपापसात वाटून घेतला, पण सव्वाशे वर्षांचा हा कालखंड मात्र सरळ नव्हता, ताणतणावाचा होता. गुजरातच्या जनतेला हा काळ न संपणाऱ्या हालअपेष्टांचा आणि लाचारीचा व म्हणून कसोटीचा होता, एवढे थोडक्यात म्हणता येईल. एका लेखकाने गुजरातची 'काळोखी रात्र' असे त्याचे वर्णन केलेले आहे. मराठे सरदार, मोगल सुभेदार आणि स्थानिक वतनदार यांनी विश्वासघात, अतिलोभी लुटारूपणा आणि दुटप्पीपणा यांबाबत सत्तास्पर्धेपोटी अगदी कळस गाठला होता; तर जबरदस्तीची वसुली आणि जीवितवित्ताविषयी कमालीची बेदरकारी यांच्या टाचांखाली बेजार झालेली जनता कण्हतकुंथत होती.

या टोकाच्या मुलखात मोगल बादशहांची सत्ता शिथिल राहिल्याने मराठ्यांना आपले हातपाय पसरण्यास हळूहळू सहज वाव मिळाला. इ. स. 1672 मध्ये पारनेरा किल्ल्यावर अचानक हल्ला करून त्यांनी बागलाण काबीज केले. गुजरातमधून महाराष्ट्रात जाण्याचा राजमार्ग ताब्यात राखण्याच्या दृष्टीने मोक्याचा असणारा साल्हेरचा किल्ला मराठ्यांचा सेनापती मोरो त्र्यंबक पिंगळे याने जिंकला. मराठ्यांचा आणखी एक सेनानायक

हंबीरराव मोहिते याने इ. स. 1675 मध्ये नर्मदा पार करून भडोचपर्यंत दौड केली. याच पद्धतीने तिसरा सेनापती खंडेराव दाभाडे याने गुजरातेत राबता चालू ठेवला आणि तेथे कायमची वसती करण्याचा मार्ग सुकर केला. इ. स. 1699 मध्ये, शिवाजीमहाराजांचा पुत्र राजाराम याने सुपरिचित चौथाई व सरदेशमुखीच्या वसुलीसाठी दाभाड्यांची बागलाणात रवानगी केली. खंडणी वसूल करीत ते पुढे सुरतेपर्यंत पोहोचले. मोगलांच्या आपापसातील दुहीमुळे धीर चेपून दक्षिणेतील औरंगजेबाचे वाढते दडपण अन्यत्र वळविण्याच्या उद्दिष्टानेसुद्धा दाभाड्याने पुढे सहा वर्षांनी नर्मदेपलीकडे मोगल सुभेदाराला रोखून धरले, त्याचा पराभव केला व तो थेट काठेवाडपर्यंत चालून गेला. बऱ्हाणपूर ते गुजरातपर्यंत आपली संरक्षक फळी मजबूत राखणे महत्त्वाचे आहे, हे त्याच्या आता ध्यानात आले. सोयीचे पडेल त्याप्रमाणे या वा त्या मोगल सुभेदाराला साहाय्य करण्याचे धोरण खंडेराव दाभाड्याने अंगीकारले. या मोहिमांत दमाजी गायकवाडाने त्याचा समर्थपणे पाठपुरावा केला. बडोद्याच्या इतिहासात पहिले दमाजीराव म्हणून ओळखल्या जाणाऱ्या या सरदाराच्या शौर्याचा आणि गुणचातुर्याचा गौरव, त्याला शाहू छत्रपतींनी इ. स. 1721 मध्ये 'समशेर बहादूर' हा किताब देऊन व नायब म्हणजे दुय्यम सेनापती म्हणून नेमणूक करून, केला. 'समशेर बहादूर' हा किताब सत्ताधारी गायकवाडांनी अभिमानपूर्वक कायम ठेवला; कारण त्यांना त्यायोगे तदुत्तरकालीन पेशव्यांच्या बरोबरीचे स्थान प्राप्त झाले होते.

यानंतर अल्पावधीत खंडेराव दाभाडे आणि दमाजी गायकवाड मरण पावले सेनापतीपदी त्र्यंबकराव दाभाडे हा आला. दमाजीला औरस पुत्र नसल्याने त्याचे पद पुतण्या पिलाजीराव याच्याकडे गेले. पुढे पिलाजीरावाचे वंशजच प्रथम सोनगड येथे, नंतर पाटणला व अखेरीस बडोदे येथे सत्ताधीश झाले. त्यांचा हा 'प्रवास' अगदी निष्कंटक रीतीने झाला, असे नाही. दाभाड्यांनी इ. स. 1724-25 मध्ये खानदेशच्या सरहद्दीवरील नवापूरच्या फौजेचे नेतृत्व पिलाजीकडे सोपविले, पण त्या मुलखावर हक्क सांगणाऱ्या कंठाजी कदमबांडे या मराठा सरदाराने त्याला रोखले, तेव्हा सोनगडनजीक डोंगराळ मुलखाचा आश्रय घेणे त्याला भाग पडले व सोनगडलाच त्याने आपले मुख्य ठाणे वसवले. 'गायकवाडांच्या भाग्याचा पाळणा' सोनगडला प्रथम हालला, असे मानले जाते. चौथाई-सरदेशमुखी हक्कांच्या वसुलीसाठी गुजरातच्या परिसरातील प्रदेशात मुलुखगिरी करताना तेथील सत्तास्पर्धेच्या भोवऱ्यात पिलाजीराव स्वतःच अडकला. कधीच न संपणारी भीषण यादवी तिथे चालू होती. तदनंतर माजलेल्या बजबजपुरीतून लोक आणि घटना यांचा सुसंगत माग काढणे मुष्कलीचे आहे. मुसलमान आणि मराठे हे दोघेही मित्रत्व-शत्रुत्वाच्या बाबतीत बाजू इतके वरचेवर पालटीत होते, की मन भांबावून जावे. सरतेशेवटी इ. स. 1731 च्या भिलापूरच्या लढाईत या प्रकरणाचा एकदाच सोक्षमोक्ष लावून घ्यावा लागला. पिलाजीने आपल्या धन्याची, सेनापतीची निष्ठेने साथ केली.

पेशव्याने जबरदस्त तडाका लगावून आपल्या विरोधकांचा पुरता मोड केला. सेनापती दाभाडे लढाईत मारला गेला व पिलाजीने पळ काढून मोठ्या शर्थीने आपला जीव बचावला.

आपल्या विजयाचा पुरेपूर लाभ उठविण्यापेक्षा पिलाजीला आपल्या पक्षाला वळविणे हे पेशव्यांनी राजकीयदृष्ट्या अधिक धोरणीपणाचे मानले. लढाईत कामास आलेल्या त्र्यंबकराव दाभाड्याच्या सेनापतीपदी त्याचा अल्पवयीन पुत्र यशवंतराव हा आला व पिलाजीला 'सेना खासखेल' हा आणखी किताब देण्यात येऊन तो सेनापतीचा मुतालिक बनला. यानंतरच्या काळात दाभाडे घराण्यात कोणीच कर्तबगार पुरुष न निपजल्याने गुजरातेत गायकवाडांचेच प्रस्थ अधिक वाढत गेले. मात्र गायकवाड हे दाभाडे घराण्याचे जणू उजवे हात असे विश्वासू सेवक असल्याने सातारकर छत्रपतींविषयी पक्षपाती निष्ठा आणि पेशव्यांविषयी दुस्वास हा दाभाड्यांचा वारसाही त्यांच्याकडे चालत आला.

आता पिलाजीने मोगल सुभेदार जोधपूरचा महाराजा अभयसिंग याच्याविरुद्ध चाल केली. पण सरळ सामन्यात पिलाजीचा पराभव करणे अशक्य असल्याने मोगल सुभेदाराने विश्वासघाताचा आश्रय करून इ. स. 1732 मध्ये डाकोर येथे पिलाजीचा खून करविला आणि त्याच्या हस्तकांच्या ताब्यात असणारे बडोदे शहर बळकावले. तसेच शेरखान बाबी याच्याकडे शहराचा अमल सोपविला. सोनगडच्या आश्रयास गेलेला दुसरा दमाजीराव हा पिलाजीच्या जागेवर आला व लवकरच त्याचे दैव उघडले. इ. स. 1734 मध्ये फौजफाटा घेऊन तो बाहेर पडला आणि शेरखान बाबीकडून त्याने बडोदे जिंकून घेतले. तेव्हापासून हे शहर गायकवाडांच्या ताब्यात आले, ते कायमचे. दरम्यान मोगल दरबारातील राजकारणामुळे अभयसिंगाला परत बोलावण्यात आले होते; पण खुद्द जोधपुरातच अंतर्गत गडबड माजल्याने तो जोधपूरला निघून गेला. त्याच्या जागी मोमीनखान याची सुभेदार म्हणून नेमणूक झाली. गुजरातमध्ये येताच अभयसिंगाचे लोक आपल्या मुलखावरील कब्जा सोडण्यास मुळीच तयार नाहीत, हे त्याला आढळून आले. म्हणून अहमदाबाद शहरातून अभयसिंगाच्या लोकांना हुसकून लावण्यासाठी मोमीनखानाने दमाजीचीच मदत मागितली. या मदतीच्या मोबदल्यात दमाजीला अहमदाबाद व विरमगाव ह्या जिल्ह्यांचा अर्धा महसूल देण्याचे ठरले. त्यामुळे दमाजीचे सामर्थ्य वाढत जाऊन त्याची प्रतिष्ठा उंचावली.

दमाजीने गुजरातपुरत्याच आपल्या हालचाली मर्यादित ठेवल्या असत्या, तर तो सुखात राहिला असता. पण तसे व्हावयाचे नव्हते. पेशवे घराण्याच्या वाढत्या सत्तासमृद्धीकडे तो सरळ मनाने पाहू शकत नव्हता. इ. स. 1749 मध्ये छत्रपती राजाराम याची विधवा पत्नी ताराबाई हिच्या पक्षास मिळून त्याने पेशव्यांशी विरोध आरंभिला. पण वडिलांप्रमाणे त्यालाही पराभवाचा चांगलाच धडा मिळाला आणि पुण्यात तुरुंगात खितपत पडावे लागले. गुजरातेतील मराठी सत्तेलाच ग्रहण लागण्याची पाळी न येती,

तर दमाजीची सुटकाही पेशव्यांनी केली नसती. मुसलमानांनी पुन्हा डोके वर काढून त्रास मांडला होता. तुरुंगाच्या नामुष्कीतून सुटण्याचा अन्य मार्गच नसल्याने दमाजीलाही पेशव्यांशी सलोखा करण्यावाचून गत्यंतर नव्हते. इ. स. 1752-53 मध्ये पेशवे आणि गायकवाड यांच्या दरम्यान सलोख्याचा करार झाला. गायकवाड घराण्याच्या दृष्टीने हा करार म्हणजे एक महत्त्वाचा टप्पाच ठरला. पेशवे आणि गायकवाड यांच्यामधील बेबनाव या कराराने संपुष्टात आला आणि भावी काळात उभयतांनी सहकार्याने काम करण्याचे ठरविले. या करारान्वये पुढे घडून आलेल्या देवाणघेवाणीत बडोदे राज्यात परिचित असणारी अनेक शहरे गायकवाडांच्या ताब्यात आली. दक्षिण गुजरातमधील खुद्द बडोदे, नवसारी आणि गणदेवी, तसेच उत्तर गुजरातेतील विजापूर, पाटण, विसनगर, सामी, मुजपूर, वडनगर, खेरालू, राधनपूर व सिधपूर या काही शहरांचा अंतर्भाव होता. शिवाय अहमदाबाद व सुरत या शहरांच्या महसुलातही त्यांना हिस्सा मिळाला.

इ. स. 1761 मध्ये पानिपतचा घोर अनर्थ ओढवला. अफगाण सरदार अहमदशहा अब्दाली याने,हिंदुस्थानात आपले वर्चस्व प्रस्थापित करू पाहणाऱ्या मराठ्यांच्या प्रयत्नाला जबरदस्त खो दिला. या युद्धात अनेकानेक मराठा सैनिकांना वीरमरण लाभले. पराभवाची चिन्हे दिसताच इतर अनेकांप्रमाणे दमाजीनेही रणातून पळ काढला व तो गुजरातेत परतला. आपला दरारा अद्याप कायम आहे, हे दाखविण्यासाठी ईदार व राजपिपळा ही राज्ये जिंकून त्यांना त्याने आपले मांडलीक केले. पुढे काठेवाडात दौड मारून त्याने अमरेली जिल्हा जिंकला. नजीकच्या लाठी या राज्याच्या राजकन्येशी विवाह करून त्याने हुंड्यादाखल काही खेडी मिळविली. या खेड्यांना पुढे दमनगर असे नाव देण्यात आले. हिंदूंची पवित्र स्थाने सोडवून ताब्यात घेण्याच्या मराठ्यांच्या प्रस्थापित धोरणानुसार द्वारका, तसेच सुप्रसिद्ध सोमनाथ मंदिर असणाऱ्या प्रभासक्षेत्राचा परिसर त्याने आपल्या अमलाखाली आणला.

बाळाजी बाजीराव पेशव्यांच्या मृत्यूनंतर पेशवे घराण्याविषयीचा दमाजीचा द्वेष पुन्हा उफाळून आला. इ. स. 1752 मध्ये पेशव्यांशी सक्तीने कराव्या लागलेल्या तहनाम्याबद्दल त्याच्या मनात कायमची रुखरुख असल्याने तो असमाधानी होताच. तेव्हा माधवरावाला पेशवाई मिळाल्यावर त्याचा चुलता रघुनाथराव (राघोबा) याने गादीवर हक्क सांगण्यास प्रारंभ करताच दमाजीने आपला पुत्र गोविंदराव यास त्याच्या मदतीसाठी पाठविले. पण राघोबाच्या पक्षाचा पराभव होऊन त्या सर्वांचीच पुण्याला तुरुंगात रवानगी झाली. गोविंदरावाची सुटका करण्यासाठी पेशव्यांनी भारी रकमेची मागणी केली. दमाजीला ती रक्कम तर द्यावी लागलीच; पण वर नवीन करारास तयार होणे भाग पडले. पण करारावर सही होण्यापूर्वीच दमाजी पाटणला इ. स. 1766 मध्ये मरण पावला. यापूर्वीच त्याने आपले मुख्य ठाणे सोनगडहून पाटण येथे इ. स. 1766 मध्ये हलविले होते. असे म्हटले जाते : "पिलाजीरावाने गायकवाडांना थोर प्रतिष्ठेचे नाही, तरी मानाचे

स्थान मिळवून दिले. त्याच्या कार्याचा वारसा दमाजीकडे चालत आला व स्वतःचे स्वतंत्र राज्य उभारून त्याने तो उचितपणे पुढे चालविला."

प्रस्तुत चरित्राचे नायक तिसरे सर सयाजीराव गायकवाड हे दुसऱ्या दमाजीरावाच्या प्रतापराव या धाकट्या भावाचे वारसदार होते. इ. स. 1761 नंतर गायकवाडांची ही धाकटी पाती अनेक पिढ्या दुर्दैवाच्या फेऱ्यात सापडून अंधारात मागे पडल्यागत झाली होती. सुमारे शतकभराच्या काळात इ. स. 1875 मध्ये भाग्यचक्र फिरले आणि हे घराणे फिरून एकदा नावारूपास आले.

चरित्रकथेचे मुख्य सूत्र आपण हाती घेऊ या. नवलाईची गोष्ट म्हणजे पेशवे आणि गायकवाड या दोन्ही घराण्यांना अगदी एकाच वेळी, एकाच प्रकारची विकृती जडल्यासारखी झाली. ती म्हणजे वारशासंबंधी भांडण. दमाजीला तीन बायका असून गोविंदराव, पहिला सयाजीराव, फत्तेसिंहराव व मानाजीराव असे एकूण चार पुत्र होते. गादीच्या हक्कासाठी झगडा सुरू झाल्यानंतर नशीबाची गोष्ट अशी की, या चारी पुत्रांना कधी ना कधी सत्तेचा उपभोग घेता आला. पुण्यातसुद्धा माधवराव पेशव्यांचे अकाली निधन होऊन गादीवर आलेल्या भावाचा, नारायणरावाचा खून झाला होता. राघोबाने गादीवर पुन्हा हक्क सांगण्यास सुरवात करून नारायणरावाच्या अल्पवयीन मुलाच्या वारसदारीविरुद्ध तंटा उपस्थित केला होता. पुण्यातील ही गोंधळाची परिस्थिती गायकवाडांच्या दृष्टीने सुप्त वरदानच ठरली होती. या परिस्थितीमुळे बडोद्याची सत्ता अधिक दुर्बल होण्याचे टळले. गोविंदराव हा याच काळात पुण्यात कैदेत होता, तेव्हा पहिला सयाजीराव या आपल्या बंधूच्या साहाय्याने फत्तेसिंहरावाने बडोदे शहरावर आपला अमल बसविला आणि इथून पुढे बडोदे हेच गायकवाडांचे प्रमुख ठाणे बनले.

पश्चिम हिंदुस्थानात असे हे नाट्य घडून येत असता मुंबईकर इंग्रज आपले पंख सावरीत काळजीपूर्वक त्या नाट्याचे निरीक्षण करीत होते. आपण बाळगलेले स्वप्न साकार होण्याची शक्यता बहुधा त्यांना त्या नाट्यात दिसली असावी. वसई, साष्टी आणि सुरत परिसरातील मुलूख बळकावण्याची मनीषा ते दीर्घ काळ बाळगून होते. इ. स. 1772 मध्ये भडोच जिंकल्यावर इंग्रज एकदम प्रकाशात आले. त्याच वर्षी गोविंदराव आणि पेशवे यांच्या संभाव्य युतीविरुद्ध फत्तेसिंहरावाने इंग्रजांकडे साहाय्य मागितले होते; पण त्यात त्याला यश आले नाही. त्यानंतर गायकवाड घराण्यावर एकाएकी मृत्युचा घाला पडला. इंग्रजांची मदत मिळविण्याच्या दृष्टीने काही अधिक हालचाल होण्यापूर्वीच किंवा इंग्रजांचे स्वप्न साकार होण्यापूर्वीच गायकवाडांचे तीन कर्तबगार पुरुष एकामागून एक मृत्युमुखी पडले. इ. स. 1789 मध्ये फत्तेसिंहरावाचे निधन झाले, त्याच्यापाठोपाठ इ. स. 1792 मध्ये पहिला सयाजीराव व इ. स. 1793 मध्ये त्याचा मुतालिक मानाजीराव मरण पावला. यामुळे गोविंदरावाला कोणी घरगुती प्रतिस्पर्धीच उरला नाही.

ब्रिटिशांच्या डावपेचांची कल्पना पेशव्यांना आधीच आलेली होती. म्हणून

गोविंदरावाला 'सेना खासखेल' ही किताबत बहाल करण्यापूर्वी त्यांनी आपल्या येणे असलेल्या रकमांची मागणी केली. शिवाय तापीच्या दक्षिणेकडील सर्व मुलुख आणि सुरतेच्या महसुलापैकी गायकवाडांचा वाटा आपल्याला द्यावा, असा आग्रहही पेशव्यांनी धरला. आपले स्वप्न धुळीस मिळणार, हे ओळखून इंग्रजांनी त्वरित हालचाली केल्या. त्यांनी साल्पे येथील तहाची (ज्याला ते साल्बाईचा तह म्हणत) पुन्हा जाणीव देऊन पेशव्यांना असा मुलुख तोडून देण्यास प्रतिबंध केला. इंग्रजांची नाराजी ओढवून घेणे पेशव्यांना परवडणारे नसल्याने त्यांनी निमूटपणे माघार घेतली. गुजरातमधील (पुण्याच्या) सत्तेला आणि प्रतिष्ठेला आणखीही एक हादरा बसला; कारण गोविंदराव गायकवाडाने पेशव्यांचा अहमदाबाद येथील प्रतिनिधी आबा शेलूकर याला तेथून हाकलून दिले व वार्षिक पाच लक्ष रुपयांच्या भाडेपट्ट्याने अहमदाबाद क्षेत्र स्वतःकडे लावून घेतले. अपेक्षा धरल्यावाचून काही इंग्रजांनी गायकवाडी सत्तेला जीवदान दिले नव्हते. गोविंदराव इ. स. 1800 मध्ये निधन पावला; पण तत्पूर्वीच त्याने इंग्रजांना फार काळापासून हवा असलेला चौऱ्याशी परगणा व सुरतेच्या चौथाईमधील आपला हिस्सा सुपूर्द केलेला होता. त्यांच्या भावी शाश्वतीचा विसारा म्हणूनच हा देकार घडून आलेला होता.

शतक उलटत असताना मात्र बडोद्यातील घडामोडीत इंग्रजांचे हात लांबवर पोहोचले होते. गोविंदरावानंतर त्याचा नाकर्ता पुत्र आनंदराव गादीवर आला. त्यामुळे सत्ता बळकावण्याची संधी पुनश्च निर्माण होऊन एका बाजूला दिवाण रावजी अप्पाजी फणसे व दुसऱ्या बाजूला गादीच्या वारशासाठी पुढे आलेले इतर हक्कदार अशी रस्सीखेच सुरू झाली. इंग्रजांच्या मदतीने पारडे आपल्या बाजूला झुकण्याची खात्री वाटत असल्याने उभय पक्षांत वाटेल त्या अटी मान्य करून त्यांचे साहाय्य मिळविण्यासाठी अहमहमिका सुरू झाली. स्वतःला सोयीस्कर वाटेल तेव्हा पेशवेही हस्तक्षेप करीत राहिले. 'तह व तरतुदी, युती व प्रतियुती, हिस्से, खंडण्या आणि गहाणखते यांचा एकच गदारोळ' दोन वर्षेपर्यंत चालू होता. त्यातून तीन गोष्टी उधसून स्पष्ट झाल्या. बडोदा संस्थानाला निश्चित आकार प्राप्त झाला, त्याचे सत्ताधारी म्हणून गायकवाडांना मान्यता मिळाली, तसेच पुणे दरबाराची सत्ता केवळ गुजरातेतच नव्हे, इतरत्रही झपाट्याने ओसरू लागली. पुण्यात आणि बडोद्यात इंग्रजच सार्वभौम म्हणून प्रस्थापित झाल्याचा पुरावा हवा असेल, तर तो इ. स. 1802 च्या वसईच्या तहाने सादर केला. गुजरातसंबंधातील निर्णायक मध्यस्थाची पेशव्यांची भूमिका आता इंग्रजांनी पटकावली. इंग्रजांच्या सत्तेचे दृश्य प्रतीक म्हणून मेजर (पुढे कर्नल) अलेक्झांडर वॉकर याची बडोद्याच्या दरबारी रेसिडेंट म्हणून नेमणूक झाली व रेसिडेंटच अनेक वर्षे संस्थानचा खराखुरा सत्ताधारी होता.

एकदा बडोद्यात पाय रोवताच वॉकरने परस्परांतील संबंध पक्के करण्याचा प्रयत्न सुरू केला. पूर्वीचे सारे करार एकत्र करण्यात येऊन निश्चित स्वरूपाच्या नव्या तहनाम्यावर 21 एप्रिल 1805 रोजी शिक्कामोर्तब झाले. त्याअन्वये गायकवाडी राज्याच्या संरक्षणार्थ

एक शिस्तबद्ध फौज ठेवण्याची तरतूद झाली व तिच्या खर्चासाठी तैनात म्हणून काही जिल्हे तोडून देण्यात आले. खेडा, चौऱ्याशी व चिखली ही अगोदरच तोडून दिलेली होती, त्याशिवाय ही नवी तरतूद करण्यात आली होती. पुढे अहमदाबाद क्षेत्रावर पाणी सोडल्यावर आता बडोदा संस्थानाचा अंतिम नकाशा अधिक स्पष्ट झाला. इ. स. 1805 च्या तहनाम्यानुसार बडोद्याने आपला एक सार्वभौम हक्क इंग्रजांना सुपूर्द केला होता. तो म्हणजे परराष्ट्रीय संबंधांचा. पेशवे किंवा इतर सत्ताधीश यांच्याशी असलेले तंटे परस्पर न मिटविण्याचेही मान्य करण्यात आले. एकमेकांच्या प्रजाजनांना एकमेकांच्या संमतीशिवाय थारा न देण्याचे वा नोकरीत न ठेवण्याचेही उभयतांत ठरविण्यात आले. ही सर्व बंधने पत्करून आनंदरावाचा बंधू दुसरा फत्तेसिंहराव इ. स. 1806 साली राज्याचा मुखत्यार (रीजंट) बनला. पुढे इ. स. 1818 साली त्याचे निधन झाले. पण तोपर्यंत अंतर्गत आणि बहिर्गत धोक्यापासून संरक्षणाचा अनिवार्य मोबदला म्हणून इतर अनेक शर्ती इंग्रजांनी घातल्या होत्या.

बडोदे सोडीपर्यंत वॉकरने, संस्थानच्या प्रत्यक्ष अस्तित्वालाच धोकादायक ठरणाऱ्या अनेक गंभीर अरिष्टांपासून संस्थानाला वाचवून त्याची मोठीच सेवा केली. आनंदरावाचा सावत्रभाऊ कान्होजीराव आणि त्याचा आणखी एक आप्त कडीचा जहागीरदार मल्हारराव या दोघांनी गादीवर हक्क सांगण्यास सुरवात करून तदनुसार कारस्थाने सुरू केली होती, पण त्यांचा इंग्रजांच्या साहाय्याने पराभव करण्यात आला व त्यांना पुढे मद्रास व मुंबई येथील तुरुंगात ठेवण्यात आले. अरब शिबंदीने पैशाचा तगादा लावला असता वॉकरने ब्रिटिशांची हमी देऊन मुंबई सरकारकडून तसेच स्थानिक शेटसावकारांकडून कर्जफेडीची व्यवस्था केली. देणी दिल्यावरही अरबांनी दंगा चालूच ठेवला, तेव्हा वॉकरने त्यांच्यावर हल्ला करून त्यांचा पुरा मोड केला. शिवाय, बडोद्याच्या सैन्याबरोबर जातीने काठेवाडात मुलुखगिरी करून अनेक राज्यांनी व जहागिरींनी द्यावयाच्या खंडणीचे करार त्याने कायमचे करून घेतले. वॉकरने केलेल्या या व्यवस्थेमुळे तत्कालीन अनिष्ट गोष्टींना आळा बसून अनेकांमध्ये सुरक्षिततेची भावना निर्माण झाली. अशा रीतीने तलवारीच्या जोरावर मनमानी खंडणी वसूल करण्याची उरलीसुरली मोगली प्रथा संपुष्टात झाली. इंग्रजांनी खंडणी वसूल करण्याची जबाबदारी स्वतःकडे घेतल्याने बडोदे सरकारचा पुष्कळच त्रास कमी झाला. 'आपापसांतील तंटेबखेडे मिटवून राज्यात शांतता प्रस्थापित झाल्याने तसेच राज्याची भरभराट होऊन लोकांना सुखसमाधान लाभावे अशी खटपट केल्याने बडोदे राज्य या इंग्रज गृहस्थाबद्दल सदैव कृतज्ञ राहिले.' सतत चालणाऱ्या लढाया, दुहीतून उद्भवणाऱ्या चकमकी किंवा अचानक होणारे नाट्यपूर्ण उदय व शोकपर्यवसायी अस्त यांचे दिवस कायमचे संपले. हा भला कर्नल खरोखर 'इतरांनी अनुकरण करावे असा चांगला पायंडा पाडणारा एक अग्रदूतच' होता. बडोद्याच्या इतिहासात एका नव्या युगाची पहाटच झाली.

दरम्यान, गायकवाडांकडील अहमदाबाद क्षेत्राची भाडेपट्ट्याची मुदत संपत आली होती. त्याविषयी नवा करार करणे व अन्य उर्वरित मागण्यांचा प्रश्न निकालात काढणे यांसाठी ब्रिटिशांनी दिलेल्या सुरक्षिततेच्या हमीनुसार गायकवाडांनी गंगाधरशास्त्री पटवर्धन यांची इ. स. 1813 मध्ये पुण्यास रवानगी केली. पण गुजरातेतील आपली सत्ता हळूहळू लुप्त होत असल्यामुळे पेशवे नाराज होते. यामुळे अहमदाबाद-क्षेत्र आपल्या मर्जीतल्या माणसाकडे सोपविण्याची त्यांची मनीषा होती. मात्र त्यासाठी गायकवाडांची संमती घेणे आवश्यक होते व ती सहजासहजी मिळण्यासारखी नव्हती. बडोद्याच्या वकीलामार्फतही ही गोष्ट साधून घेणे अशक्य दिसताच पेशव्यांनी मूर्खपणाने गंगाधरशास्त्र्याच्या खुनाकडे काणाडोळा केला. इंग्रजांची खपामर्जी झाली व पेशव्यांचा सर्वनाश जवळ आला. मुंबई सरकारने इ. स. 1817 मध्ये पुण्याचा तह करण्यास पेशव्यांना भाग पाडले व त्या तहान्वये मराठा-मंडळ संपुष्टात आले. पेशव्यांचा काठेवाडच्या खंडणीतील हिस्सा इंग्रजांना मिळाला आणि अहमदाबाद क्षेत्र कायमचे गायकवाडांकडे सोपविण्यात आले. या पाणउताऱ्याने पेशव्यांचा जळफळाट होऊन त्यांनी आणखी एक चुकीचे पाऊल टाकले. त्यांनी पुणे वकिलातीवर हल्ला केला; पण खडकीच्या लढाईत पेशव्यांचा पूर्ण पराभव झाला. मग मात्र प्राप्त परिस्थितीत उत्तम मार्ग म्हणून पेशवा इंग्रजांच्या स्वाधीन झाला. यामुळे आता मराठी साम्राज्याची नाममात्र छायाच काय ती मागे राहिली.

इ. स. 1817 मध्येच गायकवाड व इंग्रज यांच्या दरम्यान झालेल्या इ. स. 1805 च्या निश्चयात्मक कराराला एक पुस्ती जोडण्यात आली व बडोद्यातील तैनाती फौजेची संख्या वाढविण्यात आली, तसेच काही मुलखाची परस्परामध्ये देवाणघेवाणही झाली. तहानुसार इ. स. 1818 मध्ये इंग्रजांची ताकद आणखीच वाढली. देवघेवीत गायकवाडांकडे असणारा अहमदाबाद क्षेत्राचा पेशव्यांचा हिस्सा, दस्क्रोइ परगण्यासह तेथील राजवाडा किंवा गायकवाडांची हवेली, मोठा कसबा आणि ताडकेश्वर परगणा इंग्रजांकडे गेला, तर डभोई, भादरपूर व सावली गायकवाडांकडे आली. पुढे ताब्यात येणाऱ्या मुलुखात गायकवाडांना सहभागी करून घेण्यासंबंधी विचार करण्याचे आश्वासनही इंग्रजांनी दिले. अर्थात तसा प्रसंग पुढे कधीच न आल्याने ते आश्वासन म्हणजे प्रायः एक पोकळ समाधानच होते. प्राप्त परिस्थितीत सर्वोत्तम अशा या तहान्वये इंग्रज-गायकवाडांमधील मैत्रीचे संबंध कायम झाले. इंग्रजांना अन्य देशी सरदारांशी लढावे लागले होते, तशा प्रकारे गायकवाडांशी लढावे न लागल्याने 'इंग्रजांचे अजिंक्य मित्र' असे गायकवाडांनी स्वतःला म्हणवून घेतले. इतर देशी संस्थानांपेक्षा आपल्या संस्थानास निराळ्या पातळीवरची खास वागणूक मिळावी, अशी इंग्रजांबरोबरच्या संबंधाविषयी त्यांची समजूत होती. या समजुतीतूनच आनंदरावानंतर इ. स. 1819 मध्ये गादीवर आलेले दुसरे सयाजीराव आणि खुद्द तिसरे सयाजीराव यांनी अनेक गैरसोयी

आणि वैयक्तिक नुकसान सोसूनही स्वत्वाला जपण्याचा आग्रह धरला आणि सार्वभौम सत्तेशी त्यांचे खटके उडत राहिले.

अप्रबुद्ध व दुबळ्या अशा आनंदरावापेक्षा दुसरे सयाजीराव स्वभावाने विलक्षण भिन्न प्रवृत्तीचे होते. ते अनन्य उत्साही, स्वमताविषयी आग्रही आणि स्वतःच्या उद्दिष्टांबाबत अगदी ठाम होते, असे त्यांचे वर्णन '*बडोदा गॅझेटियर*'ने केलेले आहे. आपल्या कामात ढवळाढवळ केलेली त्यांना बिलकुल खपत नसे. ते सत्ताभिलाषी होते आणि संपत्तीचा तर त्यांना खूपच लोभ असे. ते लोकादरास पात्र झालेले होते आणि कालमानाचा विचार करता त्यांचे खाजगी चारित्र्यही कमालीचे नैतिक होते. साहजिकच मुंबई सरकारबरोबर त्यांचे अधूनमधून वितुष्ट येत गेले; मुंबई सरकारने त्यांना तशी संधीही दिली. सयाजीरावांनी स्वमताचा आग्रह धरला असेल हे आवर्जून सांगण्याची गरज नाही. तरीपण त्यातून संस्थानाचा तोटाच झाला. आपल्या हक्कांसाठी झगडा चालू असतानाच सयाजीरावांचे निधन झाले. त्यांच्यामागून गणपतराव (इ. स. 1847-56), खंडेराव (इ. स. 1856-70) आणि शेवटी मल्हारराव (इ. स. 1870-75) असे त्यांचे तिघे पुत्र क्रमाने गादीवर आले.

यांपैकी गणपतराव आत्मसंतुष्ट व निराग्रही होते; तेव्हा त्यांच्या राजवटीत ब्रिटिश रेसिडेंट कॅप्टन फ्रेंच हाच खरा सूत्रधार होता. एका अर्थी ही गोष्टही सुप्त वरदानच ठरली. रस्तेबांधणी, बालहत्याप्रतिबंध, मुलांच्या विक्रीवरील बंदी, रोगप्रतिबंधक लस टोचण्याचा उपक्रम आणि रेल्वेचा प्रारंभ या गोष्टी रेसिडेंटच्या प्रभावाची साक्षच पटविणाऱ्या होत्या.

खंडेरावांची राजवट म्हणजे तिसऱ्या सयाजीरावांच्या चरित्रमंदिराकडे नेणारे एक दालनच होय. *बडोदा गॅझेटियरच्या* शब्दांत सांगायचे तर खंडेराव हे जडजवाहिर, खेळ आणि भव्य इमारती यांचे भोक्ते. दुसऱ्या एका बखरकाराने त्यांच्या प्रदर्शनप्रियतेचा आणि भव्यतेच्या ओढीचा उल्लेख केला आहे. त्यांच्या शिकारीच्या हौसेपोटीच प्राण्यांच्या अभयारण्यानजीकचा मकरपुरा राजवाडा बांधला गेला. याच सुमारास इ. स. 1857 च्या उठावाचा प्रक्षोभ हिंदुस्थानात उसळला होता. इंग्रजांची 'मैत्री' सोडून देण्याचा मोहही खंडेरावांना एकदा झाला होता, पण वेळीच शहाणपण सुचून आपल्या अंगीकृत जबाबदारीशी ते एकनिष्ठ राहिले. तदनंतर काठेवाडातील ओखा मंडळाच्या वाघेरांचे बंड मोडून काढण्यासाठी त्यांनी इंग्रजांशी चांगले सहकार्य केले. या भागात कायदा व सुव्यवस्था कायम स्वरूपात प्रस्थापित करण्यात गायकवाडांच्या निष्ठेचा भाग मोठा होता. त्यामुळे ब्रिटिश फौज निर्धोकपणे अन्यत्र लागेल, तेव्हा पाठविणे शक्य झाले. इंग्रजांनी गायकवाडांच्या सेवेची दखल घेऊन त्यांचा त्यासाठी उचित असा मानसन्मान केला. इ. स. 1862 मध्ये सार्वभौम सत्तेकडून औरस संततीच्या अभावी दत्तकाची सनद त्याना देण्यात आली आणि जी. सी. एस्. आय. (ग्रँड कमांडर ऑफ स्टार ऑफ इंडिया)

ही किताबतही बहाल करण्यात आली. त्यांच्या दोन्ही राण्यांपासून त्यांना मुलगा झालेला नसल्याने इ. स. 1866 मध्ये त्यांनी राणी जमनाबाईशी विवाह केला. त्यांना चौथी पत्नी असावी, असे वाटते; पण तिच्यापासूनही त्यांना पुत्र नव्हता. इ. स. 1870 साली खंडेरावांचे एकाएकी निधन झाले आणि त्यांचा हट्टाग्रही बंधू मल्हारराव गादीवर आला. खंडेरावांविरुद्ध कट केल्याच्या आरोपावरून त्याला इ. स. 1863 पासून पादरा येथे कैदेत ठेवण्यात आलेले होते; त्यामुळे भावाविषयी त्याच्या मनात कमालीची कटुता होती. मल्हारराव तुरुंगातून सुटले तेच मुळी गादीवर विराजमान झाले. परंतु दुर्दैव असे की, राणी जमनाबाई त्या वेळी गरोदर होत्या. त्यांना होणारे अपत्य मुलगा की मुलगी, याचा उलगडा होईपर्यंत मल्हाररावांना राज्याचे संपूर्ण अधिकार मिळणे ही गोष्ट लांबणीवर पडली. जुलै 1871 मध्ये राणी जमनाबाईने कन्येलाच जन्म दिला आणि मल्हाररावांनी सुटकेचा निःश्वास सोडला. आता त्यांचे आसन निष्कंटक झाले. पण दैवाने लाभलेल्या या सुरक्षिततेच्या परिणामी बडोद्यात बेबंद कारभार सुरू होऊन अखेरीस त्यांचा विनाश ओढवला. मात्र त्यामुळेच उपयुक्त दुसऱ्या दमाजीरावांचे बंधू प्रतापराव गायकवाड यांच्या विस्मृतीत गेलेल्या खानदेशातील शाखेला आता महत्त्व आले.

मल्हाररावांच्या पाच वर्षांच्या राजवटीने बडोद्याच्या इतिहासात अनेकानेक प्रश्न निर्माण केले. त्यातल्या काही प्रश्नांची उत्तरे स्पष्ट झाली असली, तरी काही थोडे प्रश्न अद्यापही गूढ राहिलेले आहेत. खंडेरावांशी एकनिष्ठ असणारे आणि आपल्या छळाला कारणीभूत होणारे म्हणून ज्यांच्याविषयी मल्हाररावांना संशय वाटत होता, त्यांना त्यांनी धारेवर धरले हे सर्वश्रुतच आहे. राणी जमनाबाईना तर कन्येच्या जन्मापूर्वी मल्हाररावांची एवढी भीती वाटत होती की, त्या रेसिडेन्सी भागात राहावयास गेल्या आणि तेथेच त्यांची प्रसूती झाली. तदनंतरही त्यांनी बडोद्याबाहेर राहणेच पसंत केले. खंडेरावांचा दिवाण भाऊ शिंदे तुरुंगात संशयास्पद अवस्थेत मृत्यू पावला. खंडेरावांच्या मर्जीतील अन्य लोकांना पदभ्रष्ट तरी करण्यात आले किंवा त्यांची मालमत्ता तरी जप्त करण्यात आली. मल्हाररावांचे एकूण चारित्र्य संशयास्पद होते, असेही पुरावे आढळतात. होळीच्या खाजगी सणाचे पर्यवसान अनेकदा कित्येक स्त्रियांना शारीरिक आणि मानसिक त्रास पोचण्याइतक्या अधोगतीत होत असे. त्यांचा एकूण कारभार दीर्घसूत्री, अकार्यक्षम आणि भ्रष्टाचारी होता. इ. स. 1873 च्या सुमारास परिस्थिती अगदी असह्य झाली. त्या वर्षी मल्हाररावांच्या दुर्दैवाने सुखासीन वृत्तीचा रेसिडेंट कर्नल बार जाऊन त्याच्या जागी उत्साही पण राजकीय हस्तक्षेप करण्यास उत्सुक असणारा कर्नल फायरे आला. अल्पावधीतच मल्हारराव आणि कर्नल फायरे यांच्यात बेबनाव सुरू झाला. कर्नल बार हा कारभारात कमी लक्ष घाली, तर त्याच्या जागी आलेला हा नवा रेसिडेंट जादा ढवळाढवळ करतो, असे आरोप होऊ लागले. बडोद्यातील गैरकारभाराचा तपशील देणारी रेसिडेंटची इतिवृत्ते सरकारकडे आता वरचेवर जाऊ लागली व मुंबई सरकारकडून

त्यांना दुजोरा मिळाल्याने तर त्यांना अधिकृततेची प्रतिष्ठा लाभली. यातूनच कारभाराची संपूर्ण चौकशी करणे आवश्यक ठरले. 18 ऑक्टोबर 1873 रोजी हिंदुस्थान सरकारने कर्नल रिचर्ड मीड यांच्या अध्यक्षतेखाली एका चौकशी-आयोगाची नेमणूक केली. मीडच्या अहवालात मल्हाररावांवर कुप्रशासन आणि गैरकारभार असे उभयविध दोषारोप करण्यात आले. आपल्या पसंतीचा चांगला दिवाण नेमून सुधारणा घडवून आणण्याची त्यांना एक वर्षासाठी संधी देण्यात आली. त्याबरोबरच असाही इशारा देण्यात आला की, नेमून दिलेल्या मुदतीत प्रशासन सुधारले नाही, तर त्यांना पदच्युत करण्यात येईल.

मल्हाररावांनी प्रशासन सुधारण्याबरोबरच बडोद्यातून रेसिडेंटची उचलबांगडी व्हावी, अशा दुहेरी हेतूने दादाभाई नौरोजींना दिवाणपद स्वीकारण्यासाठी पाचारण केले. चार विश्वासू सहकाऱ्यांसह दादाभाई आले. या सहकाऱ्यांपैकी एक काझी शहाबुद्दिन पुढे सयाजीरावांचे दिवाण झाले. मल्हाररावांच्या हेतूसंबंधी कसलाही किंतू मनात न धरता प्रशासनाची साफसफाई करून ते सुधारण्याचे उद्दिष्ट बाळगूनच दादाभाई बडोद्याला आलेले होते. पण गायकवाड आणि रेसिडेंट हे दोघेही आपल्या मार्गातले अडथळे आहेत, हे त्यांना लवकरच दिसून आले. आपल्याविषयी मल्हाररावांच्या मनात तीव्र द्वेषबुद्धी आहे, याविषयी रेसिडेंटची तर खात्रीच होती; पण त्याचबरोबर बडोद्याच्या कारभारात सुधारणा घडवून आणण्याच्या दृष्टीने दादाभाई असमर्थ आहेत, असा ठाम ग्रह, प्रत्यक्ष अनुभव येण्यापूर्वीच, त्याने करून घेतलेला होता. 'प्रशासनाची साफसफाई' करण्याच्या कामात कर्नल फायरे याने अडथळे आणण्यास प्रारंभ करताच दादाभाईनी हरकत घेतली. मुंबई सरकारने बाह्यतः रेसिडेंटला फटकारल्याचे दर्शविले; पण बडोद्याची परिस्थिती कठोरपणे हाताळण्यास अंतःस्थ पाठिंबाच दिला. दादाभाईनी गव्हर्नर जनरल लॉर्ड नॉर्थब्रुक यांच्याकडे तक्रार गुजरताच चौकशी करून त्यांनी कर्नल फायरे यांची उचलबांगडी करण्याचा मुंबई सरकारला सल्ला दिला. शेवटी मुंबई सरकारने सर लुई पेली यांची रेसिडेंट म्हणून नेमणूक केली. 4 डिसेंबर 1874 रोजी पेली आपल्या अधिकारपदी रुजू झाला.

त्रासदायक ठरलेल्या रेसिडेंटच्या तावडीतून सुटका होणार, म्हणून नव्या नेमणुकीने मल्हाररावाला आनंदच झाला पण नेमका याच संधीस कर्नल फायरे याने 9 नोव्हेंबर रोजी शेवटचा फटका लगावला. एके संध्याकाळी आपल्या सरबताच्या पेल्यात आर्सेनिक मिसळून मल्हाररावाने आपल्यावर विषप्रयोग केल्याचा त्याने आरोप केला. पोलिसांकरवी केलेल्या चौकशीत प्रथमदर्शनी सदर आरोप सिद्ध करून त्याने मल्हाररावास अटक केली व कारभार स्वतःच्या हाती घेतला. रेसिडेंटने केलेल्या आरोपाची चौकशी करण्यासाठी सर रिचर्ड काऊच याच्या अध्यक्षतेखाली दुसरा एक आयोग नेमण्यात आला. त्याचे तीन इंग्रज आणि तीन हिंदी सदस्य होते. रीतसर चौकशी झाली; पण निर्णय लागू शकला नाही. इंग्रज सदस्यांनी मल्हाररावाला दोषी ठरविले; तर हिंदी सभासदांनी आरोप

सिद्ध होत नसल्याचे मत दिले. साहजिकच तेव्हा एक सरळ प्रश्न उपस्थित करण्यात आला की, ज्याचे वैर त्याची उचलबांगडी लवकरच होणार, हे पुष्कळच आगाऊ माहीत झाले असताना त्याच्यावर विषप्रयोग करण्याचा प्रयत्न मल्हारराव करतीलच कशाला ? या प्रश्नाला उत्तरच नव्हते. अर्थात अपरिहार्य तेच घडून आले. भारतमंत्री लॉर्ड सॅलिस्‌बरी यांनी एकमुखी निर्णय नसणारा काऊच-अहवाल दुर्लक्षित केल्याचा बहाणा करून गैरप्रशासनासंबंधीचा पेलीचा अहवाल ग्राह्य धरला आणि म्हटले की, 'राज्याचा महसूल 94 लाख; पण गतवर्षीचा खर्च 171 लाख आहे व त्यापैकी 70 लाख राजवाड्याच्या दुरुस्तीसाठी आणि राजाच्या वैयक्तिक मर्जीतल्या लोकांवर खैरात करण्यासाठी, तसेच वारांगनांसाठी उधळपट्टीत खर्ची पडले आहेत.' तेव्हा महाराजात 'सुधारणा होणे अशक्य' आहे, असे समजून 19 एप्रिल 1875 च्या जाहीरनाम्याने त्यांना पदच्युत करण्यात आले. राज्य खालसा तर होणार नाही, अशी लोकांच्या मनातील भीती दूर करण्यासाठी जाहीरनाम्याच्या पुढील कलमातच म्हटले होते की, खंडेरावांची विधवा पत्नी राणी जमनाबाई हिने 'हिंदुस्थान सरकार सत्पात्र ठरवून ज्याच्या हाती बडोद्याची सत्ता सोपविण्यास तयार होईल, अशा गायकवाड घराण्यातील एखाद्या व्यक्तीस दत्तक घ्यावे.' जाहीरनाम्याच्या या कलमाचा आपल्या चरित्रनायकाशी साक्षात संबंध पोचत असल्याने बडोदे संस्थानच्या भवितव्यावर त्याचा संस्मरणीय परिणाम व्हावा, असा संकेत जणू नियतीनेच योजून ठेवला होता. जाहीरनाम्याच्या कलमाने बडोद्याच्या प्रजेला आश्चर्याचा धक्का दिला. तसेच एक गुलदस्तातले रहस्यही यथाकाल प्रकटही झाले. ही सुदैवी व्यक्ती कोण असू शकेल, ही गोष्टही तेव्हा पूर्ण अज्ञात असल्याने एकूण कुतूहलाच्या वातावरणात भरच पडली होती.

जाहीरनाम्यातील तरतुदी अमलात आणण्यासाठी आता रेसिडेंटने पावले टाकावयाची होती. वार्षिक दीड लक्ष रुपयांच्या नेमणुकीवर वा निवृत्तिवेतनावर मल्हाररावांची रवानगी मद्रासला झाली. दरम्यान स्थानिक वारसदारांनी हक्क सांगण्यास प्रारंभ केल्याने शहरात नाना प्रकारच्या अफवा उठत होत्या; पण रेसिडेंटने त्यांची दखल घेतली नाही. पदच्युतीनंतर शहरात हरताळ पाळला गेला; मल्हाररावांच्या पक्षपात्यांनी छोटा उठावही केला. त्यावरून मल्हाररावांविषयी राज्यात सर्वस्वी तिरस्कार होता, असे दिसत नाही. सर लुई पेली हे प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे पाचच महिन्यांत निवृत्त झाले होते. त्यांच्या जागी सर रिचर्ड मीड आले होते. त्यांनी उठावाचा बीमोड तत्काल करून टाकला. परिस्थितीला अनिष्ट वळण लागण्याचा धोका होता; पण मीडनी चातुर्याने व कल्पकतेने परिस्थितीची हाताळणी केली. दादाभाई हताश होऊन बडोदे सोडून गेले होते. अशा नव्या परिस्थितीत काही काळ इंदूर संस्थानात मंत्रिपदावर असणाऱ्या सर टी. माधवराव यांची बडोद्याच्या दिवाणपदी हिंदुस्थान सरकारने नेमणूक केली. 10 मे 1875 रोजी त्यांनी कामाची सूत्रे हाती घेतली. सर रिचर्ड, माधवराव व बडोद्याला बोलावून घेतलेल्या राणी जमनाबाई

यांच्या रीजन्सी कौन्सिलने 'अत्यंत सुयोग्य व्यक्ती' चा शोध सुरू केला. बडोद्यातील वारसदारांपैकी कोणीही 'सुयोग्य' न आढळल्याने बडोद्याबाहेर शोध सुरू झाला. साहजिकच सर्वांची दृष्टी गायकवाडांच्या खानदेश येथील शाखेकडे वळली. गायकवाड घराण्याच्या कनिष्ठ शाखेवर दैवाची मेहेरनजर कधीच झालेली नव्हती. मध्य रेल्वेच्या मनमाड स्टेशनपासून अठरा मैलांवरील कवळाणे या छोट्या खेड्यात प्रतापरावांचे वंशज स्थायिक झालेले होते. शेतीच्या लहानशा तुकड्यावरच त्यांची गुजराण चालू होती. खंडेराव व पुढे मल्हारराव यांनी आपल्या या दूरस्थ आप्तांना काही भेटी देऊन कधीमधी आठवण ठेवल्याचे आढळते. या शाखेत पाच बंधू होते व ते सर्व त्या वेळी हयातही होते. त्यांपैकी काशीराव हा एक असून त्याला आनंदराव, गोपाळराव व संपतराव असे तीन पुत्र होते. इतर भावांनाही निरनिराळ्या वयाची मुलेबाळे होती. तेव्हा निवडीला खूपच वाव होता. मात्र त्यात एक गोम होती. प्रतापराव हा पिलाजीरावाचा अनौरस पुत्र असल्याने त्याच्या शाखेला बडोद्याच्या गादीवर हक्क सांगण्याचा अधिकार पोचत नाही, असे बडोद्यात बोलले जात असे. नाशिक येथे तपास होऊन औरसपणाची कसून चौकशी झाली व ही कोंडी फुटली. नाशिक, त्र्यंबक व पंढरपूर येथील गायकवाडांच्या उपाध्यायांनी ठेवलेल्या नोंदीत अनौरस पुत्राचे नाव नोंदवले जात नसते. पण तेथील नोंदीत प्रतापरावांचा उल्लेख आढळून आला व त्यांची शाखा औरस ठरली. अशा प्रकारे पुढील मार्ग मोकळा झाल्याने जमनाबाईनी काशीरावांचा बारा वर्षांचा द्वितीय पुत्र गोपाळराव याची अंतिम निवड केली.

उपाध्यायांच्या नोंदीत सापडलेला तो उपयुक्त वंशवृक्ष पुढे दिला आहे.

स्थानिक हक्कदारांपैकी गणपतराव व खंडेराव यांनी नव्या परिस्थितीशी जुळवून घेतले. मुराररावाने निराशेपोटी गोळी झाडून आत्महत्या केली. सदाशिवराव नव्या व्यवस्थेमुळे असंतुष्ट होता. काही अप्रिय प्रसंग उद्‌भवू नये, यासाठी त्याला अटक करून पेन्शनवर त्याची रवानगी अखेर काशीला करण्यात आली.

अशा रीतीने बडोद्याच्या इतिहासाच्या नव्या अध्यायास प्रारंभ झाला.


नंदाजी
केरोजी
पहिला दमाजी
जिंगोजी
पिलाजीराव (दत्तक)
पहिला पिलाजी
(दमाजीरावाला दत्तक)
दुसरा दमाजी
खंडेराव
(कडीचा जहागिरदार)
प्रतापराव
काळोजी
मल्हारराव
गबाजी
भिकाजी
सखाराम
उखाजी
गबाजी
काशीराव
बाबूराव
आनंदराव
गोपाळराव
(दत्तक : नवे नाव
तिसरा सयाजीराव)
संपतराव
गोविंदराव
सयाजीराव
फत्तेसिंहराव
मानाजीराव
आनंदराव
दुसरा सयाजीराव
फत्तेसिंहराव
कान्होजीराव (अनौरस)
गणपतराव
खंडेराव
मल्हारराव
तिसरा सयाजीराव
(दत्तक)
गोविंदराव (दत्तक)
सदाशिवराव
मुरारराव

दोन

# अज्ञान पालकाची राजवट

एखाद्या परीकथेत घडावे, तसा एका रात्रीत शेतकऱ्याचा एक मुलगा राजा बनला होता. दुसऱ्या मल्हाररावाची नव्याने पुनरावृत्ती होऊ नये म्हणून बडोद्याच्या तत्कालीन परिस्थितीत एखाद्या अज्ञान मुलाची निवड करावी, त्याला राजपदासाठी चांगले शिक्षण देऊन तयार करावा, हे ब्रिटिश सरकारला श्रेयस्कर वाटले. असे वाटण्यामागे मनोमन असाही एक विचार असणे शक्य आहे की, काही काळपर्यंत बडोद्यात अज्ञान पालकाची राजवट राहिली, तर बडोदे संस्थान आणि सार्वभौम सत्ता यांच्यातील अनेक अनिर्णीत प्रश्न फारसा तीव्र विरोध न होता आपल्याला हवे तसे निकालात काढता येतील. स्थानिक गायकवाड कुटुंबे जमनाबाईना रहिमतपूरची म्हणून उपरी समजत आणि म्हणून जमनाबाईही या कुटुंबांच्या घरगुती राजकारणापासून अलिप्त राहण्याची दक्षता घेत. अर्थातच बडोद्याबाहेरच्या मुलाची निवड व्हावी, यासंबंधी त्याही उत्सुकच होत्या. एवंच त्यांचा कौल गोपाळरावाच्या तर्फे मिळाला व रेसिडेंट मीड आणि दिवाण माधवराव यांनीही त्याला मान्यता दिली. बडोद्याच्या सरदारांचीही अनुमती मिळाली. राणी जमनाबाईनी 27 मे 1875 रोजी, सुमुहूर्तावर गोपाळरावाला पारंपरिक विधिपूर्वक दत्तक घेतले. सर रिचर्ड मीड यांनी अक्षरशः उचलूनच त्याला राजसिंहासनावर बसविले. आता गोपाळरावाने तिसरे सयाजीराव असे नवे नाव धारण केले.

सयाजीराव हे काशीराव आणि उमाबाई या दांपत्याचे पुत्र. त्यांचा जन्म 11 मार्च 1863 रोजी झाला. आपला थोरला भाऊ आनंदराव यांच्याहून ते पाच वर्षांनी लहान, तर धाकटा भाऊ संपतराव याच्यापेक्षा दोन वर्षांनी मोठे होते. कवळाणे गाव हा त्या प्रदेशातील विशिष्ट खेड्याचा एक नमुनाच होता. दीड-दोनशे घरे, दोन देवळे, एक छोटीशी नदी आणि गावाच्या मध्यभागी असलेल्या चौकात प्रचंड वटवृक्ष, इतर करमणुकीची साधने थोडी, त्यामुळे मोकळे मैदानी खेळ आणि दूध, लोणी, तूप, साधे पण सकस अन्न असा आहारविहार. अर्थात ही मुले सशक्त बनलेली होती. काही वर्षांनी इंग्लंडच्या राजपुत्राने जेव्हा सयाजीरावांना पाहिले, तेव्हा वयाच्या मानाने ते त्याला लहानच वाटले. मीडला ते 'शांत स्थिर वृत्तीचे, चेहऱ्यावर विचारी भाव असणारे व अत्यंत मनमिळाऊ स्वभावाचे' वाटले. अगदी प्रकृतीने दणकट नसले, तरी ते निरोगी,

प्रसन्नमुख, लहानखोर व नाजूक चणीचे होते. नखशिखांत जडजवाहिर घातल्यावर ते चांगले तेजस्वी दिसत. सयाजीरावांना बाळपणी पोहण्याची तसेच आट्यापाट्या, खोखो, गोट्या, विटीदांडू असे खेळ खेळण्याची विशेष आवड होती. पुढे पन्नास वर्षांनी, सन 1926 मध्ये त्यांनी जेव्हा कवळाण्याला भेट दिली, तेव्हा तेथील महादेवाचे देऊळ आणि छोटी नदी हीच काय ती त्यांच्या स्मरणात राहिलेली होती.

त्यांनी गावची शाळा पाहिली होती; पण आत प्रवेश कधीच केलेला नव्हता. स्पष्टच सांगायचे तर ते निरक्षरच होते, त्यांना लिहितावाचता काहीच येत नव्हते. वयाच्या अठराव्या वर्षी राजा म्हणून सर्वाधिकार प्राप्त व्हावयाचे असल्याने सुविहित शिक्षण देऊन राजपुत्राला साजेशी तयारी करून घेण्याच्या दृष्टीने एक सहा वर्षांची शिक्षणयोजना रेसिडेंट व दिवाण यांनी सिद्ध केली. सयाजीरावांना इंग्रजी, गुजराती, मराठी व उर्दु अशा चार भाषा मुळाक्षरांपासून शिकावयाच्या होत्या. प्रत्येकीची लिपी भिन्न होती. त्यातही पुन्हा इंग्रजी भाषा ही अन्य तीन देशी भाषांहून अगदी परकी होती. या भाषाशिक्षणाला इतिहास, भूगोल आणि प्राथमिक गणित या विषयांची जोड देण्यात आलेली होती. प्रशासनविषयक उत्तमोत्तम सिद्धांतांची त्यांना ओळख व्हावयास हवी होती. हिंदी संस्थानिक या नात्याने 'काय करावे' व 'काय करू नये' या दोन्हींची माहिती व्हावयास हवी होती. तसेच देशातल्या कायद्यांचाही परिचय करून देणे अगत्याचे होते. हा सर्व कार्यक्रम अशक्यप्रायच होता. यातून शेवटी काय निष्पन्न होईल, याची कल्पना नव्हती. तरीसुद्धा सयाजीरावांनी आपल्या अभ्यासक्रमास गंभीरपणे प्रारंभ केला. शिक्षणक्रम पुरा करून घेण्याची जबाबदारी एक आय. सी. एस. अधिकारी एफ्. ए. एच्. एलियट यांच्याकडे सोपविण्यात आली होती. त्यांना उसनवार तत्त्वावर मुद्दाम बोलावून आणण्यात आले होते. पुढे या अधिकाऱ्यानेच 'रूलर्स ऑफ बरोडा' हा ग्रंथ लिहिला. प्रारंभी या शिक्षकाला आपला हा राजशिष्य 'जसा दिसायचा तसा असायलाही मंदगतीचा' वाटला; पुढे मात्र तो 'चलाख नव्हे, पण चिकाटीचा' आहे; असे दिसून आले. एलियट यांनी नेमके ओळखले की, सयाजीरावांच्या अंगी चिकाटी हा ठळक व महत्त्वाचा गुण आहे. याच गुणाच्या बळावर ते अनेक कठीण प्रसंगातून निभावून गेले. सयाजीरावांच्या दृष्टीने हा अगदी नवजीवनाचाच प्रारंभ होता. त्यांची पार्श्वभूमी आणि त्यांच्यापुढचे भवितव्य ध्यानात घेतले की या तिसऱ्या सयाजीरावांची 'अत्यंत कुतुहलपूर्ण अशा प्रयोगासाठी निवड' झाली होती, हे उघड होते.

या राजेशाही विद्यार्थ्याची प्रगती लक्षात येण्यासाठी इ. स. 1875 ते 1881 पर्यंतची राज्याची इतिवृत्ते चाळणे जरूर आहे. आखीव अभ्यासक्रमाबरोबरच सयाजीरावांचे सामान्यज्ञान हळूहळू वाढत असून त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचाही विकास होत असल्याची नोंद वर्षामागून वर्षे दिवाणांना करता आलेली आहे. सर्व विषयांमध्ये गणित हे राजपुत्राला कठीण वाटले, त्यात तो नापासही होई; पण इतर विषयांत मात्र त्याने उत्तम प्रगती

केली. सयाजीराव इंग्रजी पुस्तके वाचू शकतात व इंग्रजीतून सफाईदारपणे संभाषण करू शकतात, असा उल्लेख सहा वर्षानंतर दिवाणसाहेबांनी समाधानपूर्वक केल्याचे दिसून येते. इंग्रजीत छोटी छोटी भाषणेही ते देऊ शकत होते. हा गुण त्यांनी प्रयत्नपूर्वक जोपासला, असे आढळते. भावी आयुष्यात भाषणांच्या तयारीसाठी ते पुष्कळच वेळ आणि शक्ती खर्च करीत. नेमकेपणा, सहजसुलभ आविष्कार आणि सुबोधता हे त्यांच्या भाषणांचे विशेष गुण असत. त्यांच्या भाषणात विचारप्रवर्तकताही असे. शिक्षण घाईगर्दीत झाल्याने आपले हस्ताक्षर सुधारण्यास मात्र त्यांना अवसर लाभला नाही, याची त्यांना खंतही वाटत असे. मात्र ते सुधारावे असा त्यांचा प्रयत्न पुढे सतत चालू राहिला. आपल्या शिक्षणात राहिलेल्या उणीवा ध्यानात येऊन भावी आयुष्यात ते म्हणत की, प्राथमिक व माध्यमिक शिक्षण पुरे होईपर्यंत आपले राज्यारोहण काही वर्ष लांबविले असते, तरी बरे झाले असते. पण राज्यावर असताना त्यांनी शिक्षणाविषयी जो वाढत्या प्रमाणात आस्था प्रकट केली, त्यावरून त्यांना या क्षेत्रातले क्रांतिकारकच म्हटले जाई. त्यांचे शिक्षणविषयक विचार काळाच्या पुढे होते आणि त्यासाठी त्यांना कितीही वाव मिळाला असता तरी त्यांचे समाधान झाले नसते.

सयाजीरावांनी एलियटबरोबर अत्यंत जिव्हाळ्याचे संबंध ठेवले; एलियटनेही त्यांच्यावर वज्रलेप व्हावा, असा ठसा उमटविला होता. आपल्या पाल्याची सामान्य ज्ञानाची कक्षा आणि त्याच्या दृष्टीचा पल्ला विस्तृत करण्याची जबाबदारी प्रामुख्याने एलियटने उचलली असल्याने, प्रजेच्या उन्नतीला पोषक असा कोणताही विषय, राजा या नात्याने, सयाजीरावांच्या अनास्थेस कारण झाला नाही. ज्ञानग्रहणाच्या बाबतीत प्रारंभी त्यांची गती मंद असली, तरी त्याबरोबरच त्यांच्या अंगचा एक गुण दृष्टोत्पत्तीस येऊ लागला होता. तो म्हणजे, एकदा शिकलेल्यातले ते फारसे काही विसरत नसत. भारतीय व पौरस्त्य सुधारणा व संस्कृती यांपेक्षा पाश्चात्त्य सुधारणा व संस्कृती अधिक श्रेष्ठ असल्याचे एलियटने तरुण व संस्कारक्षम अशा सयाजीरावांच्या मनावर काहीएक मर्यादेपर्यंत बिंबवले, असा एक ग्रह प्रचलित होता व तो खराच म्हटला पाहिजे. पण त्या काळात सर्वच क्षेत्रांचा कल पश्चिमेच्या दिशेने झुकलेला होता, हे लक्षात घेतल्यास त्याचे आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. या प्रभावाला सयाजीरावांच्या मातोश्री राणी जमनाबाई यांचा लगाम होता, हेही त्याबरोबरच नमूद केले पाहिजे. 'अकाउंट ऑफ दि एज्युकेशन ऑफ हिज हायनेस' या आपल्या ग्रंथात गो. स. सरदेसाई यांनी म्हटले आहे की, साधे भारतीय पद्धतीचे अन्न, नियमित पूजा-अर्चा, काही उपास आणि नैमित्तिक सणसमारंभ यांमुळे सयाजीरावांचा जीवनक्रम प्रामुख्याने भारतीय तऱ्हेचाच होता. शाळेत व राजवाड्यात त्यांच्यावर 'सक्त नजर' असे; पण 'महाराणी आणि मि. एलियट यांच्या चतुर हातोटीमुळे त्यांना ती त्रासदायक म्हणून कधी जाणवली नाही,' असेही सांगण्यात आले आहे. मात्र हे फार फार तर अर्धसत्य म्हणता येईल. कदाचित सयाजीरावांनी

उघड वाच्यता केली नसेल; पण आपल्यावर सक्त नजर असते, याचा त्यांना राग येई. खाजगी वा सार्वजनिक जीवनात त्यांच्यावर कोणी नजर ठेवली किंवा दडपण आणण्याचा प्रयत्न केला, तर त्यांनी प्रत्यक्ष विरोध केला नाही, तरी ते किती अस्वस्थ होत, हे ध्यानात घेतल्यास वरील विधान हातचा राखूनच स्वीकारावयास हवे. सयाजीरावांनी आपल्या एका आठवणीत आपल्या आईवडिलांना व नातेवाइकांना भेटण्याची आपणांस किती उत्सुकता असे, हे सांगितले आहे. पण अशा भेटण्याचा काही अनिष्ट परिणाम होईल, या भीतीने भेटण्यास परवानगी नसे. सयाजीरावांचे नवे पालक त्यांना आईवडील व नातेवाईक यांच्यापासून कटाक्षाने दूर ठेवीत. राजवाड्यात आणि सभोवती माणसांची दाटी असूनही सयाजीरावांना एकाकी वाटत असे. उघड भेट घेता येत नसे म्हणून आपण वडिलांना खिडकीतून खुणा करीत असू, अशी सयाजीरावांनी कबुली दिलेली आहे. आपल्या बरोबरीच्या मुलांबरोबरही मैत्री जमविण्याचे कसब संपादन करण्याची संधी न देणाऱ्या अशा या अलगपणाबद्दल पुढील काळात ते आपला रागही व्यक्त करीत. यामुळे दैनंदिन जीवनात अन्य लोकांशी कसे आणि कोणत्या पद्धतीने बोलावे, याबाबतही आपण अनभिज्ञ राहिलो असे त्यांचे मत होते.

दिवसाचे चोवीस तास महाराज म्हणून वावरावे लागे. इतरांहून आपण कोणीतरी 'निराळे' आहो, याची त्यांना सदैव जाणीव करून दिली जाई. परिणाम असा झाला की, घरगुती जीवनातसुद्धा या 'महाराज' मनोवृत्तीवर मात करणे त्यांना जमले नाही. सयाजीरावांच्या अंगी हेतुतः बाणवल्या गेलेल्या या अलिप्त वृत्तीबद्दल त्यांची पत्नी आणि मुलेही तक्रार करीत. असे सांगतात की, प्रत्यक्ष मुलांनासुद्धा आधी संकेतवेळ ठरविल्याशिवाय त्यांना भेटता येत नसे. त्यांच्या स्वभावातील या न्यूनामुळे त्यांना कौटुंबिक वा गृहस्थाश्रमी जीवनाचा पूर्णांशाने उपभोग घेता आला नाही. या प्रवृत्तीमुळे ते बरेचसे अंतर्मुख आणि आत्मकेंद्रित बनले.

वयाची अठरा वर्षे पूर्ण झाल्यावर, सन 1881 मध्ये डिसेंबरच्या शेवटच्या आठवड्यात सयाजीरावांच्या हाती प्रशासनाचे पूर्णाधिकार सुपूर्द करण्याचे ठरविण्यात आले होते. त्यामुळे त्या वर्षी मार्च ते डिसेंबर या अवधीत प्रशासनाच्या विविध पैलूंवर व्याख्याने आयोजित करण्यात आली. दिवाणांसह संस्थानातील अन्य कर्तबगार अधिकाऱ्यांनी ही व्याख्याने द्यावयाची होती. व्याख्यानमालेची सुरवात सर रिचर्ड मीड यांच्या जागी आलेले आणि तरुण राजाचा शिक्षणक्रम पाहिलेले गव्हर्नर जनरल यांचे प्रतिनिधी पी. एस्. मेलव्हिल यांच्या बोधपर व्याख्यानाने झाली. एलियटच्या उपस्थितीत मेलव्हिल यांचे 'महाराणीबद्दलची निष्ठा ठेवणे, अधूनमधून भेटवस्तू देऊन आपल्या भगिनी ताराबाईबद्दलचे प्रेम व्यक्त करणे, कुटुंबातील अन्य व्यक्तींविषयी आपुलकी ठेवणे, नोकराचाकरांशी वागताना भारदस्त अंतर राखणे आणि कारभारात स्वच्छंदपणे हस्तक्षेप न करणे,' अशा प्रकारचे कित्ता घालून देणारे व्याख्यान झाले. बडोद्यातील तत्त्वशून्य

लोकांच्या कटकारस्थानांपासून कटाक्षाने सावध राहण्याचा सल्ला सयाजीरावांना देण्यात आला; कारण ही मंडळी आपल्या स्वार्थी हेतूसाठी अशी आश्वासने पदरात पाडून घेतील की परिणामी स्वतःलाच गोत्यात यावे लागेल. दसरादरबारसारख्या सार्वजनिक समारंभाखेरीज अन्य प्रसंगी नजराणे वा भेटवस्तू न स्वीकारण्याचा इशारा मेलव्हिलने दिला. न्यायदानाच्या रीतसर कारभारात ढवळाढवळ न करण्याबद्दलही उपदेश केला गेला होता. न्यायालयीन हस्तक्षेप हा हिंदी संस्थानांचा मोठाच कलंक असल्याने हा उपदेश महत्त्वाचा असून सयाजीरावांनी तो कटाक्षाने पाळणेही महत्त्वाचे होते.

तदनंतर इतरही व्याख्याने झाली. सरसुभे काझी शहाबुद्दिन जमीनमहसुलावर तर अण्णा भिवराव ताम्हणे हिशेबव्यवस्थेवर बोलले. न्यायमूर्ती गाडगीळ व ठाणावाला यांची कायदेकानूंसंबंधी माहिती देणारी भाषणे झाली. पेस्तनजी जहांगीरजी तल्यारखान यांनी सर्वेक्षण, जमाबंदी आणि लष्करी बाबी यांची माहिती दिली; तर विनायकराव कीर्तने पोलीस आणि तुरुंग यांच्या व्यवस्थेवर बोलले. ही व्याख्याने अतिशय वरच्या श्रेणीची झाल्याचे मानले जाते; अर्थात तरुण महाराजांना त्यापासून कितपत फायदा झाला, ही गोष्ट शंकास्पदच ठरावी.

सर्व व्याख्यानांमध्ये दिवाण सर टी. माधवराव यांनी 'किरकोळ सूचना' (Minor Hints) म्हणून जी व्याख्यानमाला गुंफली, ती सर्वोत्कृष्ट होती. या मालेचे खाजगी प्रसारार्थ पुस्तक प्रसिद्ध करण्यात आले होते व ते सर्व अधिकाऱ्यांनी वाचावे, असा आदेशही देण्यात आला होता. राज्यकारभाराशी संबंधित अशा 'प्रारंभिक अगदी क्षुल्लक बाबींपासून तो गहन आणि सूक्ष्म' गोष्टींपर्यंत अनेकानेक विषयांवर त्यात इतका मोलाचा सल्ला दिलेला होता की, आधुनिक काळातील राजाने त्याकडे दुर्लक्ष करणे हे आत्मघातकीच ठरले असते. या भाषणांची शैली अठरा वर्षांच्या तरुणाला समजण्याजोगी साधी आणि सुगम असल्यामुळे या 'किरकोळ सूचना' अतिशय वाचनीय उतरल्या आहेत. दिवाणसाहेबांची ही भाषणे 'राजा कालस्य कारणम्' या प्रसिद्ध सुभाषितावर आधारलेली होती. विश्वस्त या भूमिकेतून नियोजित कार्य करण्याचा व राजसत्ता प्रजेच्या कल्याणासाठी राबविण्याचा सल्ला त्यांनी सयाजीरावांना दिलेला होता. प्रशासनाच्या चांगल्या तत्त्वांचे विवरण करताना नोकरशाही, ब्रिटिश सरकार व रेसिडेंट यांच्याशी राजाचे जे संबंध असतात, त्यांचे स्वरूप कसे असावे, तसेच सार्वभौम सत्तेकडून मिळालेला 'सल्ला' डावलला, तर त्याचे संभाव्य परिणाम काय होतील हेही दिवाणसाहेबांनी स्पष्ट केले होते. या संदर्भात तरुण राजाला त्यांनी मल्हारराव गायकवाडांच्या दुर्दैवी कहाणीचा दाखला दिला होता. भावी काळाच्या दृष्टीने, राज्याच्या एकूण महसुलाच्या 10 टक्क्यांहून अधिक खर्च खाजगी खात्यावर होणार नाही, याची विशेष दक्षता घ्यावी, अशी खास जाणीव करून दिली होती. अखेरीस लवकरच सर्वाधिकार प्राप्त व्हावयाचे असल्याने, राजपदाचे घटनात्मक स्थान कोणते, याची कल्पना देऊन त्याबाबत संयम बाळगण्याचा

इशाराही महाराजांना मुद्दाम दिलेला होता. या सर्व उपदेशाचे मर्म त्या तरुण राजाला यथावकाश उमगलेच असेल; पण तसे घडत असताना त्यामागील कळकळीचा सूरही जाणवला असेल. या परिश्रमपूर्वक दिलेल्या सखोल शिकवणीने महाराजांना आपल्या उणीवांची जाणीव झाली व त्याबरोबरच त्या भरून काढण्याचेही भान आले.

सज्ञान होण्यापूर्वीच सयाजीरावांना बडोद्याबाहेर प्रवासासाठी निघण्याची संधी मिळाली आणि ही प्रवासाची त्यांची आवड पुढे इतकी वाढली की, त्यांना 'गैरहजर' राजा अशा टोपणनावानेच काही मंडळी ओळखत असत.

पुढे आठवा एडवर्ड म्हणून गादीवर आलेल्या ब्रिटिश राजपुत्राने नोव्हेंबर 1875 मध्ये मुंबईला भेट दिली. त्या निमित्ताने सयाजीरावांना लवाजम्यासह 4 ऑक्टोबर रोजी प्रथम मुंबईला जावे लागले. मुंबईत ते सव्वीस दिवस राहिले. या वास्तव्यात मुंबईचे गव्हर्नर सर फिलिप वुडहाउस, व्हाइसरॉय लॉर्ड नॉर्थब्रुक आणि खुद्द शाही पाहुणे यांच्याशी त्यांच्या दरबारी मुलाखती झाल्या. मुंबईची प्रेक्षणीय स्थळेही त्यांनी पाहिली. राजपुत्र (प्रिन्स ऑफ वेल्स) यांनी बडोद्याला परतभेट दिली, तेव्हा शाही पद्धतीने त्यांचे आदरातिथ्य करण्यात आले. युरोपीय चालीरीतींचा परिचय नसल्याने शाही पाहुण्यांच्या आगतस्वागतात सयाजीरावांना प्रमुख भूमिका बजावता आली नाही. पुढील काळात ही उणीव त्यांनी भरून काढली पण अशी तयारी करण्याची गरज आहे, याची जाणीव करून देण्यात हा प्रसंग महत्त्वाचा ठरला.

पुढच्याच वर्षी सयाजीरावांना लगोलग दुसऱ्यांदा बडोद्याबाहेर प्रवास करावा लागला. 1876 साली त्यांना दिल्लीला जावे लागले. दिल्लीला ही त्यांची पहिलीच भेट असून ती सरकारी पातळीवरील होती. दिल्लीत आलेले नवीन व्हाइसरॉय लॉर्ड लिटन यांनी 1 जानेवारी 1877 रोजी दरबार भरवून राणी व्हिक्टोरिया हिंदुस्थानची महाराणी झाल्याचे जाहीर करण्याच्या निमित्ताने एक समारंभ आयोजित केला. महाराजांची स्वारी 15 डिसेंबर 1876 रोजी दिल्लीस पोहोचली. त्यांच्या परिवारात एकूण 1046 लोक होते. पण मौजेची गोष्ट अशी की, घोडे, हत्ती, उंट आणि बैल असे 182 प्राणीसुद्धा त्या दौऱ्यात बरोबर होते व दिल्लीच्या रस्त्यांतून ते चालत आले होते. या दरबारच्या वेळी 'फर्जंद-इ-खास-इ-दौलत-इ-इंग्लिशिया' ('ब्रिटिश साम्राज्याचा लाडका पुत्र') असा किताब महाराजांना बहाल करण्यात आला. शिवाय कित्येक संस्थानी अधिकाऱ्यांनाही निरनिराळे किताब मिळाले. महाराजांनी परत येताना आग्रा, लखनौ, बनारस आणि अलाहाबाद या शहरांना भेटी दिल्या. उत्तर हिंदुस्थानच्या या सफरीला एक महिना आणि सव्वीस दिवस लागले. जुलै 1877 मध्ये महाराणी जमनाबाईंना 'क्राउन ऑफ इंडिया' अशी किताबत देण्यात आली व त्यांच्या सन्मानार्थ जमनाबाई हॉस्पिटल स्थापन करण्यात आले. त्याच काळात सयाजीरावांचे प्रिय जन्मदाते काशीराव यांचे 26 जुलै रोजी निधन झाले. सयाजीरावांना या गोष्टीचे विशेष दुःख झाले.

सयाजीराव नव्या जीवनक्रमात हळूहळू रुळू लागले होते. त्यांची घडून येत असलेली प्रगती त्यांच्या पालकांना अनेक प्रकारे समाधानकारक वाटत होती. मेलव्हिल यांना वाटले, 'एका बळकट आणि काटक तरुणात त्यांची वाढ झपाट्याने होत आहे_ अतिशय उद्यमशील असून. . . त्यांना मैदानी खेळांचा आणि व्यायामाचा छंदच जडला आहे.' एलियटना तर त्यांच्यात दोष म्हणून दिसत नव्हता. त्यांच्यासारखा 'सालस आणि प्रेमळ शिष्य शोधूनही मिळणार नाही' असे त्यांचे मत होते. आता मातोश्रींना मात्र त्यांच्या विवाहाची काळजी लागून राहिली होती पण त्यांच्यापूर्वी आधी युवराज्ञी ताराबाईचा विवाह होणे अगत्याचे होते. तेव्हा 'वरसंशोधन' व 'वधूसंशोधन' एकदमच सुरू झाले. अनुरूप वधूवरांची छायाचित्रे आणि कुंडल्या यांचा ओघ सुरू झाला. त्यांची छाननी करण्यात येऊ लागली. पुण्यात रांगेत उभी करून वधूवरनिवडीचा एक कार्यक्रमही पार पडला; पण त्यातून काहीच निष्पन्न झाले नाही. अखेर खुद्द दिवाणसाहेबच संशोधनार्थ बाहेर पडले आणि त्यांनी काही अनुरूप वधूवरांची निवड केली. ताराबाईचा वाङ्निश्चय सावंतवाडीच्या रघुनाथराव सरदेसायांशी झाला, तर सयाजीरावाचा विवाह तंजावरच्या राजघराण्याचे आप्त हैबतराव मोहिते यांची कन्या लक्ष्मीबाई यांच्याशी ठरला. प्रथमतः 21 डिसेंबर 1879 रोजी ताराबाईचा विवाहसोहळा यथोचित थाटामाटात साजरा झाला. पुढे पंधरवड्यानेच, 6 जानेवारी 1880 रोजी सयाजीरावांचा विवाह साजरा झाला. त्यांच्या विवाहाचा आनंदसोहळा जवळजवळ एक महिनाभर उत्साहाने चालू होता. पुढे महाराजांचे निवासस्थान बनलेल्या त्या राजवाड्याचा पायाभरणी समारंभही याच काळात घडून आला. शिल्पसौंदर्य आणि उद्यानशोभा यांसाठी ख्यात झालेल्या या लक्ष्मीविलास पॅलेसचे बांधकाम 12 जानेवारी 1880 रोजी सुरू झाले. खंडेरावांचे नाव मकरपुरा पॅलेसशी तर मल्हाररावांचे नाव नजरबाग पॅलेसशी निगडित झालेलेच होते, त्यामुळे या नव्या पॅलेसला सयाजीरावांच्या पत्नी 'लक्ष्मी'बाई यांचे नाव (त्यांचे विवाहोत्तर नामकरण चिमणाबाई असे बदललेले असूनही) दिले गेले. या नव्या राजवाड्याचे बांधकाम पुढे दहा वर्षांनी म्हणजे 1890 मध्ये पूर्ण झाले.

सयाजीरावांचे शिक्षण पूर्ण झाले होते तसेच ते वयात येऊन त्यांचा विवाहही झाला होता; तेव्हा जमनाबाईनी सयाजीरावांकडे गादीचे सर्वाधिकार सुपूर्द करण्यासाठी हिंदुस्थान सरकारकडे अर्ज केला. दिवाण सर टी. माधवराव, गव्हर्नर जनरल यांचे प्रतिनिधी व दिवाणांचे अन्य सहकारी यांच्या दक्षतेमुळे प्रशासनात बोकाळलेले कित्येक अपप्रकार बऱ्याच प्रमाणात दूर झालेले होते, ही महाराजांच्या दृष्टीने मोठी भाग्याची गोष्ट होती. तसेच गतिशील, संपन्न आणि कल्याणकारी राज्याची भक्कम पायाभरणीही झाली होती. या बाबतीत दिवाणांचे कर्तृत्व विशेषच कारणीभूत ठरले होते. दिवाण सर टी. माधवराव यांचा जन्म तंजावरच्या महाराष्ट्रीय ब्राह्मण कुटुंबात झालेला असून त्यांचे शिक्षण मद्रास येथे झाले होते. काही काळ मद्रास विद्यापीठात त्यांनी प्राध्यापक म्हणून

काम केले होते. त्यांचे घराणेच राजकारणी मुत्सद्द्यांचे होते. त्यांचे वडील त्रावणकोर संस्थानचे दिवाण होते. सर टी. माधवरावांनीही चौदा वर्षे ते पद कर्तृत्वशालीतेने भूषविले होते. त्या संस्थानच्या प्रशासनावर त्यांनी आपल्या व्यक्तित्वाचा ठसा उमटविला होता व भारतातील एक सर्वोत्कृष्ट संस्थान म्हणून त्याला प्रतिष्ठा प्राप्त करून दिली होती. 1873 साली ते इंदूर संस्थानचे दिवाण झाले होते व वर उल्लेख केल्याप्रमाणे दोनच वर्षांनी ते बडोद्याला आले होते. मे 1875 मध्ये त्यांनी बडोद्याच्या कारभाराची सूत्रे हाती घेतली. कारभाराची साफसफाई करण्याचे कार्य एकट्याला करता येण्यासारखे नव्हते, तेव्हा त्यांनी काही अनुभवी आणि विश्वासू मित्रांचे सहकार्य संपादन करून त्यांना बडोद्याला बोलावून घेतले. माधवरावांना कोऱ्या पाटीवरच जणू आपले कार्य सुरू करावयाचे होते; कारण त्यांच्या आगमनाच्या वेळी संस्थानचा खजिना जवळजवळ रिताच झालेला होता. कारभारविषयक दप्तर म्हणावे तसे नव्हतेच आणि जे काही होते. त्यात अगदी अनागोंदी होती. आधीच्या राजवटीत ज्या सावकारांनी संस्थानला कर्जे दिलेली होती, त्यांनी ती परत केली जावी, म्हणून हाकाटी सुरू केली होती. संस्थानचे जडजवाहिर व अन्य मौल्यवान वस्तू यांपैकी कशाचीच रीतसर यादी नव्हती. महसुलाची वसुली करणारे अधिकारी लोकांवर जुलूम करीत व त्यामुळे प्रजाजन अगदी जेरीस आलेले होते. सर रिचर्ड मीड यांनी म्हटल्याप्रमाणे बडोदा शहराबाबत प्रशंसनीय असे काहीच नव्हते; त्यांच्या दृष्टीने ते एक रद्दी स्थळ होते. चांगल्या पिण्याच्या पाण्याचीही तेथे टंचाई होती. उघड्या गटारांमुळे कॉलऱ्याची साथ दरवर्षी उद्भवे. सूर्यप्रकाशाला मज्जाव असणाऱ्या कोंदट घरांतून लोक गुराढोरांसह वास्तव्य करीत असल्याचे खुद्द दिवाण माधवरावांनी आपल्या नजरेने पाहिले होते.

संस्थानाच्या पुनर्रचनेचे कार्य महाकठीणच होते. बडोदा संस्थानाचा मुलूख काठेवाडसह सर्व गुजरातभर विखुरलेला होता व त्याच्या सरहद्दी ठिकठिकाणी ब्रिटिश मुलुखाला व अन्य संस्थानी प्रदेशांना भिडलेल्या होत्या. अर्थातच त्यातून कित्येक गुंतागुंतीचे प्रश्न निर्माण झालेले होते. रस्ते व रेल्वे ही दळणवळणाची साधने चांगलीशी नसल्याने शासनयंत्रणेचे दुवे नीट जोडणे व कारभारावर नीट देखरेख करणे अशक्य नसले, तरी मोठ्या मुष्किलीचे होते. शिवाय ओखा मंडळातील वघेरा किंवा संखेडा, बहादरपूरमधील मेवासी भिल्ल यांसारख्या गुन्हेगार जमाती तसेच शासनाला धाब्यावर बसविणारे अमरेली महालातील ठाकूर अधूनमधून धुमाकूळ घालीत व प्रशासनावर त्यांचा जास्तीत जास्त ताण पडत असे.

मात्र येथे हे नमूद केले पाहिजे की, दादाभाई नौरोजी यांच्या दिवाणपदाच्या राजवटीत काही चांगले पायंडे पाडले गेले होते व त्यांचे श्रेय दादाभाईनाच दिले पाहिजे. नजराणा-पद्धती आणि वेठबिगार त्यांनी बंद केली होती. देहदंडाची शिक्षाही त्यांनी रद्द केली होती. ज्यांची मालमत्ता जबरदस्तीने जप्त करण्यात आलेली होती, त्यांच्या अर्जांची

दखल दादाभाई जातीने घेत, मात्र या कामात रेसिडेंटचा हस्तक्षेप हा मोठा अडथळा होता. कोणाची तरी तळी उचलून कामात खो घालण्याची त्याला सवय होती; त्यामुळे प्रश्न लोंबकळत राहत. पण प्रशासनाची सुधारलेली नवी पद्धत अमलात आणून विविध खात्यांची पुनर्रचना करण्यास दादाभाईनी नेटाने प्रारंभ केला होता. "जास्तीत जास्त लिलाव बोलणारास न्यायाधिकार विकण्याची पद्धत हा बडोदे संस्थानच्या कारभारावरील फार मोठा कलंक होता. ही पद्धत त्यांना राजाशी झगडूनच बंद करावी लागली." दादाभाईच्या आदेशाने आणि मार्गदर्शनाने दिवाणी व फौजदारी अशी उभयविध दंडविधाने तयार करण्याचे कार्य सुरू झालेले होते. पण मागे उल्लेख केल्याप्रमाणे अत्यंत दुर्दैवी परिस्थितीत दादाभाईना बडोद्यातून जावे लागले. प्रगतीशील प्रशासनाचा हा प्रयोग थंडावला. खरे पाहता, कार्यासाठी आवश्यक असणारा कालावधी, खुशीचे सहकार्य आणि उत्साही सहानुभूती रेसिडेंट वा मल्हारराव यापैकी कोणाकडूनही दादाभाईना मिळालीच नाही. सर टी. माधवराव यांनी हे सारे मिळविलेच; शिवाय मुख्य गोष्ट म्हणजे त्यांच्या हाती पुरेशी सत्ताही आलेली होती. अशा प्रकारे संस्थानाची नौका, दिवाणसाहेबांच्या भाषेत सांगायचे तर, 'सर्व वर्गांचे सुखसमाधान समप्रमाणात वर्धिष्णू करीत नेण्याच्या' बंदराला मोठ्या आत्मविश्वासाने हाकारण्यात आली होती.

संस्थानी प्रशासनाचे दैनंदिन चाकोरीतले काम करावेच लागत होते; पण त्याखेरीज भोवतालच्या मांडलिकांबरोबरचे संबंध, दरबारी भेटी, सणसमारंभ, शांतचित्ताने घ्यावयाची वैयक्तिक तक्रारींची दखल व संस्थानची वित्तव्यवस्था भक्कम पायावर उभारण्याचे भगीरथ प्रयत्नांचे कार्य अशा अन्य गोष्टींकडेही बडोदे-प्रशासनाला तातडीने लक्ष पुरवावे लागले. त्यासाठी दिवाणसाहेबांनी एक हुजूरकचेरी थाटून कारभाराची निरनिराळी खाती आपल्या सल्लागारांकडे सोपविली, दिवाणांच्या अध्यक्षतेखालीच त्यांचे कामकाज चाले. सर्वंकष स्वरूपाचा एक दहा कलमी कार्यक्रम दिवाणांनी आखला व 'कायदा व सुव्यवस्था, न्यायदानाची चोख पद्धती, सार्वजनिक बांधकामांची वाढ, शिक्षण, वैद्यकीय साहाय्य, वित्तीय व्यवहार व शासनयंत्रणा या बाबतीत वाढविकासाचे धोरण राखणे हे उत्तम प्रशासनाचे आधारतत्त्व असते. त्याला धरूनच या सर्व गोष्टींचा त्या कार्यक्रमात अंतर्भाव झालेला होता.' सर टी. माधवरावांनी पाश्चात्त्य ज्ञानविज्ञान अगदी उत्तम रीतीने आत्मसात केलेले होते. साहजिकच प्रगतिपर आणि उदार विचारप्रणालीने त्यांना कार्यप्रवृत्त केले होते. त्यामुळेच संस्थान आणि राजपद यांच्याविषयींच्या मध्ययुगीन संकल्पनांना मुरड घालून त्यांना आधुनिक रूप देणे दिवाणसाहेबांना शक्य झाले. आपले अंतिम उद्दिष्ट साध्य होण्याच्या दृष्टीने आवश्यक त्या गोष्टी अमलात आणण्यासाठी दिवाणसाहेबांना साडेसहा वर्षांचा कालावधी मिळाला.

मल्हाररावांच्या पदच्युतीच्या प्रसंगी बडोद्याच्या सरदारदरकदारांनी खूपच संयमी वर्तन ठेवले होते. पण नव्या प्रशासनाच्या कारभाराने आपल्या खास हक्कांवर गदा

येत असल्याचे आढळून येताच त्यांनी कुरबुरीला प्रारंभ केला. त्यांना नवी राजवट एखाद्या वेताळासारखी आपल्या मुळावरच आल्यासारखी वाटली. या बदलत्या परिस्थितीचा फायदा घेऊन त्यांनी जे दावे मांडायला सुरवात केली होती, ते अवाच्या सवाच होते. हे सरदार मध्ययुगाचे अवशेषच होते आणि आता राज्याच्या आधुनिक संकल्पनेशी जुळवून घेण्याची पाळी त्यांच्यावर आलेली होती. अशा स्थितीत खंबीरपणाने आणि मुत्सद्देगिरीनेच कार्यभाग साधणार होता. या मंडळींचे खटले चालविण्यासाठी सरदारी न्यायालय म्हणून एक खास पीठ स्थापन करण्यात आले. त्यांच्या गाऱ्हाण्यांची कसून चौकशी करून अन्यायांचे परिमार्जन करण्यात आले आणि 1879-80 च्या सुमारास सरदार मंडळींनी नव्या प्रशासनाशी स्वतः होऊन जुळवून घेतले. असेच सुधारणापर आणि सामोपचाराचे धोरण राखून महाराजांविरुद्ध सावकार-जवाहिऱ्यांनी केलेले दावेही दिवाणांनी मिटविले.

पुनर्रचनेच्या प्रक्रियेत मातोश्री राणी जमनाबाईकडे खाजगी खाते सोपविण्यात आले होते. मात्र या खात्याच्या कारभाराची माहिती त्यांनी दिवाणांना द्यावयाची असे. खाजगी खात्यासाठी मंजूर झालेल्या अंदाजपत्रकी रकमेहून जादा खर्च त्या खात्याकडून होता कामा नये, अशी अपेक्षाही असे. गव्हर्नर जनरलचा प्रतिनिधी व एक खास कमिशनर लष्करी बाबींवर देखरेख ठेवी. "दिवाणसाहेबांचे काम कमी करणे हा यामागील हेतू आहे," असे सांगण्यात येत असे. शासनाने लष्करासाठी स्वतंत्र बराकी आणि एक रुग्णालयही बांधले होते. सन 1879 मध्ये शाळा आणि कॉलेज यांच्या नव्या इमारतींचे पायाभरणीचे समारंभ झाले. शहरात एक उद्यान तयार करण्यात आले. 'कामाटी बाग' म्हणून ते उद्यान ओळखले जाते. शासकीय कार्यालयांसाठी स्वतंत्र नव्या इमारती बांधण्याचे आदेश निघाले. शक्य तेथे रस्ताबांधणीचे काम हाती घेण्यात आले. मात्र प्रस्तुतचा कार्यक्रम एकंदरीत फारसा तडीस गेला नाही. रेल्वेची वाढ काही एका मर्यादेपर्यंतच करण्यात आली. जेथे गायकवाड बडोदा स्टेट रेल्वे (जी. बी. एस्. आर) वाढविण्यात आली, त्या भागात रस्ताबांधणी अल्प प्रमाणातच झाली. संबंधित प्रदेशातील व्यापाराची मक्तेदारी स्वतः महाराजांच्या हातात राहावी, या उद्देशाने हे करण्यात आले, असा त्यासंबंधी लोकांचा खरा-खोटा समज होता.

तरीसुद्धा पूर्व राजवटींनी जबरदस्तीने बसविलेले आणि लोकांत अप्रिय असणारे कित्येक कर रद्द केल्याबद्दल माधवरावांचे स्मरण प्रजाजनांना विशेष राहील. सुताराच्या व गवंड्याच्या व्यवसायांवरसुद्धा कर होते; दूध, भाजीपाला, लाकूड व गवतासारखे इंधन, ऊस आणि अन्य अनेकानेक वस्तूंवर बोजा कमी झाला. तरीही हा भार सुमारे 25 टक्क्यांनीच हलका झाला होता आणि इतके करूनसुद्धा भोवतालच्या ब्रिटिश प्रदेशाहून करांचा बोजा बडोद्यात अधिक होता, हे मान्यच झालेले होते. हळूहळू कायम स्वरूपाची गंगाजळी निर्माण करण्यात आली. त्यामुळे दिवाणसाहेबांनी राज्यसूत्रे

सयाजीरावांच्या हाती सुपूर्द केली, तेव्हा संस्थानची आर्थिक स्थिती चांगली भक्कम होती.

बडोद्यात इतिहासाची पुनरावृत्ती होऊ नये यासाठी, पूर्वी ब्रिटिश सरकारने म्हैसूर संस्थान वोडियार घराण्यातील राजाकडे सोपविताना तयार केलेल्या म्हैसूर संस्थानच्या राज्यघटनेच्या धर्तीवर बडोदे संस्थानासाठी राज्यघटनेचा एक खर्डा दिवाणसाहेबांनी तयार केलेला होता. या मसुद्यात घटनात्मक राज्यसत्तेचे तत्त्व ग्रथित केलेले होते. संमतीसाठी मसुदा व्हाइसरॉय लॉर्ड रिपन यांच्याकडे पाठविण्यात आला. या मसुद्याने बडोदे संस्थानला निव्वळ जमीनदारीचे स्थान राहील, असे मत काही मंडळींनी प्रकट केले होते. सर टी. माधवराव यांच्या चरित्रकाराने मात्र ही टीका अनाठायी असल्याचे नमूद केले आहे. राजा आणि प्रजा या उभयतांनी अत्यंत जिव्हाळ्याने आणि एकमेकांना समजून घेऊन वागावे, हे उत्तम प्रशासनामागील आदितत्त्व असते, ही गोष्ट ध्यानात न घेताच केलेली ही टीका होती, असे या चरित्रकाराचे मत दिसते. घटनेचा हा मसुदा अखेर स्वीकारण्यात आलेला नसला, तरी 1880-81 साली एका संस्थानचा दिवाण अशा प्रकारच्या उच्च ध्येयाने प्रेरित व्हावा, ही गोष्ट खचितच उल्लेखनीय होय. आपले वर्चस्व कायम राखण्याची दिवाणांची इच्छा होती, असे मत महाराजांच्या कुटुंबात मात्र 1881 नंतरही प्रचलित होते; त्यामुळे सयाजीराव दिवाणसाहेबांवर अप्रसन्नच राहिले. बडोदे संस्थानातील बहुसंख्य प्रजेची भाषा गुजराती असल्याने तिला राजभाषा म्हणून मान्यता देण्यात दिवाणांनी दूरदृष्टीच दाखविली. 1877-78 साली संस्थानी ग्रंथालयाची स्थापना करण्यात आली होती; महाराजांनी आपल्या कारकीर्दीत ही ग्रंथालयांची चळवळ खूपच विस्तृत केली

अज्ञान पालकाच्या राजवटीत संस्थानाने प्रगतीच्या दिशेने इतक्या टप्प्यापर्यंत वाटचाल केलेली होती की, आता तेथून मागे फिरणे अशक्य होते. यामुळे अगदी विसाव्या शतकात ब्रिटिश सरकारलाही हेवा वाटावा, अशी येथील स्थिती होती. बडोदे संस्थानच्या इतिहासातील या निर्णायक काळात ब्रिटिश सरकारने मात्र आपल्या आक्रमक साम्राज्यवादी धोरणाची तीव्रता वाढविण्याचे तंत्र अंगीकारले होते. सत्ता हस्तगत करण्यात किंवा एकूण संधीचा फायदा घेण्यात जराही विलंब झालेला त्यांना खपत नव्हता, विशेषतः काही बाबी पणाला लागत, तेव्हा ब्रिटिश सरकार फाजील सावधपणा दाखवी. त्यातही वित्तीय आणि सैनिकी बाबतीत तर ते हळवे आणि चिडखोर बनत. हिंदी राजकीय कायद्यानुसार ते देशी संस्थानांशी वर्तन राखीत, तेव्हा प्रायः साम्राज्यवाद आपल्या सार्वभौम सत्तेचे रूप धारण करीत असे. अज्ञान पालकाच्या राजवटीत बडोदे संस्थानात या सार्वभौम सत्तेला हातपाय पसरण्यास खूपच वाव मिळाला. सार्वभौम सत्तेच्या सर्वंकष सामर्थ्याची आणि संस्थानचा एखादा अनिर्णीत तंटा किती मर्यादेपर्यंत ताणता येतो, याची दिवाणसाहेबांना पूर्ण कल्पना होती. शिवाय त्यांच्या दिमतीला सल्लागार समितीही होती आणि त्या समितीची प्रेरकशक्ती रेसिडेंटच असे. यामुळे त्या काळात संस्थानच्या

काही महत्त्वाच्या हितसंबंधांची हानी होणे स्वाभाविकच होते. विवाद्य प्रश्नांच्या संदर्भात काही किरकोळ फायदे दिवाण मिळवू शकत. असे एक विवाद्य प्रकरण म्हणजे मीठाच्या उत्पादनाच्या मक्तेदारीचा प्रश्न. संस्थानाने स्वतःहून मीठाचे उत्पादन करू नये, अशी बंदी घालण्याचा निर्णय ब्रिटिश सरकारने घेतला. शिवाय 'कायदेशीर शासनाच्या तरतुदीनुसार गुजरातमधील मीठाचे सारेच्या सारे उत्पादन' बंद करण्यास बडोदे संस्थानला भागही पाडले. तसेच या उत्पादनाच्या संबंधातील गुन्हेगारांनी बडोदे संस्थानच्या मुलुखात आश्रय घेतल्यास त्यांना पकडण्यासाठी ब्रिटिशांच्या प्रतिबंधक अधिकाऱ्यांना संस्थानच्या हद्दीत येण्याची परवानगी देण्याबाबतही राज्यावर सक्ती करण्यात आली. अनेक प्रकारे युक्तिवाद व मनधरणी करून मोठ्या मिनतवारीने, ओखा मंडळातील मीठ काठेवाड द्वीपकल्पातील संस्थानी मुलुखात पाठविण्याची सवलत दिवाणांनी पदरात पाडून घेतली होती. या उत्पादनाद्वारे हिंदुस्थान सरकारला फार मोठे उत्पन्न होत असल्याने अज्ञान पालकाची राजवट असती वा नसती, तरी मीठाच्या प्रश्नाबाबत काहीही ऐकण्यास सरकार तयारच झाले नसते. तेव्हा या बाबतीत दिवाणांनी संस्थानच्या हिताचा बळी दिला, असे जे काही मंडळी म्हणतात, ते बरोबर नाही. हा प्रश्न धसास लावण्याचा प्रयत्न पुढे खुद्द महाराजांनीही केला; पण त्यांच्या प्रयत्नालासुद्धा म्हणावे तसे यश आले नाही. यावरून या प्रश्नासंबंधी ब्रिटिश सरकारचे धोरण कसे वज्रलेप झालेले होते, हे दिसून येईल.

संस्थानात अफूची लागवड करण्याच्या प्रश्नाबाबतही बडोदे-प्रशासनाला नमते घ्यावे लागले होते व परिणामी संस्थानी उत्पन्नाचे एक भरघोस साधन गमावून त्याला खूपच नुकसान सोसावे लागले. ब्रिटिशांच्या हुकमांना 'ब्रिटिश सल्ला' असे म्हटले जाई; पण अशा 'सल्ल्यां'ना धरूनच संस्थानी सैन्यासाठी लागणारी शस्त्रास्त्रे व दारूगोळा यांचे उत्पादन संस्थानात न करता फक्त ब्रिटिशांकडूनच तो खरेदी केला पाहिजे, हा 'सल्ला' दिवाणांना मान्य करावा लागला. पुढे जेव्हा महाराजांनी हा 'सल्ला' मानण्यास नकार दिला, तेव्हा ब्रिटिश सरकारने सत्तेचा वापर करून सूड उगवण्यास कमी केले नाही. मागणी केल्यावरही बडोदे लष्करासाठी अद्यावत शस्त्रास्त्रे पुरविण्यास ब्रिटिश सरकारने नकार दिला. महाराजांना या वृत्तीचे वैषम्य वाटले. एक महत्त्वपूर्ण हक्क आपण गमावून बसलो व रीतसर झालेला करार पाळण्यास आपण केंद्र सरकारला भाग पाडू शकलो नाही, याचे त्यांना अधिक दुःख झाले.

सन 1881 साली अज्ञान पालकाची राजवट संपुष्टात येत असताना आणखी एका ब्रिटिश मागणीला मान्यता देणे सर टी. माधवराव यांना भाग पडले. मांडलिक असणाऱ्या परगण्यांचा पोलीस बंदोबस्त राखण्याचे काम बडोदा-तुकडीने पार पाडावयाचे असे. पण ते तिला नीट करता येत नाही, या सबबीवर ब्रिटिश सरकारच्या फौजेने ते हाती घेतले होते. तेव्हा या फौजेच्या खर्चापोटी दरवर्षी पावणेचार लाख रुपये द्यावे, असे

दिवाणांना सांगण्यात आले. पण या प्रकरणातील ब्रिटिशांची ही सूचना मान्य करण्यापूर्वी, राणी जमनाबाई आणि लवकरच सर्वाधिकार हाती घेणारे सयाजीराव, या उभयतांचा सल्ला घेण्याची दक्षता दिवाणांनी घेतलेली होती.

ब्रिटिश सरकारच्या आक्रमक मागण्यांविरुद्ध खंबीर भूमिका घेणे उचित नसे आणि शक्यही नसे, हे येथे ध्यानात ठेवले पाहिजे. कडक धोरणाने परस्परसंबंधांमध्ये कटुताच वाढली असती आणि संस्थानचे म्हणणे नामंजूर झाले असते ते वेगळेच. अशा एकूण परिस्थितीत चलन, रेल्वे, टपाल व तार, नाविक क्षेत्र, परकीय नागरिकांचे खाते व अशाच तत्सम अधिकार क्षेत्रांबाबत मूळ तहात कसलाही उल्लेख झालेला नसल्याने तत्संबंधातील संस्थानची भूमिका लंगडीच ठरत असे व संस्थानला अशा गोष्टींत नमतेच घ्यावे लागे. तरीसुद्धा मीठ, अफू किंवा फौजेची तुकडी यांच्या संदर्भात ब्रिटिश सरकारची भूमिका समंजसपणाची नाही, हे ध्यानात घेऊन दिवाणांनी खूपच खंबीरपणा दाखविला. तहातील अटींनुसार मिळालेल्या हक्कांवर अनुचित आक्रमण होत असता दिवाणांनी सर्व शक्तीनिशी विरोध दर्शवावयास हवा होता, किंवा महाराज लवकरच राज्यसूत्रे हाती घेणारच असल्याने, ते अधिकृतरीत्या कारभार करू लागेपर्यंत असे प्रश्न स्थगित ठेवावेत, अशी विनंती तरी त्यांनी सार्वभौम सत्तेला करावयास हवी होती व हे सारे प्रयत्न फसताहेत असे दिसल्यावर आपल्या पदाचा राजीनामा देण्याचे धैर्य दाखवावयास हवे होते; पण सर टी. माधवरावांसारख्या कर्तबगार व्यक्तीने असा खंबीरपणा दाखवला नाही, ही खेदाची गोष्ट होय. ब्रिटिशांनी यांची नेमणूक केली, त्या अर्थी ते ब्रिटिशांच्या हातचे बाहुले आहेत, असा गैरसमज लोकांत आधीच पसरलेला होता. जेव्हा जेव्हा दिवाणसाहेब ब्रिटिशांच्या दडपणाला बळी पडले, तेव्हा तेव्हा ज्यांनी त्यांना ब्रिटिश-एजंट मानले होते, त्यांच्या तरी मनात, दिवाणसाहेब संस्थानच्या हितापेक्षा आपल्याच स्थानाला जपत आहेत, असा समज अधिक दृढ होत गेला. पण त्यांच्या जागी अन्य कोणी व्यक्ती असती, तरी सार्वभौम सत्तेच्या दडपणाला तोंड देणे तिलाही कठीणच गेले असते, हे त्याबरोबरच मान्य केले पाहिजे.

अशी उलटसुलट मतमतांतरे असली, तरी राजा सर टी. माधवराव (सन 1877 च्या दिल्ली दरबारात त्यांना 'राजा' हा किताब मिळालेला होता) हे आपणांस परिचित असणाऱ्या बडोद्याचे एक शिल्पकार होते. ज्या प्रशासन यंत्रणेच्या आधारे सयाजीरावांनी कल्याणकारी राज्याची इमारत उभारली आणि आपले स्वप्न बहुतांशी साकार केले, त्या उत्तम प्रशासन यंत्रणेचा पाया सर टी. माधवराव यांनीच खरोखर घातला होता.

तीन

# स्वाधीनतेची राजवट

मागे उल्लेख केल्याप्रमाणे सयाजीरावांच्या हाती सर्वाधिकार सुपूर्द करावे, म्हणून आधीपासूनच प्रयत्न सुरू झालेले होते. हा बदल लवकरात लवकर घडून यावा, अशी त्यांतल्या त्यात महाराणी जमनाबाईची तीव्र इच्छा होती. या प्रयत्नांमध्ये त्यांना एलियटचे विशेष साहाय्य झाले. एका बाजूला आपल्या मसुद्याला मंजुरी मिळविण्याची दिवाणांची खटपट मात्र चालूच होती. या उभय उद्योगांची कार्यवाही एकाच वेळी पण परस्परांशी संबंध न येता, स्वतंत्रपणे चालू होती, असे दिसते. एकमेकांच्या या उद्योगांची माहिती परस्परांना नव्हती, असे मात्र नाही. हा प्रकार वरवर निरुपद्रवी वाटला, तरी प्रत्यक्षात, व्यक्तिनिष्ठ निरंकुश कारभार आणि लोकशाही स्वरूपाचा राज्यकारभार यांमधील तो झगडा होता. सर्वोच्च राजसत्तेने 28 डिसेंबर 1881 रोजी सयाजीरावांच्या हाती सर्व सत्ता देण्याचा निर्णय घेतला. या वार्तेमुळे दिवाणसाहेब आश्चर्यचकित झाले, ही गोष्ट सुपरिचितच आहे. गेली सहा वर्षे माधवराव जवळजवळ राजपदच उपभोगत होते, आता यापुढे आपणाकडे केवळ दिवाणपदी राहणार, ही बाब त्यांना खटकली असणार. तरीसुद्धा आपल्या या नव्या दुय्यम स्थानाशी त्यांनी काही काळ जुळवून घेतले.

महाराजांच्या औपचारिक राज्यारोहणाचा समारंभ नियोजित दिवशी मोठ्या थाटामाटाने आणि आनंदोत्सवपूर्वक पार पडला. स्वतःला येता न आल्याने व्हाइसरॉयसाहेबांनी आपल्या वतीने मुंबईचे गव्हर्नर सर जेम्स फर्ग्युसन यांना हजर राहण्यास सांगितले व त्यांच्याबरोबर महाराजांसाठी अभिनंदनाचे पत्र पाठविले. व्हाइसरॉयनी आपल्या पत्रात 'उच्च पदाभोवती असणाऱ्या धोक्यां'बद्दल तरुण राजाला सावध राहण्याचा इशारा दिला होता, तर गव्हर्नरांनी केलेल्या भाषणात स्वकर्तव्ये निष्ठेने पार पाडल्यामुळे होणाऱ्या लाभांचा उल्लेख केला. सदर भाषणाला सयाजीरावांनी इंग्रजीत उत्तर दिले. भावी कार्याच्या दृष्टीने त्यांना जणू हा उत्तम वस्तुपाठच ठरला. आपल्या उत्तरात सयाजीरावांनी सर रिचर्ड मीड, पी. एस्. मेलव्हिल व राजा सर टी. माधवराव यांचा उल्लेख करून त्यांनी बडोदे संस्थानासाठी जी मोलाची कामगिरी बजावली होती, तिच्याबद्दल धन्यवाद दिले; त्यातल्या त्यात मीड यांनी बडोदे येथे जणू 'नवा जमाना'च सुरू करण्यासाठी जे प्रयत्न केले, त्याचा त्यांनी स्मरणपूर्वक व अगदी अगत्याने उल्लेख

केला. मीड यांनी जो 'व्यापक राजमार्ग आखून दिला, त्याला वाट पुसतच न्याय, सुरक्षितता, समृद्धी आणि प्रतिष्ठा' यांच्या दिशेने आपण पुढील वाटचाल करू शकलो आहोत, याबद्दल सयाजीरावांनी कृतज्ञता व्यक्त केली. भाषण, अर्थातच खुद्द महाराजांनी तयार केलेले नव्हते. तरीपण त्यातील चतुर्विध उद्दिष्टे साध्य करण्यासाठी सयाजीरावांच्या राजवटीत प्रयत्न झाला, ही गोष्ट उल्लेखनीयच होय.

मागील साडेसहा वर्षे सयाजीरावांनी जे ज्ञान संपादित केले होते, ते केवळ तात्त्विक पातळीवरचे होते शिवाय ते ज्ञान इतके सज्जड रीतीने भरविले गेले होते की, त्याविषयी त्यांच्या मनात थोडीफार नावडच निर्माण व्हावी. तरीपण ते अभ्यासिकेतील मेजाला आणि पुस्तकांना चिकटून राहिले. त्या काळापासूनच त्यांच्या अंगचे दोन गुण प्रकर्षाने दृग्गोचर होऊ लागले. ते म्हणजे कार्यैकनिष्ठा आणि चिकाटी. त्यांनी बडोदे राज्य म्हणजे जणू एक प्रयोगशाळा वा कार्यशाळाच बनविली. प्रयोगांचा पाठपुरावा करीत आपल्या कल्पना साकार करण्याच्या दृष्टीने सन 1925 मध्ये त्यांनी आपल्या एका सहकाऱ्याला म्हटले होते, "माझ्या जीवनात ढिलेपणाला, विश्रांतपणाला वाव राहिलेला नाही. अर्थात ही एक चूकच झाली आहे. माझे जीवन जर का मला पुन्हा जगता आले, तर ती चूक मी सुधारीन." त्यांचे व्यक्तित्व म्हणजे मूर्तिमंत काम, राज्य करणे हे त्यांचे वेड आणि सत्ता हा त्यांचा जणू आत्माच होता. त्यांना आतापर्यंत प्रत्यक्ष राज्यकारभाराचा अनुभव नव्हताच. संस्थानातील निरनिराळ्या प्रदेशांना भेट देण्याचीही त्यांना संधी मिळालेली नव्हती. यामुळे पुढील पंधरा वर्षांच्या काळात, शासनयंत्रणेचा परिचय करून घेणारा तसेच आपल्या हक्कांची व कर्तव्यांची माहिती करून घेणारा एक शिकाऊ उमेदवार म्हणूनच ते वावरले, आणि या बाबतींतली समज जसजशी अधिकाधिक वाढत गेली, तसतसा त्या गोष्टींचा धनीपणाच त्यांच्याकडे येत गेला.

या जडणघडणीच्या काळातच त्यांनी भावी काळाचे यथार्थ मानचित्र ठरवून टाकले होते. त्या वेळी देशात सुधारणेचे युग सुरू झाले होते. सुशिक्षित गुजराती लोकांच्या दृष्टीने व्यापक समाजसुधारणा व शिक्षण हे परवलीचे शब्द बनले होते, असा तो काळ होता. सयाजीरावांनी आधीच ध्यानात घेतले होते की, आपल्या राज्याच्या एकूण लोकसंख्येपैकी, सुमारे बावीस लाख, म्हणजे 95 टक्के लोक गुजराती भाषिक आहेत. त्यामुळे आपण गुजरात प्रांतातले एक मराठा अधिपती आहोत, हे ते चांगले जाणून होते म्हणून जातीपातीतील भेदाभेद विसरून आपण प्रथम आणि अखेर हिंदी आहोत, या भावनेने ते वर्तन ठेवू लागले. गुजरात्यांचा खास स्वभावगुणच त्यांनी जणू आत्मसात केला. सर्व देशभर किंबहुना सर्व जगभर व्यापार उदीम केल्याने गुजराती लोकांत एक विश्वकुटुंबी वृत्ती आढळते; संकुचितपणा त्यांच्या ठायी नसतो. व्यापार आणि उद्योगधंद्याचे स्वातंत्र्य त्यांच्या रक्तात मिनलेले असते. यासाठी कायदा आणि सुव्यवस्था यांची त्यांना इतकी गरज भासत असते की, एकदा तशी ती असली की, आपल्यावर कोण

राज्य करीत आहे, याची त्यांना पर्वा नसते. यामुळे तडजोड हा त्यांचा देहस्वभाव बनलेला आहे. भारतातील सर्व लोक आपले भाऊबंद आहेत, असे ते उदार मनाने मानतात. हिंदी राष्ट्रवादाकडे गुजराती माणसाचा स्वाभाविक कल असतो. अशा विचारप्रणालीशी सयाजीरावांचा अगदी प्रारंभिक जीवनातच संबंध आला. अर्थात ते, एक तर विश्वकुटुंबी वा एक तर राष्ट्रभक्त याहून वेगळे असे काही बनणे शक्यच नव्हते. 'हा विश्वकुटुंबी दृष्टिकोन– त्याच्या जोडीने जुनाट रूढी आणि पूर्वग्रह यांचा तिटकारा, या प्रवृत्तीमुळे बडोदे संस्थानला वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तित्व प्राप्त झाले आहे." दिवाणपदावरच्या तसेच राज्यातील इतर उच्च पदांवरच्या लोकांच्या नावांची यादी चाळली, तरी बडोद्यात 'अखिल भारतीय मेळा' जमला होता, असे आढळेल. जशी गुजराती, महाराष्ट्रीय माणसे दिवाणपदी होती,(आणि त्याला तशीच कारणेही होती.) तशीच बंगाली, मद्रासी, पंजाबी आणि इंग्रज अशी मंडळीही या मेळ्यात गोळा झाली होती. तसेच हिंदू, मुसलमान, पार्शी, ख्रिस्ती किंवा ज्यू मंडळींचाही त्यात अंतर्भाव होता. संस्थानात गुजराती आणि महाराष्ट्रीय अशा दोन प्रमुख जमाती होत्या व म्हणून प्रायः अन्य कोणत्या तरी जमातीतील गृहस्थाला दिवाणपदी नेमून समतोल राखण्याचे संस्थानचे सूज्ञ धोरण असे. जातपात, धर्म, वर्ण यांपैकी काही विचारात न घेता आपल्या प्रजेचे भवितव्य घडविण्यासाठी बुद्धिमत्ता आणि चारित्र्यसंपन्नता यांना प्राधान्य देण्याची दक्षता सयाजीरावांनी सतत राखली.

यानंतरच्या पाच दशकांच्या कालावधीत ज्या ज्या गोष्टी घडून आल्या त्यांची तपशीलवार नोंद करणे प्रायः अशक्यच आहे आणि या छोट्याशा चरित्रासाठी तशी सादृश गरजही नाही. 'अक्कलहुशारीने उपयोगात आणलेल्या प्रेरणाशक्ती'च्या बळावर संस्थानचा चेहरामोहरा आणि प्रजाजनांची स्थिती अशी बदलली की खरोखर नवल वाटावे. ही राजवट व्यक्तिच्छंदानुवर्तीच होती; पण तिचे म्हणून एक खास वैशिष्ट्य होते. जीवनाचा वाहता प्रवाह कुंठित करणाऱ्या वा तो उलट्या दिशेने वळविणाऱ्या शक्तींचा कठोरपणे नायनाट करण्यात येत होता आणि अधिकांचे अधिक हित साधणाऱ्या गोष्टींना जोमाने उत्तेजन दिले जात होते. आपल्या प्रांताची आणि प्रजेची चक्षुर्वैसत्यम् अशी माहिती व्हावी म्हणून महाराज सतत दौरे करू लागले. 'हुजूर सवारी'चे आगमन हे संस्थानातील नेहमीचे दृश्य होते. राज्यावर येताच पहिला दौरा त्यांनी 23 नोव्हेंबर 1882 रोजी उत्तर गुजरातेतील कडी या परगण्याचा केला. तेव्हापासून चाळीस वर्षांच्या अवधीत संस्थानाच्या सर्व भागांतून एकूण पस्तीस वेळा महाराजांचा संचार झाला.

राजकीय उमेदवारीच्या पहिल्या पंधरा वर्षांच्या काळात आधी झालेले उपक्रम महाराजांनी सल्लागार मंडळाच्या साहाय्याने सुस्थिर व दृढ केलेच; पण पूर्वनियोजित तऱ्हेने त्या उपक्रमांचा पुढे विस्तारही केला. सुव्यवस्था, तात्त्विक भूमिका आणि गुणवत्तेची श्रेणी यांवर महाराज अधूनमधून अधिक भर देत असत. सयाजीरावांचे गुरू एलियट

हे 1882 साली त्यांच्या इच्छेविरुद्ध बडोदे सोडून गेले होते; पण रेसिडेन्सी आणि ब्रिटिश नोकरशाही यांच्यापैकी कित्येकांचा रोष पत्करूनही महाराजांनी त्यांना परत बोलावून घेतले व त्यांच्याकडे सर्वेक्षण आणि जमाबंदी हे खाते सुपूर्द केले. एलियट यांच्या मार्गदर्शनाखाली आता प्रथमच शास्त्रीय पद्धतीचे पाहणीचे कार्य सुरू झाले व भावी सुधारणांसाठी जरूर ती भूमिका तयार करण्यात आली. अनुभवान्ती उत्तम ठरलेल्या रयतवारी-पद्धतीचा अवलंब करण्यात आला. परंपरेने चालत आलेल्या 'बारखळी' जमिनींचा जटिल प्रश्न त्यांना सोडवणे भाग होते. या बारखळी जमिनी जवळजवळ वा सर्वस्वी करमुक्त होत्या. सारासार विचार न करता पूर्वीच्या गायकवाडांनी धार्मिक कार्यासाठी किंवा खऱ्या वा काल्पनिक सेवेसाठी या जमिनी दिलेल्या होत्या. गायकवाडांप्रमाणेच इतरही अनेक अधिकाऱ्यांकडे ज्यांचा वारसाहक्क संशयास्पद होता, अशा जमिनी हस्तांतरित झालेल्या होत्या. सन 1875 च्या प्रारंभी असे आढळून आले की, राज्यातील दहा टक्के खेडी प्रायः करमुक्तच होती. ही स्थिती सुधारण्याचे काम एलियटला करावे लागले. 1889 साली यासंबंधी जेव्हा कायदाच करण्यात आला, तेव्हा खरोखर त्याच्या परिश्रमांचे चीज झाले.

या सुधारणांचा फायदा शेतकऱ्यांच्या दृष्टीने सहज दृग्गोचर होण्याजोगा होता. नव्या जमाबंदीच्या पद्धतीने जमीनधारणेच्या बाबतीत सुरक्षितता लाभली आणि पूर्वीचा बेबंदपणा जाऊन हक्कांची निश्चिती झाली. वस्तुरूपात कर भरण्याची चाल बंद करण्यात आली. जमीनधाऱ्याविषयीचे प्रचलित असलेले दर कमी करण्यात आले आणि जमिनीच्या प्रतवारीनुसार न्याय्य करआकारणी सुरू झाली. त्यायोगे कुळांची परिस्थिती पूर्वीपेक्षा कितीतरी सुधारली. आपल्याला कर भरणा किती करावयाचा आहे हे निश्चित झाले असून आपल्या रास्त हक्काची कदर केली जाईल, अशी खात्री वाटून शेतकरी जमिनीची कसणूक करू लागले.

राज्यकारभाराची यंत्रणाही सुधारण्यात आली. सुटी सुटी कागदपत्रे, फायली आणि लाल फीत यांऐवजी दैनंदिन कारभारात महाराजांनी 'टिपण-पद्धती' सुरू केली. या पद्धतीची थट्टाही झाली, कारण काही वेळा तिचा वापर तारतम्याने आणि कल्पकतापूर्वक झाला नाही. मात्र तिचे फायदे सहज दिसण्याजोगे होते. प्रशासनाच्या बाबतीत आता विकेंद्रीकरणही चालू झाले होते आणि ते आवश्यकच होते; कारण एक काळ असा होता की, पन्नास पैशांसारख्या क्षुल्लक रकमेला मंजुरी हवी असली, तरी महाराजांवाचून पान हालत नसे. नवी पद्धती सुयंत्रित रीतीने चालावी म्हणून निरनिराळ्या खात्यांच्या प्रमुखांकडून काढण्यात आलेल्या हुकुमांचा साप्ताहिक अहवाल महाराज मागवीत असत. अनेकानेक विविध प्रकारच्या बाबींच्या अर्जांचा विचार करणे महाराजांना कठीण जाऊ लागल्याने त्यांनी मदतनीस म्हणून एका खाजगी कार्यवाहाची नेमणूक केली. विविध कायद्यांत एकसूत्रीपणा आणण्यासाठी व कायद्यांचे लेखी संहितीकरण करण्यासाठी कायदा

समित्या नेमण्यात आल्या. 1884-85 साली महसूल खात्यापासून हिशेब आणि हिशेब तपासणी हा विभाग वेगळा करण्यात आला. पुढल्याच वर्षी नोंदणी (रजिस्ट्रेशन) विभाग स्थापन करण्यात आला. त्याच वर्षी (म्हणजे सन 1886) राज्याच्या काही तालुक्यांत अमलबजावणीचे कार्यकारी अधिकार आणि न्यायाधिकार यांची फारकत करण्यात आली व हा उपक्रम यशस्वी ठरला. विहिरी खोदण्याच्या कार्याला विशेष चालना देण्यात आली. रस्त्यांच्या आखणीसाठी सर्वेक्षण करून बारमाही वाहतुकीस उपयुक्त होतील, असे रस्ते बांधण्याचे हुकूम सुटले. जकातीची नवी पद्धती सुरू करण्यात आली. अनेकांना असे वाटले की, नियम-पोटनियम तयार करण्याच्या बाबतीतले महाराजांचे वेड जरा अतीच होत आहे. शिवाय नियमांचे शब्दांकन काटेकोर पद्धतीने केले जात असल्याने तारतम्याने कार्य साधून घेण्यास वावच राहिला नाही. परिणामी अधिकारीवर्गाची उपक्रमशीलता कमी होऊन तो स्वतःच्या अंगावर जबाबदारी घेण्यास कचरू लागला. अनेक स्तरांवर ही वृत्ती दिसून येऊ लागल्यामुळे महाराज असमाधानी झाले आणि उत्तरायुष्यात कोणत्याही नियमाचे अगदी गुलामी वृत्तीने अक्षरशः पालन करण्याच्या वृत्तीबद्दल त्यांनी नापसंतीच व्यक्त केलेली दिसेल. पण झाल्या गोष्टींनी घडून आलेली हानी होऊन गेलीच असल्याने तिची पूर्णतः भरपाई करणे आता शक्य नव्हते.

सन 1880 पासून सुरू झालेल्या दशकात इतर कित्येक महत्त्वाच्या घटना घडून आल्या. 1882-86 या काळात 'हुजूरस्वारी'ने कडी, नवसारी (1884), बडोदे (1885) आणि अमरेली (1886) या प्रांतांचा दौरा केला. पहिल्याच 'स्वारीत' बरोबर जे सामान घेतले होते, त्यात आपले दत्तकविधान झाले, तेव्हा वापरलेले बूटही आहेत, असे त्यांना आढळून आले. त्याचा खुलासा विचारता उत्तर आले, "महाराज कोणत्या वेळी कोणते बूट मागतील, याचा काय नेम?" अर्थात यावर जवळच्या मंडळींनी थोडे तारतम्य दाखवावे, अशी सूचना न मिळती, तरच नवल! 1883 ते 95 या कालावधीत विविध कारणांस्तव अहमदाबाद, कलकत्ता, काशी, अलाहाबाद, आग्रा, ग्वाल्हेर, अजमीर, पुणे आणि जोधपूर या शहरांना महाराजांनी भेटी दिल्या. ब्रिटिश मुलुखातील तसेच संस्थानांतील शासनपद्धतीची प्रत्यक्ष माहिती करून घेण्यासाठी या भेटींचा उपयोग झाला. याच काळात उद्योगधंद्याचा विकास करण्याच्या दृष्टीनेही प्रयत्न झाला. सन 1882 साली 'बडोदा कॉटन स्पिनिंग ॲन्ड वीव्हिंग मिल' सुरू झाली, तर सन 1885 मध्ये सरकारी साहाय्याने गणदेवी येथे एक साखर कारखाना सुरू करण्यात आला. 1883-84 साली तुरुंगातील कैद्यांसाठी आठवड्यातून एकदा 'सर्वसामान्य नीतिमत्ता व सद्वर्तन' यांवर व्याख्याने आयोजित करण्याची जी प्रथा सुरू करण्यात आली, तीमध्ये तर प्रबोधनयुक्त प्रशासनपद्धतीची प्रसादचिन्हेच दिसून येतात.

8 जानेवारी 1885 रोजी गव्हर्नर जनरलच्या एजंटांच्या पत्नी लेडी वॉटसन यांच्या हस्ते झालेले बडोदे पाणी-पुरवठा योजनेचे भूमिपूजन ही या प्रारंभकाळातील अत्यंत

उल्लेखनीय घटना होय. बडोद्याच्या प्रजेला पिण्याचे चांगले पाणी पुरविण्याच्या प्रश्नाचा विचार खंडेराव आणि मल्हारराव या राजांनीही गंभीरपणे केलेला होता. खंडेरावांनी नर्मदेचे पाणी आणण्याची, तर मल्हाररावांनी माही नदीचे पाणी आणण्याची योजना आखली होती. पण या दोन्ही योजना कार्यवाहीत आणणे अकालीच ठरले असले तरी पण या योजनांचे प्रचलित काळात पुनरुज्जीवन करून त्या हाती घेतल्या गेल्या, त्याचे श्रेय या दोघा महाराजांना आहे. आज बडोद्याच्या लोकांना माही नदीचे पाणी मिळते; पण या संदर्भात 95 वर्षापूर्वीच मल्हाररावांनी विचार केलेला होता. तेव्हा हे प्रकल्प म्हणजे नुसते कल्पनेचे खेळ नव्हते. नर्मदा-प्रकल्पासाठी खंडेरावांनी तर काही रक्कम वेगळी काढून ठेवली होती. पण त्या काळी सदर प्रकल्प अशक्यप्राय आहे, असे वाटल्याने त्यांनी ती रक्कम पुढे राजवाड्यावर खर्च केली. सावली तालुक्यात दौऱ्यावर असताना अखेर सयाजीरावांना मार्ग सापडला : 'सयाजी सरोवरा'ची कल्पना प्रत्यक्षात उतरली. सध्या हे सरोवर 'आजवा लेक' म्हणून प्रसिद्ध आहे. ही आधुनिक शास्त्रीय पद्धतीने सिद्ध झालेली जलयंत्रणा बडोद्याच्या पूर्वेस सुमारे 13 मैलांवर असून तिच्या बांधकामाला पाच वर्षे लागली. या जलप्रकल्पाला एकूण खर्च 34 लाख रुपये आला. पण प्रकल्प लाभदायकही ठरला; 1926 च्या सुमारास त्यापासून वार्षिक 70,000 रु. उत्पन्न मिळू लागले. या योजनेच्या यशामुळे उत्साहित होऊन राज्याच्या इतर भागांना पाणी पुरविण्याबाबत महाराज अधिकाधिक आस्था दाखवू लागले.

सन 1886 अखेर आणखी एक महत्त्वाची घटना घडून आली. 9 नोव्हेंबरला लॉर्ड डफरिन यांच्या हस्ते 'काउंटेस ऑफ डफरिन' या रुग्णालयाचे उद्घाटन झाले. या रुग्णालयाच्या सुंदर इमारतीची आखणी ख्रिस्तवासी मेजर सी मॅन्ट यांनी केलेली होती. इमारतीला एकूण साडेतीन लाख रु. खर्च आला. हे रुग्णालय 'अखिल भारतातील नाही, तरी पश्चिम हिंदुस्थानातील सर्वोत्कृष्ट रुग्णालय' म्हणून यथावकाश ख्याती पावले. पौरस्त्य पाश्चात्त्य वैद्यकांचा चांगला मेळ साधला जावा, म्हणून महाराजांनी 1888-89 साली मुंबईच्या ग्रँट मेडिकल कॉलेजला 'क्लिनिकल मेडिसिन आणि फार्माकॉलॉजी' या विषयावरील प्राध्यापकपदाचे एक अध्यासन निर्माण करण्यासाठी आर्थिक साहाय्य केले. महाराजांचे समन्वय साधणारे भारतीय वैशिष्ट्यच या कृतीतून सूचित होते.

बडोद्यातील पहिल्या वर्तमानपत्राचा जन्म याच वर्षी झाला. त्याचे नाव होते 'बडोदावत्सल'. त्याच्या चालकांत मतभेद उत्पन्न झाल्याने 1892 साली ते बंद करावे लागले. त्यानंतर दामोदर (सावळाराम) यंदे यांनी 'श्रीसयाजीविजय' नावाचे आणखी एक पत्र सुरू केले. या पत्राच्या मुद्रणालयाचे उद्घाटन खुद्द महाराजांच्या हस्ते झाले होते.

शिक्षणप्रसाराच्या बाबतीतली बडोदा-प्रशासनाला असणारी आस्था बडोद्याचे 'सरदार स्कूल' व सोनगडचे 'राणीपरज' (किंवा 'कालीपरज') या शैक्षणिक संस्था काढण्यातून

प्रकट झाली. त्या संस्था समाजाच्या अगदी दोन विरुद्ध टोकाच्या गटांसाठी होत्या, याचा येथे सहजी उल्लेख करावासा वाटतो. सोनगड येथील एका 'सवारी'त तेथे शाळा उघडण्याची किती आवश्यकता आहे, हे महाराजांच्या ध्यानात आले होते. जीवनातील सर्व क्षेत्रांत हा भाग अगदी मागासलेला होता. आणि या कमालीच्या मागासलेपणावर शिक्षणप्रसार हाच रामबाण उपाय होता; म्हणून तेथे एक शाळा व वसतिगृह बांधण्याचा आदेश निघाला आणि त्या परिसराला सोनगडचे 'धनका वसतिगृह' असे नाव देण्यात आले. ही घटना 1882-83 या सालची आहे. एका वेगळ्या प्रकारच्या विभक्तीकरणामुळे शिक्षणापासून वंचित राहणारा समाजाचा आणखी एक वर्ग म्हणजे सरदार लोकांचा. सर टी. माधवराव यांनी सुरू केलेले 'सरदार स्कूल' हेसुद्धा योग्य दिशेने टाकलेले पाऊल होते. मल्हाररावांच्या राजवटीत 1871 मध्ये बडोद्यात फक्त एक हायस्कूल व चार प्राथमिक शाळा होत्या. त्यांतील दोन मराठी व दोन गुजराती होत्या. तसेच शहरात चार संस्कृत पाठशाळा होत्या आणि पेटलाद येथे एक इंग्रजी शाळा होती. 1875 मध्ये शिक्षण खाते स्थापन झाले आणि योजनाबद्ध प्रगतीसाठी त्याचे कार्य अधिक कार्यक्षमतेने व्हावे, यासाठी 1884-85 मध्ये त्याची पुनर्रचना करण्यात आली. शिक्षक तयार करण्यासाठी एक ट्रेनिंग स्कूल सन 1886 साली सुरू करण्यात आले. भारतीय संगीताचे शिक्षण देणारी शाळाही अस्तित्वात आली.

शिक्षण क्षेत्रातील आपल्या महत्त्वाच्या प्रयोगाला हात घालण्यापूर्वी महाराजांनी 1885 साली आपले मनोगत प्रकट केले होते : "दर वर्षी तीस शाळा सुरू करण्यात याव्यात. शाळांच्या इमारतींसाठी रु. 60,000 खर्च करण्यात यावेत, हरेक शाळेत एक छोटे वस्तुसंग्रहालय असावे. शाळेत शिक्षण घेण्यासाठी मुली मोठ्या संख्येने याव्यात, म्हणून मुलींच्या शाळांतून फक्त स्त्री शिक्षिकांचीच नेमणूक करण्यात यावी. समाजाच्या सर्वांत खालच्या स्तरापर्यंत शिक्षण पोहोचले पाहिजे या दृष्टीने पावले टाकण्यात यावीत. मुलांच्या नैतिक तसेच शारीरिक शिक्षणाकडेही लक्ष दिले जावे. तांत्रिक शिक्षणाचीही व्यवस्था व्हायला हवी. विद्यार्थ्यांच्या वाचनासाठी खास नवी साधने निर्माण केली पाहिजेत. अभिजात इंग्रजी वाङ्मयाचे गुजरातीत भाषांतर करण्यासाठी विद्वानांची नेमणूक केली पाहिजे, आणि शेवटी, शक्य तितक्या ग्रंथसंग्रहालयांची स्थापना केली पाहिजे. अशा प्रकारे राज्यात असणाऱ्या घोर अज्ञानांधकाराविरुद्ध पद्धतशीर मोहीम सुरू झाली.

अमरेली जिल्ह्यात सक्तीच्या व मोफत प्राथमिक शिक्षणाचा उपक्रम यशस्वीरीत्या सुरू झाला, ही गोष्ट शैक्षणिक क्षेत्राला नवे वळण देणारी ठरली. सन 1906 पर्यंत हा उपक्रम सर्व संस्थानव्यापी बनला. याबाबत बडोदा-गॅझेटियरने केलेला पुढील दावा अगदी रास्तच होता : "उर्वरित हिंदुस्थानात लोकांना सक्तीचे व मोफत शिक्षण देणे आवश्यक असून ते साध्य करणे कसे सोपे नाही, असा विचार तेथे सुरू होण्याच्या कितीतरी आधी, बडोद्याच्या गायकवाड महाराजांनी आपल्या राज्यात शिक्षण क्षेत्रातला

हा उपक्रम सुरू केला होता आणि समोर दुर्लंघ्य अडचणी असूनही त्यांनी प्रत्यक्षात तो यशस्वी रीतीने तडीस नेला होता. अखिल भारतातला हा आद्य प्रयत्न होता. या उपक्रमात अडचणी होत्याच. पण यथावकाश योजनेत योग्य ते बदल करण्यात आले आणि या अनुभवाच्या बळावर कलाभवन नामक आणखी एक संस्था स्थापन करण्यात आली. 1890 साली ती सुरू झाली आणि लवकरच तीत उपयोजित कलांचे शिक्षण देण्यात येऊ लागले. तांत्रिक शिक्षणाच्या शाखेच्या प्रारंभीच्या अभ्यासक्रमात चित्रकला, सुतारकाम, रंगकाम, ब्लीचिंग व कॅलिको प्रिंटिंग तद्वतच मेकॅनिकल इंजिनियरिंग यांचा समावेश होता. नंतर मृत्तिकाशिल्प (सेरेमिक्स), शिल्पकला, वास्तुकला, स्थापत्यकला, अन्य ललित कला, वस्त्रोद्योग आणि रसायन तसेच तंत्रज्ञानाच्या अन्य शाखाही अभ्यासक्रमात समाविष्ट होत गेल्या. संस्थेचे समर्थ व कल्पक संचालक प्रो. के. टी. गज्जर यांच्या नेतृत्वाखाली संस्थेची चांगलीच भरभराट झाली. निवृत्त व्हावयाच्या सुमारास जुलै 1896 मध्ये त्यांनी संस्थानाच्या अन्य भागांत वस्त्रोद्योगाच्या कार्यशाळा उघडल्या होत्या, तसेच या कामासाठी शिक्षक तयार करण्यासाठी एक प्रशिक्षण केंद्रही त्यांनी सुरू केले होते. त्या काळी संस्थेच्या संस्थापकांनी कल्पनाही केली नसेल, एवढा या कलाभवनाचा व्याप वाढलेला आहे.

कलाभवनानंतर लवकरच बडोदा म्यूझियम सन 1894 मध्ये अस्तित्वात आले. युरोपच्या एका दौऱ्यात महाराजांना ही वस्तुसंग्रहालयाची कल्पना सुचलेली होती. म्यूझियममधील पहिल्या-वहिल्या वस्तुसंग्रहात भारतातील तसेच युरोपातील प्रेक्षणीय वस्तू होत्या. येथील चित्रसंग्रह हा तर हिंदुस्थानातील एक अत्युत्कृष्ट संग्रह मानला जाऊ लागला. पाश्चात्त्य कलाकारांची चित्रे आणि त्यांपैकी कित्येक चित्रे तर अस्सल मूलस्वरूपातीलच असल्याने पर्यटकांना या म्यूझियमचे आकर्षण वाटून ते त्याला भेट देऊ लागले. कलाभवन व बडोदे म्यूझियम यांचे संकल्पन मिस्टर चिशोम या इंग्रज गृहस्थांनी अत्यंत पद्धतशीरपणे केलेले होते.

सन 1892 पर्यंत 118 मैलांचे लोहमार्ग (रेल्वे) तयार होऊन राज्यातील अनेक प्रमुख ठिकाणे बडोदे या राजधानीला जोडली गेली. महाराज आता लक्ष्मीविलास राजवाड्यात राहावयास गेले होते. आपले एक जवळचे विश्वासू स्नेही व खाजगी कारभारी पेस्तनजी दोराबजी खंडाळावाला यांच्या साहाय्याने आता हा राजवाडा अप्रतिम रीतीने सुसज्ज आणि सुशोभित करण्यात आलेला होता. खुद्द बडोद्यातील रस्तेही रुंद करण्यात येऊन ठायी ठायी उद्याने उभारण्यात आली. चिशोम यांनी हायस्कूल व कॉलेज यांच्या लाल दगडांच्या इमारती बांधल्या. त्याआधी न्यायालयासाठी बांधलेल्या इमारतीही लाल दगडांच्याच होत्या. न्यायालयाची इमारत मुळात मंडईसाठी बांधण्यात आली होती. बडोदा न्यायमंदिर म्हणून आता ती ओळखली जात असते. सूरसागर तलावाच्या काठावर ही इमारत तसेच आणखीही काही इमारती बांधण्यात आल्या. या

इमारतीमध्ये आता संगीत महाविद्यालय व महिला प्रशिक्षण केंद्र भरते. या सर्व इमारतींनी नगराच्या सौंदर्यात आणखी भर घातली.

बडोद्याची जडणघडण करणाऱ्या वेगवेगळ्या शिल्पकारांचा संचय जणू काही गेल्या दहा वर्षांत शहरात येऊन डेरेदाखल झालेला होता. महाराजांची अज्ञान पालकत्वाची राजवट चालू असतानाच दिवाण बहादूर अंबालाल साकरलाल देसाई आणि पुढे राष्ट्रसभेतील नेते म्हणून ख्यात झालेले अब्बास तय्यबजी हे दोघे बडोद्यात आलेले होते. नंतर आले एक थोर राजकारणी सर मनूभाई मेहता आणि नामवंत इतिहासकार दिवाणबहादूर गोविंद सखाराम सरदेसाई. राष्ट्रीय आंदोलनात चमकलेले अरविंद घोष, खासेराव जाधव आणि केशवराव देशपांडे हेही त्यानंतर बडोद्यात आले. डॉ. बाबासाहेब आंबेडकर हेही काही काळ बडोद्यात होते. प्रो. के. टी. गज्जर, पुढे राष्ट्रसभेचे अध्यक्षस्थान भूषविणारे मौलाना महमदअल्ली तसेच टॉमस तेत व प्रो. हॅरॉल्ड लिट्लडेल यांच्यासारखे बडोदा महाविद्यालयाशी संबंधित असे अनेक व्यासंगी विद्वान बडोद्यात आले. ही नररत्ने कालांतराने संस्थानची भूषणेच ठरली.

सन 1895 ते 1900 हा काळ महाराजांची अगदी कसोटी पाहणारा ठरला. पहिला उमेदवारीचा काळ संपतो, तोच दैवाने जणू त्यांच्यापुढे एकामागून एक परीक्षाच पाहायच्या ठरविल्या होत्या. या पाच वर्षांत सर्वच आघाड्यांवरील आव्हानांना महाराजांना तोंड द्यावे लागले. कौटुंबिक जीवनात असे आघात सहन करावे लागले की त्यांनी धैर्याची आणि सहनशीलतेची जणू कसोटीच पाहिली. राज्यकारभारात उगाच नाक खुपसणाऱ्या बडोद्याच्या रेसिडेंटशी महाराजांचा प्रथम खटका उडाला आणि नंतर थेट व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन यांच्याशी त्यांची चकमक झडली. या संघर्षात महाराजांच्या अंगची निर्णयशक्ती, शहाणपणा आणि बलाढ्य शक्तीशी टक्कर देण्याचा समर्थपणा पणाला लागला. अखेरीस 1896-97 सालची प्लेगची साथ, 1897-98 सालचा पिलवाईचा उठाव, गुजरातमध्ये 'छापानिओ' म्हणून प्रसिद्ध असणारा 1899 चा अभूतपूर्व दुष्काळ आणि सन 1900 मधील मंदीची लाट या घटनांनी संस्थानी प्रशासनाचा तर अंतच पाहिला. पण महाराजांची चिकाटी आणि खंबीरपणा या गोष्टींचीही कसोटी लागली. या दृष्टीने शेवटी उल्लेखिलेल्या घटनांची थोडी अधिक दखल घ्यावी लागेल.

1896 साली मुंबई शहर हे प्लेगच्या विळख्यात आधीच सापडले होते. अकस्मात प्लेग उद्‌भवला आणि सरकार भांबावले. त्यावर काय उपाय करावा, हे उमजेना. प्लेग हा सांसर्गिक रोग असल्याने त्याची लागण झालेल्या रोग्यांना अलग ठेवण्याची उपाययोजना प्रथम करण्यात आली. पण तीमुळे लोकांच्या मनात संशय निर्माण होऊन परिस्थिती चिघळली. त्यामुळे लसटोचणीच्या कामावरही परिणाम झाला. नंतर ही साथ शेजारच्या संस्थानी मुलुखात पसरत गेली आणि बडोदे राजधानीलाही तिचा जबर तडाखा बसला. ऐकीव माहितीच्या बळावर अफवा उठल्या व सनसनाटी बातम्या

पसरल्याने बडोद्यातसुद्धा कठीण परिस्थिती निर्माण झाली. संस्थानी प्रशासनाने मुंबईचा अनुभव ध्यानात घेऊन धार्मिक बाबतीत आवश्यक ती खबरदारी राखल्याने सुदैवाने धार्मिक भावना दुखावल्या जाण्याची पाळी आली नाही. हे सारे घडून आले, तरी साथीने अनेकानेक बळी घ्यायचे ते घेतले व त्या साथीची स्मृती लोकमानसात दीर्घ काळ घर करून राहिली.

यापाठोपाठ गुजरातेतील पिलवाईचा उठाव झाला. त्या बाबतीत निषेधप्रदर्शन, अर्जविनंत्या व आवाहने हे मार्ग निष्फळ ठरले होते. अखेर महसुलाच्या नवीन व्यवस्थेला आव्हान दिले गेले. लोक सशस्त्र असल्याने तसेच संस्थानी सैन्याच्या कारवाईविरुद्ध बचावाचे तंत्रच अवलंबिले गेल्याने जणू काही तेथे एखाद्या मध्ययुगीन लढाईच्या धुमश्चक्रीचा देखावाच निर्माण झाला. शेवटी लष्कराला पाचारण करावे लागले. रेसिडेंटने सामोपचाराचे धोरण ठेवण्याचा सल्ला दिला व शक्य तेवढे त्याचे पालनही केले गेले. अखेर तो मुलूख पादाक्रांतच करावा लागला. काळ बदलल्यावरही भूतकालीन वातावरणात वावरणारांना त्यामुळे वेळीच धडा मिळाला; पण मात्र तो फारच महाग पडला. हे बंड दडपण्यासाठी दोन लाख रुपये खर्च करावे लागले. स्टॅन्ले राईसने म्हटले आहे, इतर अनेक घटनांप्रमाणे ही एक क्षुल्लक बाब होती; पण काही प्रमाणात भडकलेल्या भावनांमुळे व काही अंशी नाकर्त्या अधिकाऱ्यांच्या डळमळीत धोरणामुळे उगाचच तिला प्रचंड स्वरूप आले.

नंतर निसर्गाचा कोप होऊन एक दैवी आपत्तीच कोसळली. 1899 चा दुष्काळ हा लोकांच्या आठवणीतला अत्यंत अभूतपूर्व आणि भयानक स्वरूपाचा दुष्काळ होता. तो इतका तीव्र होता आणि त्याचा क्षेत्रविस्तार एवढा व्यापक होता की, संस्थानी सरकारने आपली सारी साधनसंपत्ती त्याच्याविरुद्ध उभी केली असती, तरी जी प्रचंड जीवितहानी घडून आली, ती टाळणे शक्य नव्हते. दुष्काळनिवारक सहायक कामे आणि चाचण्यांसारखे उपक्रम यांद्वारे लोकांचे हाल फक्त अल्प प्रमाणातच हलके करणे शक्य होते. कडी प्रांताची परिस्थिती सर्वांत भीषण होती. दुष्काळ आयुक्त जमशेटजी अर्देशर दलाल यांनी हिंदुस्थान सरकारने तयार केलेले दुष्काळविषयक दंडविधान स्वीकारून संस्थानात त्याची अमलबजावणी केली. पण प्रशासकीय उणीवांमुळे तिची अपेक्षित फलश्रुती पदरात पडली नाही. सन 1900 मध्ये हाती घेण्यात आलेले एक मोठे दुष्काळनिवारक कार्य म्हणजे ओरसंग नदीवर जोजवाजवळ केलेले धरणाचे व कालव्यांचे बांधकाम हे होय. या धरणाच्या द्वारे 14,000 एकर जमिनीला पाणीपुरवठा होणार होता. अमरेली, बडोदे व नवसारी या भागांतील आपल्या दौऱ्याच्या वेळी महाराजांनी प्रचंड विनाश प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिला होता आणि जनतेच्या यातनांमागील मूलभूत कारणही आपल्या सूक्ष्म दृष्टीने अचूक हेरले होते. ते कारण होते दारिद्र्य आणि त्यात भर म्हणजे चारित्र्यहीनता. "खऱ्याखुऱ्या काटकसरीचा अभाव, उद्योगीपणा व उत्साह यांची वाण, रास्त आशाआकांक्षा

व उच्च ध्येय यांची उणीव, उदासीनता, दैववादीपणा आणि कोणत्याही आपत्तीपुढे सपशेल लोटांगण घालण्याची पडखाऊ वृत्ती. ही स्थिती पालटली नाही, लोकांना स्वावलंबनाचे धडे देता आले नाहीत, तर परिस्थिती अधिकाधिक बिघडणे हे तर अपरिहार्यच होते." तरीसुद्धा प्रशासनाने मानव व गुरेढोरे यांची हानी टाळण्याचे अटोकाट प्रयत्न केले. यासाठी एकूण 47 लक्ष रुपये खर्च करण्यात आला व त्यापैकी साडेतीन लाख रुपये महाराजांनी स्वतःचे दिले होते.

ही आपत्ती पुरेशी नव्हती की काय म्हणून 1900 साली पाऊस बिलकुल पडलाच नाही. 1901-02 सालीही पाऊस फार तुरळक पडला. यामुळे अनेक तऱ्हेची मदतकार्ये पुढे तशीच चालू ठेवावी लागली व सढळपणे सारामाफीही द्यावी लागली. ऑगस्ट 1899 मध्ये या मदत कार्यावर फक्त 4130 दुष्काळग्रस्त लोक होते; पण जुलै 1900 मध्ये ही संख्या, कधी नव्हे इतकी म्हणजे 85,749 वर गेली होती, असे बडोद्याच्या प्रशासनइतिवृत्तात नमूद केलेले आहे. या इतिवृत्तात पुढे असेही म्हटले आहे की, दुष्काळ निवारण कार्याच्या मदतीवर सरासरीने 52,690 लोक अवलंबून होते. राज्याच्या खजिन्यावर यामुळे आणखी साडेसोळा लाखांचा बोजा पडला. एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या दशकात एकूण 4,60,000 माणसे व 8,50,000 गुरेढोरे मृत्युमुखी पडली. यामुळे त्यातून सावरून पुन्हा तडफदारपणे उभे राहण्यास राज्याला काही अवधी लागला.

विसाव्या शतकाचे पहिले पाव शतक सुधारणांच्या दृष्टीने सुवर्णयुगच ठरले. घडून आलेल्या पीछेहाटीमधून बडोदे-प्रशासनाने लवकरच डोके वर काढले आणि महाराजांनीही एकंदरीत बरीच प्रगल्भता दाखविली. पूर्वी पेरलेली बियाणे आता फलद्रूप होण्याचा रंग दिसत होता. प्रशासनाला सर्वप्रथम चलनाचा प्रश्न हाती घ्यावा लागला. 'बाबाशाही' या नावाने बडोदे संस्थानचे स्वतःचे नाणे होते. नव्या शतकाच्या प्रारंभी सदर नाण्याबाबत अडचणी उपस्थित झाल्या. 1897 मध्येच त्याचे विनिमय-मूल्य घटले होते. त्यामुळे ब्रिटिश हिंदुस्थानातील चांदीचे चलन स्वीकारण्याची जी सूचना पूर्वी अनेकवार करण्यात आलेली होती, तिचा गंभीरपणे पुनश्च विचार चालू झाला. संस्थानला त्यात बराच तोटा सहन करावा लागणार असला, तरी बऱ्याचशा विचारविनिमयानंतर पन्नास वर्षांच्या कालावधीसाठी तरी चांदीचे चलन सन 1900-01 मध्ये स्वीकारले गेले. आता यापुढील तर्कशुद्ध पाऊल म्हणजे 'बँक ऑफ बरोडा' ची स्थापना करणे. ती करण्यात येऊन तिच्या शाखाही राज्यात सर्वत्र उघडल्या गेल्या. बँकेचे पहिले युरोपीय व्यवस्थापक सी. ई. रँडल हे होते व त्यांच्या कारकीर्दीपासूनच बँकेने स्पृहणीय कामगिरी बजावली आहे. बँकेचे अधिकृत भांडवल रु. 60 लक्ष होते. त्यापैकी तीस लाख भांडवलाचा भरणा होऊन बँकेला प्रारंभ झाला. पुढे देशातील पाच मोठ्या बँकांपैकी एक अशी प्रतिष्ठा या बँकेला लाभली. व्यापार आणि उद्योग या क्षेत्रांत आपल्या लोकांनी प्रगती करावी, अशी जी महाराजांची अपेक्षा होती, ती अशा रीतीने पुरी झाली.

संस्थानी प्रशासनाचे आधुनिकीकरण करताना महाराजांनी ब्रिटिश पद्धतीचे अनुकरण केले, यात बिलकुल शंका नाही. पण ते तेवढ्यावरच थांबण्यास तयार नव्हते. सन 1894 च्या जानेवारीत त्यांनी आपले दिवाण मणिभाई जसाभाई यांना लिहिले होते, "पाश्चात्त्य शिक्षणामुळे आपल्या जुन्या व लोकप्रिय संस्था निर्जीव आणि सत्त्वहीन बनत आहेत. बडोदे हेही हिंदुस्थानातील इतर नगरांचेच अनुकरण करीत आहे, पण याबद्दल आपणास खेद वाटला पाहिजे. आपल्या राष्ट्रीय चालीरीती जतन करण्याचा प्रयत्न करण्यातच आपले रास्त कल्याण आहे. या चालीरीतींमागेही वर्षानुवर्षांची विकासपरंपरा आहे, तसेच इतिहासाचा कौलही आपल्या बाजूचा आहे." या संदर्भात जुन्या ग्रामपंचायत पद्धतीला सर्वतोपरी वाव देण्यामध्ये भारतीय जीवनसरणीची जुनी वैशिष्ट्ये जतन करण्याची महाराजांची इच्छाच दिसून आली. रयतवारी पद्धतीचा उपक्रम सुरू केल्याने त्यातून सत्तेचे केंद्रीकरण तालुक्याचे ठिकाणी झाले होते आणि जुनी पद्धत अगदी मोडकळीस आली होती. 1894 सालामध्येच निवडणुकांच्या द्वारा किमान शंभर खेड्यांत तरी ग्रामपंचायती स्थापन झाल्या पाहिजेत व तसे झाल्यास "माझ्या राज्यात मी जे करू इच्छित आहे, त्याचा जणू कमानीचा शिलान्यासच बसविल्यासारखे होईल," अशी त्यांची धारणा होती. 1902-03 साली ग्रामपंचायतविषयक नियम प्रसिद्ध करण्यात आले व तदनुसार एक हजार वा अधिक लोकसंख्या असणाऱ्या प्रत्येक खेड्यात, अर्धे नियुक्त व अर्धे निवडणूकयुक्त अशा सभासदांच्या बनलेल्या ग्रामपंचायती स्थापन करून पहिले पाऊल टाकण्यात आले. मात्र, प्रत्येक जिल्ह्यात व त्याच्या पोटजिल्ह्यात बोर्डाची स्थापना करणारा व विशिष्ट श्रेणीबद्ध मतदानाचा अधिकार प्रदान करणारा स्थानिक स्वराज्याचा कायदा सन 1904 पर्यंत तरी संमत होऊ शकला नाही. पण या कायद्याच्या अमलबजावणीची व्याप्ती आणि कक्षा मात्र अनेक कारणांस्तव बराच काळ वाढविणे शक्य झाले नाही. प्रयोग-प्रमाद पद्धतीने प्रस्तुत कायद्यात सुधारणा घडवून आणण्याची कोशीस महाराजांच्या मृत्यूपर्यंत सतत चालू होती. पण पाचशे किंवा अधिक लोकवस्तीच्या प्रत्येक खेड्यांची एक ग्रामपंचायत अस्तित्वात आली व त्यांची एकूण संख्या 2103 झाली. पंचायतीतील दोन-तृतीयांश सभासद निवडून आलेले असत. स्थानिक उपकरांच्या द्वारे तसेच अन्य साधनांच्या द्वारे पंचायती जेवढी रक्कम उभारीत, तेवढ्या रकमेइतके सरकारी अनुदान, तसेच सुलभ अटींवर कर्जसुद्धा सरकारकडून घेण्याची सवलत ग्रामपंचायतींना देण्यात आलेली होती. हे सारे घडून आलेले महाराजांनी आपल्या कारकीर्दीत पाहिले, हे विशेष होय. सयाजीरावांचे उत्तरकालीन चरित्रकार स्टॅन्ले राइस यांच्या अध्यक्षतेखालील एका समितीने लोकल बोर्डांच्या पुनर्रचनेचा सन 1928 मध्ये विचार केला व त्या समितीच्या शिफारशींवरून सन 1929 मध्ये महाल-पंचायती रद्द करण्यात आल्या व ब्रिटिश मुलुखातल्या जिल्हा लोकल बोर्डांच्या धर्तीवर प्रांतपंचायतींचे अध्यक्षपद निवडणुकीने भरण्याची पद्धत सुरू करण्यात आली. 1869 पासून बडोदे

शहरात नगरपालिका अस्तित्वात होती. 1891 नंतर पाटण, नवसारी व पेटलाद येथे नगरपालिका स्थापन करण्यात आल्या. 1903-04 पर्यंत बडोदे संस्थानात 35 नगरपालिका अस्तित्वात आल्या. त्यांचा कारभार त्यांच्या त्यांच्या अधिकाऱ्यांमार्फत चालत असे; पण त्यांचा सर्व खर्च प्रायः सरकारच चालवीत असे. हळूहळू त्यांचे प्रातिनिधिक स्वरूप वाढत गेले आणि या पालिका आपले स्वतंत्र कर बसवू लागल्या. 1938-39 सालापर्यंत त्यांची 'अ' व 'ब' अशा गटांत वर्गवारी झाली. पहिल्या 'अ' गटात 12 तर 'ब' गटात 30 पालिका होत्या व अध्यक्षांची निवडणूक करण्याची किंवा नेमणूक करण्याचीही तरतूद पालिकांना होती.

1904-5 साली तीन महत्त्वाचे कायदे अमलात आले. सहकारी पतपेढ्या, धार्मिक निधी आणि कस्टमची जकात यांविषयी हे कायदे होते. पहिल्या म्हणजे पतपेढ्यांच्या कायद्याचे चीज होऊन तशा संस्थांनी मूळ धरले व त्यांची उत्तम वाढही झाली. महाराजांच्या कारकीर्दीच्या सुवर्णमहोत्सवी वर्षात म्हणजे 1925-26 साली एक मध्यवर्ती सहकारी पतपेढी स्थापन करण्यात आली. 1927 अखेर संस्थानामध्ये सुमारे एक हजार सहकारी संस्था होत्या व त्यांचे 31,000 सदस्य होते. पण हे सर्व प्रयत्न म्हणजे सिंधूतील बिंदूसारखा प्रकार होता. ग्रामीण भागातील कर्जबाजारीपणाचा प्रश्न सुटू शकत नव्हता. याच वर्षी न्याय खात्याची व्यवस्था आणि अमलबजावणी खात्याची व्यवस्था यांचे विभक्तीकरण दिवाण रोमेशचंद्र दत्त यांच्या मार्गदर्शनाखाली पूर्ण होऊन सुधारणेचे पाऊल आणखी पुढे पडले. तदनंतर न्यायसंबंधित द्वैवार्षिक परिषदा भरत आणि या क्षेत्रात राहिलेल्या उणीवा दूर करण्याचे मार्ग सुचविले जात.

याच वर्षी बडोदे शहरासाठी नगरसुधार-विश्वस्त मंडळ (सिटी इम्प्रूव्हमेंट ट्रस्ट) स्थापन करण्याच्या कल्पनेला चालना मिळाली; मात्र विश्वस्त मंडळाची प्रत्यक्ष स्थापना झाली ती 1910-11 या सालात. प्रो. गेडिस या नामवंत नगररचना तज्ज्ञाच्या शिफारशींनुसार बडोदे नगरीच्या सौंदर्यात आणखी भर पडली. शहरातील एका बाजूने बंद असणाऱ्या गल्ल्या खुल्या करण्यात आल्या. दाट वस्तीच्या भागात छोटी छोटी उद्याने आणि विश्रामस्थाने यांसाठी मोकळी जागा राखण्यात आली. अरुंद रस्ते रुंदावण्यात आले. घाणीची तसेच आरोग्यविघातक अशी कामे शहराबाहेर राखून ठेवलेल्या जागी हलविण्याचे ठरले. आरोग्य व सार्वजनिक स्वच्छता यांच्या दृष्टीने घरबांधणी व इमारती यांच्याबाबत नेमून दिलेले प्रमाण इत्यादींविषयी सुस्पष्ट आदेश व नियम करण्यात आले. नगराच्या भावी विकासार्थ एक नियोजन विभाग स्थापन करण्याचे ठरले. तद्वतच ग्रामीण भागातही सार्वजनिक स्वच्छता राखता यावी, अशी तरतूद असणारे आणि अवश्य त्या सुखसोयींनी युक्त असे एक नमुनेदार घरकुल (झोपडीवजा) तयार करण्यात आले. रस्त्यांच्या दुतर्फा वृक्षारोपण करून छायायुक्त राजमार्ग, पाणीपुरवठ्याच्या योजना आणि विजेचे दिवे यांमुळे बडोद्याच्या परिसरातील प्रदेश अन्य आजूबाजूच्या प्रदेशाच्या तुलनेने

उठून दिसे आणि या सर्वांचे श्रेय सयाजीरावांच्या प्रशासकीय कारभारातील लोकोत्तर अशा दूरदृष्टीकडे जाते.

1904 साल हे प्रातिनिधिक सरकार स्थापन करण्याच्या चर्चेचे प्रारंभवर्ष म्हणूनही स्मृतीत राहील. प्रदीर्घ विचारविनिमयानंतर 1908 साली धारासभा या नावाने कायदेमंडळ अस्तित्वात आले. "प्रथम या मंडळाच्या सभासदांची संख्या सतरा होती. 1912 साली निवडून द्यावयाच्या सदस्यांची संख्या वाढविण्यात आली आणि सरदारवर्गाचा एक व व्यापारीवर्गाचा एक अशा दोन प्रतिनिधींची नेमणूक करण्यात आली." 1927 साली धारासभेची सभासदसंख्या सव्वीस होती. दिवाण व पाच अन्य पदसिद्ध सदस्य, दहा नियुक्त सदस्य, सहा सरकारी व चार बिनसरकारी (त्यात गायकवाड कुटुंब, सरदार, व्यापारी आणि दलितवर्ग यांच्या प्रतिनिधींचा समावेश असे). आणि दहा लोकांनी निवडलेले प्रतिनिधी अशी एकूण सदस्यसंख्या असे. बडोदे व कडी या जिल्ह्यांतून प्रत्येकी तीन आणि नवसारी व अमरेली जिल्ह्यांतून प्रत्येकी दोन असे हे एकूण दहा सभासद निवडून दिलेले असत. 1917 साली तारतम्य ठेवून प्रश्न विचारण्याचा हक्क बजावण्याचा सल्ला महाराजांनी सभासदांना दिला. वास्तविक या धारासभेचे स्थान फक्त सल्लामसलत देण्याचे होते. तिने केलेले ठराव सरकारवर बंधनकारक नसत. एखादा कायदा जरी मतप्रदर्शनार्थ धारासभेकडे पाठवला गेला, तरी त्याबाबतचा सभेचा निर्णय मान्य करण्याचे बंधन सरकारवर नव्हते. तसेच यच्चयावत सर्वच कायदे धारासभेकडे पाठविले जात असत, असेही नाही. काही महत्त्वाचे कायदे धारासभेचे मत न अजमावताच संमत केले गेले होते. स्वाभाविकच कामकाजाची ही तऱ्हा वास्तवाला सोडून आहे, अशी टीका स्थानिक वृत्तपत्रांतून झाली. महाराजांनी या बाबतीत ब्रिटिशांप्रमाणे कालहरणाचे धोरण अवलंबिले नसले, तरी ते जादा सावधपणेच वाटचाल करीत होते. कोणतीही कृती घाईगर्दीत उरकली जाऊ नये, असे त्यांना वाटे. 1924-26 साली कायद्यात सुधारणा करून त्यांनी धारासभेला अर्थसंकल्पाचीही चर्चा करण्याची मुभा दिली. मात्र हा उपक्रम सरकारला अडचणीत आणणारा ठरल्याने बंद करण्यात आला. या संदर्भात झालेल्या टीकेने महाराजांची 'प्रगतिशील राजा' अशी प्रतिमा, नाही म्हटले तरी, शबलित झालीच. या बाबतीत अनेक पर्यायी कल्पना राबवून पाहण्याचा यत्न त्यांनी केला, असे दिसते. त्यांचे चरित्रकार पी. डब्ल्यू. सार्जंट सांगतात :

"मूलभूत घटनात्मक कायद्यांना बाधक ठरणार नाहीत, असे कायदे करण्याचा अधिकार असणाऱ्या द्विसदनात्मक कायदेमंडळाची तरतूद असणाऱ्या घटनेचा एक मसुदा सर मनुभाई मेहता व सत्यव्रत मुकर्जी यांनी महाराजांच्या सूचनेनुसार तयार केला होता. एकदा जपानी पद्धतीचे 'ज्येष्ठ मुत्सद्दी मंडळ' (कौन्सिल ऑफ एल्डर स्टेटस्‌मेन) व इटालियन धर्तीचे 'कार्पोरेट स्टेट' स्थापन करण्याची कल्पना महाराजांच्या मनात होती. त्यांतील सत्तावादामुळेच महाराजांना या कल्पना आवडल्या असाव्यात; कारण त्यांच्या

मनाचा कल सत्तावादीच होता. पण या सर्व विचारमंथनातून विशेष काही निष्पन्न झाले नाही. मोठ्या प्रमाणात जबाबदार राज्यपद्धतीसाठी अद्याप आपली प्रजा लायक झालेली नाही, असेच सयाजीरावांचे मत होते. यामुळे 'दि सर्व्हंट ऑफ इंडिया' या पत्राने सयाजीरावांच्या ज्यूबिलीच्या अनुषंगाने चर्चा करताना सन 1926 च्या प्रारंभी म्हटले होते : "पाश्चात्त्य नमुन्यानुसार आपले राज्य चालविण्याची कितीही इच्छा असली, तरी लोकमतानुवर्ती शासनाचा त्यांनी पाठपुरावा केल्याचे कधीच दिसून येत नाही," या विधानात पुष्कळच तथ्यांश होता. या लेखात पुढे असेही म्हटले होते, "कायदेविषयक व प्रशासकीय मंडळांत आपल्या प्रजाजनांना सामील करून घेण्यात बडोदे संस्थान हे पहिले असले, तरी ही मंडळे प्रारंभिक काळात होती, त्याच प्राथमिक अवस्थेत अद्यापही आहेत. या स्पर्धेत अन्य काही संस्थाने मागाहून उतरली असली, तरी त्यांनी बडोद्याला केव्हाच मागे टाकले आहे." लेखात उदाहरणे म्हणून म्हैसूर व त्रावणकोर या संस्थानांचा उल्लेख केला होता व या उभय संस्थानांनी या बाबतीत बडोद्याच्या पुढे एका पिढीची तरी मजल मारली आहे, असे म्हटले होते.

आपल्या राज्याचा आर्थिक पाया अधिक भक्कम करण्याकडे या काळात महाराजांचे लक्ष वेधले होते. मुंबई सरकारचे एक आय. सी. एस. अधिकारी सी. एन. सेडन यांना मुद्दाम आपल्याकडे बोलावून घेऊन सर्वेक्षण व जमाबंदी या खात्यांचे आयुक्त म्हणून त्यांनी त्यांची नेमणूक केली. हे अधिकारी पुढे संस्थानचे दिवाणही झाले. त्यांच्या मार्गदर्शनाखाली आयकराची व्याप्ती वाढविण्यात आली. 1905-6 साली महसूल खात्यात 'व्यापार व उद्योग' हा विभाग स्थापन करण्यात आला; पण त्याचे काम अतोनात वाढल्यामुळे त्याचे स्वतंत्र खाते करून ते एका संचालकाकडे सोपविण्यात आले. वर्षअखेर आयात, निर्यात कर तसेच जकातीचा कर सर्व राज्यात रद्द करण्यात आला. अमरेली जिल्ह्यातील कोडिनार व ओखा मंडळ यात काही अंतर्गत सीमाशुल्काची वसुली 1912 साली पुन्हा सुरू करण्यात आली; पण पुढे दहा वर्षांनी म्हणजे 1922 मध्ये ती रद्द करण्यात आली. अशा रीतीने उपर्युक्त दोन बाबी, तसेच 'बँक ऑफ बरोडा'ची स्थापना ही तीन पावले टाकल्याने बडोद्याच्या प्रगतीचा मार्ग मोकळा झाला, तरीपण अपेक्षित परिणाम मात्र महाराजांच्या हातून निसटूनच जात होते.

उद्योगधंद्यापेक्षा शेती हाच संस्थानाचा खराखुरा पाया होता. बहुसंख्य प्रजेचा मुख्य व्यवसाय शेती हाच होता. 1921 च्या जनगणनेत दर हजारी 640 लोक शेतकीवर अवलंबून असल्याचे आढळून आले होते. शिवाय कसणुकीस योग्य अशा जमिनीपैकी तीन-चतुर्थांशापेक्षाही अधिक जमीन शेतीखाली होती. यामुळे शेतीच्या विकासावरच संस्थानची भरभराट अवलंबून होती. पण दुष्काळ आणि अवर्षण हे त्यात प्रचंड स्वरूपाचे अडथळे होते. 1899-1900 च्या अतिभीषण दुष्काळाने ही गोष्ट चांगलीच कळून चुकली होती. एकूण लोकसंख्येत 19 टक्क्यांहून अधिक घट झाली असून शेतीवर अवलंबून

असणाऱ्यांची संख्या दर चौरस मैलास 519 पर्यंत घसरली होती, हे 1901 च्या जनगणनेत दिसून आले. अर्थात यामुळे शेतकरी वर्गाच्या स्थितीवर अधिक लक्ष केंद्रित करण्यात आले. त्याबाबत केलेल्या चौकशीत असे आढळून आले की, केवळ जीव जगविण्यासाठी हा वर्ग प्रचंड प्रमाणात कर्जबाजारी बनलेला असून कित्येक शेतकरी हा व्यवसाय कायमचा सोडून अन्य व्यवसायाकडे वळण्याच्या बेतात होते. नोंदलेल्या जमीनधारकांपैकी 60 टक्के लोक कर्जात बुडालेले असून प्रत्येकाला किमान चारशे रुपयेपर्यंत तरी कर्ज असावे, असा 1901 सालचा अंदाज होता. उरलेल्या चाळीस टक्के लोकांपैकी निम्मे तरी विविध प्रकारची सावकारी करणारे होते व जुन्या कर्जफेडीपोटी त्यांनी शेतकऱ्यांच्या जमिनींचा कब्जा केलेला होता. या साऱ्या उणीवांचे निराकरण करून सर्वंकष सुधारणा घडवून आणण्यासाठी तीन उपाययोजना सुचविण्यात आल्या. त्या म्हणजे शेतकी खात्याची सुधारणा, अर्थविकास मंडळाची स्थापना आणि तुकडेबंदी. तसेच जमिनी हस्तांतरित करण्यावर घातलेले निर्बंध. उपर्युक्त सहकारी पतपेढ्यांमुळे शेतकऱ्यांची दुःस्थिती अंशतःच दूर झाली होती; कारण अल्प मुदतीची छोटी छोटी कर्जेच काय ती त्या मंजूर करू शकत असत. पण यावर खरा उपाय असा होता की, जमिनीच्या गहाण व्यवहारासंबंधात एक बँक स्थापन करणे. व्यापार आणि उद्योग खात्याने यासाठी 1916 साली एक योजनाही तयार केली होती, पण ती फारच महत्त्वाकांक्षी ठरल्यामुळे तिची कार्यवाही पुढे ढकलण्यात आली. मात्र याखेरीज आणखी काही उपाययोजना करण्यात आल्या. पशुवैद्यक विभागाची सुधारणा करण्यात येऊन कृषिविभागाला बळकटी आणण्यात आली. त्यासाठी एक कृषिसंस्था स्थापून लोक शिकवून तयार करण्यात आले. 1892 साली सुरू करण्यात आलेले कृषिसंशोधन केंद्र आधुनिक औजारांबाबत व शेतकीबाबत अधिक सुव्यस्थित बनविण्यात आले. शेतकीविषयक उपयुक्त आणि उद्‌बोधक असे साहित्यही प्रसिद्ध करण्यात आले. 1918 साली स्थापन झालेल्या अर्थविकास मंडळाऐवजी महाराजांनी एक आर्थिक विकास-समिती नेमली व सरकारी अधिकाऱ्यांनी शेतीसुधारणेबाबतच्या सूचना या समितीकडे सादर कराव्या, असा आदेशही काढला.

अशा भक्कम आर्थिक सुधारणांप्रमाणेच महाराजांनी आपल्या प्रगतीपर सुधारकी वृत्तीचा मोर्चा सामाजिक सुधारणांकडेही वळविला. या क्षेत्रातले प्रश्न हाताळण्याच्या दृष्टीने एखाद्या परकीय सत्तेपेक्षा महाराजांना परिस्थिती अधिक अनुकूल होती. 1896 सालीच पुरोहितवर्गाचा 'उद्धटपणा' व 'प्रस्थापित हितसंबंध' यांच्याविरुद्ध धार्मिक विधिविधानांच्या क्षेत्रात दोन हात करण्याचे धैर्य त्यांनी दाखविले होते. तेव्हापासून 'वेदोक्त' की 'पुराणोक्त' हा वाद माजून राहिला. खुद्द स्वतःच्या घरीही महाराजांना या बाबतीत विरोधी वादळाला तोंड द्यावे लागले होते. पण ते अविचलित राहिले आणि त्यांनी आपले वजन 'वेदोक्ता'च्या बाजूने टाकले. कोणत्याही जातीचा वा वर्गाचा पुरोहित असो, त्याला आपल्या विधिविधानांची चांगली माहिती आणि उत्तम समज असली

पाहिजे, त्यांनी 1915 साली एक पुरोहित-कायदा केला. परवानाधारक पुरोहितांकडून धार्मिक विधिविधाने करून घेण्याची काही अंशी तरतूद करणारा असा हा कायदा होता. कायदा परिणामकारकपणे कार्यवाहीत येण्यास काहीएक कालावधी जावा लागला. 1927-28 साली काही निवडक प्रदेशापुरता तो लागू करण्यात आला व 1934-35 सालच्या दरम्यान सर्व संस्थानात तो अमलात आला.

1901-02 सालचा विधवाविवाहाचा व धर्मस्वातंत्र्याचा कायदा, 1904-05 सालचा बालविवाह प्रतिबंधक कायदा आणि 1908 सालचा विवाहनोंदणी कायदा यांमागेही महाराजांचीच प्रेरणा होती. शेवटचा कायदा ब्रिटिश सरकारच्या कायद्याशी मिळताजुळता करून घेण्यासाठी त्यात 1932 साली दुरुस्ती करण्यात आली. पुढे घटस्फोटाच्या कायद्यासाठीही प्रयत्न सुरू झाले.

शतकानुशतकांचे पूर्वग्रह आणि अंधश्रद्धा यांपासून प्रजाजन मुक्त नव्हते, तेव्हा अंत्यज वा अस्पृश्य यांच्या प्रश्नाबाबत मात्र महाराजांनी सावधगिरीने पावले टाकली. या वर्गावर होणारा अन्याय उदारमतवादी हिंदूंनी अनेकवार मान्यच केलेला होता. पण जनतेची सनातनी प्रवृत्ती आणि तिला असणारी धार्मिक परंपरेची मान्यता यांमुळे हा प्रश्न सहजासहजी सुटू शकला नव्हता. महाराजांनी अंत्यजांसाठी वसतिगृहाची सोय असणाऱ्या शाळा सुरू केल्या. बडोद्यात एक आर्यकुमाराश्रम सुरू करण्यात आला. अंत्यज मुलाला आर्यकुमार किंवा आर्यपुत्र म्हणणे हे प्रतिष्ठा प्राप्त करून देणारे होते. 23 मार्च 1918 रोजी भरलेल्या अस्पृश्यता निवारण परिषदेचे अध्यक्षपद महाराजांनी भूषविले, तेव्हा त्यांनी जपान वा रशिया या देशांचे अनुकरण करून सामाजिक गुलामगिरीचा त्याग करण्यासाठी कळकळीचे आवाहन केले होते. तसे केल्यासच आपल्या राष्ट्राला जगात सन्मानाचे व प्रतिष्ठेचे राजकीय स्थान प्राप्त होईल, असे त्यांचे रास्त म्हणणे होते.

ग्रंथालय-चळवळीचा झालेला प्रचंड विस्तार, 'प्राच्यविद्या संशोधन संस्थे'ची ('ओरिएंटल इन्स्टिट्यूट'ची) स्थापना व बालवीर चळवळीचा प्रारंभ या उपक्रमांचा उल्लेख न केल्यास प्रस्तुत कालखंडाचे समालोचन अपुरेच राहील. उच्च शिक्षणासह मोफत व सक्तीच्या शिक्षणाची केलेली तरतूद ग्रंथालयांच्या पुरेशा सोयींच्या अभावी नीटपणे फलद्रूप झाली नसती. यामुळे इतर अनेक उपक्रमांप्रमाणे ग्रंथालय चळवळीच्या आद्यत्वाचा मान बडोद्याकडेच जातो. प्रत्यक्ष ग्रंथालयविभाग 1910 साली सुरू झाला असला, तरी महाराजांच्या मनात एतद्विषयक विचार बराच काळ घोळत होते. एकदा त्यांनी असे म्हणणे मांडले आहे : "लोकांना आधी शिक्षण तर द्यायचे व नंतर मात्र त्या दृष्टीने कसलीच साधने उपलब्ध करून द्यायची नाहीत, हा घोर अपराध नसला, तरी ही उघडउघड विसंगत गोष्ट आहे." 1907-08 साली महाराजांनी अमेरिकेला भेट दिली तेव्हा या ग्रंथालय चळवळीला मूर्त स्वरूप प्राप्त झाले. ग्रंथालय संचालकपदी डॉ. डब्ल्यू. ए.

बॉर्डेन या अमेरिकन तज्ज्ञाची त्यांनी 1913 साली नेमणूक केली, तसेच राज्यातील ग्रंथालय चळवळीचे एक जनक मोतीभाई अमीन यांना बोर्डेन यांचे मदतनीस म्हणून आणण्यात आले. अशा रीतीने महाराजांनी ग्रंथालय चळवळीच्या दृष्टीने अगदी महत्त्वाचे पाऊल पुढे टाकले. राजवाड्यातील स्वतःचे खाजगी ग्रंथालय महाराजांनी देणगीदाखल दिले व तेच बडोद्यातील मध्यवर्ती ग्रंथालयाचे प्रारंभीचे केंद्रस्थान ठरले. महाराजांचे बंधू संपतराव गायकवाड यांनी आपला समृद्ध खाजगी संग्रहसुद्धा केंद्रीय ग्रंथालयाला दिल्याने त्याचे वैभव अनेक पटींनी वाढले. ग्रंथालय खात्याने त्याला एक चांगला बालविभागही जोडला. आणि फिरत्या ग्रंथालयाची योजनाही सुरू केली. अमेरिकन तज्ज्ञ बॉर्डेन हे संस्थानात तीन वर्षे होते व त्या कालावधीत त्यांनी सर्वत्र अनुदानयुक्त व मुक्त ग्रंथालयांची व वाचनालयांची पद्धती सुरू केली. या सर्व संस्था तरुण वा वृद्ध, श्रीमंत वा गरीब अशा सर्वांना जातीपातीचा, लिंगभेदाचा विचार न करता खुल्या होत्या. निरक्षरांना शिक्षण देण्याची योजनाही सुरू झाली होती. या मध्यवर्ती ग्रंथालयात 1927 साली दहा लाखांवर ग्रंथ होते.

आंतरराष्ट्रीय कीर्तीची प्राच्यविद्या संशोधन संस्था स्थापन करून तेथे संस्कृतातील व अन्य अभिजात भारतीय भाषांतील दुर्मिळ ग्रंथांचा संग्रह करून व विद्वानांनी अभ्यासार्थ अवश्य ते साहाय्य देऊन एक ज्ञानसंवर्धनाचा पुढील टप्पा गाठण्यात आला. अभिजात ग्रंथांचा संग्रह करण्यात येऊन त्यांच्या संहिता प्रकाशनासाठी संपादित करण्यात येऊ लागल्या. या कार्याचा पाया विठ्ठलमंदिरातील दुर्मिळ संग्रह हस्तगत करून घालण्यात आला. त्यात मग संपतरावांकडून आलेल्या तसेच अन्य ठिकाणांहून मागाहून आलेल्या शेकडो ग्रंथांची भर पडली. या संस्थेचे कार्य सुरवातीला मध्यवर्ती ग्रंथालयाची एक शाखा म्हणून सुरू झाले. पण 1927 मध्ये 'ओरिएंट इन्स्टिट्यूट' (प्राच्यविद्यामंदिर) असे नामकरण करून त्याचा एक स्वतंत्र विभाग निर्माण करण्यात आला. 1943 साली या संस्थेच्या ग्रंथशाळेत 14,000 हस्तलिखिते व 12,000 छापील ग्रंथ होते. संस्थेने 'गायकवाड ओरिएंटल सीरिज' या मालेमधून अप्रसिद्ध व दुर्मिळ असे संस्कृत, प्राकृत व अर्धमागधी ग्रंथ प्रसिद्ध केले. या संस्थेच्या भाषांतर विभागाने 'सयाजी ज्ञानमंजूषा' आणि 'लघुज्ञानमंजूषा' या मालांमधून मूळ संहितांसह अनेक उपयुक्त ग्रंथ प्रसिद्ध केले. आयुष्याच्या अखेरच्याच वर्षी सयाजीरावांनी 'फॉरिन व्होकॅब्युलरी ऑफ दि कुराण' ('कुराणातील परकीय शब्दसंग्रह') हा प्रो. ऑर्थर जेफ्री यांनी साक्षेपाने तयार केलेला ग्रंथ प्रसिद्ध करण्याची व्यवस्था केलेली होती.

1919 च्या जानेवारीत राज्यात बालवीर चळवळीचा प्रारंभ झाला व पुढे ती सर्व राज्यात पसरली. 'हिज हायनेस दि महाराजाज् बॉय स्काउटस्' या बालचमूत इतर जातींबरोबर अंत्यज मुलांचा तसेच सुधारगृहातील मुलांचाही समावेश असे. ओखामंडळ येथे एक वाघेर बालवीरचमू सुरू करण्यात आली. यथावकाश वीरबाला (गर्ल गाइड)

चळवळही सुरू झाली. प्रारंभी मात्र तिला म्हणावा तसा प्रतिसाद मिळाला नाही. 1929 साली इंग्लंडात भरलेल्या बालवीर मेळाव्याला सयाजीरावांनी बडोद्यातील बालवीरांची एक तुकडी मुद्दाम पाठविली होती; शिवाय खुद्द महाराज तेथे गेले आणि त्या तुकडीला त्यांनी जातीने भेट दिली. मुलांच्या मानसिक विकासाविषयी महाराज विशेष आस्था दाखवीतच असत; पण पुढे त्यांच्या व्यक्तित्वाच्या समतोल वाढीसाठी त्यांनी सक्तीचे शारीरिक शिक्षणही सुरू केले.

27 मे 1925 रोजी सयाजीरावांनी आपल्या कारकीर्दीची पन्नास वर्षे पूर्ण केली; या घटनेबद्दल त्यांना धन्यता वाटणे हे तर साहजिकच होते. या निमित्ताने एक टोलेजंग सोहळा 1926 च्या जानेवारीत साजरा झाला. तन्निमित्त त्यांनी एक सुवर्णजयंती व्याख्यानमाला सुरू केली. यामागे राष्ट्रीय किंवा आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या विद्वानांची व्याख्याने आयोजित करण्याची कल्पना होती. संस्थानातील प्रमुख शहरांत दूरध्वनीची सोयही करण्यात आली. या सोहळ्याची आणखी ठळक वैशिष्ट्ये म्हणजे बंदिवानांना झालेली शिक्षामाफी आणि शेतकऱ्यांना दिलेली साऱ्यातील सूट. या सर्वांवर कळस म्हणजे महाराजांनी उभी केलेली बडोद्यातील कीर्तिमंदिर ही देखणी व शोभिवंत इमारत. भावी काळात पिढ्यान्-पिढ्या चिरायू स्मारकशिल्प उभारण्याची संकल्पना करणाऱ्या ईजिप्तमधील फाराव्ह सम्राटांप्रमाणे महाराजांची ही कीर्तिमंदिराची कल्पना होती. एका 'राजाच्या अहंकारा'चे स्मारक अशा शब्दांत आजचे सुधारलेले जग त्याची संभावना करण्याची शक्यता आहे.

1927 पासून 1939 पर्यंतच्या काळात सयाजीरावांनी आपल्या संपन्न व प्रदीर्घ राजवटीच्या अखेरच्या टप्प्यात प्रवेश केला. या टप्प्याचा प्रारंभ विश्वामित्री नदीच्या अत्यंत भीषण पुराने झाला. यापूर्वी लोकांनी अशी आपत्ती पाहिली वा ऐकलीही नव्हती, असे उद्गार तत्कालीन लोकांकडून निघाले. सयाजीराव या वेळी युरोपात होते. पण तेथूनही पूरग्रस्तांना शक्य ते सर्व साहाय्य देण्याचे आदेश त्यांनी दिले. महाराजांचे पुत्र धैर्यशीलराव त्या प्रसंगी खंबीरपणे पुढे सरसावले व पूरग्रस्त भागांची त्यांनी अत्यंत बहुमोल सेवा केली. बडोदे शहराचे या पुराने अतोनात नुकसान केलेच; पण बडोद्याच्या प्राणिसंग्रहालयातील जवळजवळ सर्व प्राण्यांचा या प्रलयाने शोचनीय बळी घेतला.

सन 1929 नंतरच्या प्रत्येक वर्षी पूर, धुके, टोळधाड, अकाली पाऊस आणि मंदीची लाट अशा, काही ना काही नैसर्गिक आपत्ती येऊन कोसळत होत्या. पण आता अशा आव्हानांना तोंड देण्याइतकी क्षमता राज्यप्रशासनामध्ये आलेली होती. महाराजांच्या राजवटीचा अंतिम टप्पा भक्कम पायावरील दृढीकरण आणि सुधारणांची वाढ या दृष्टींनी विशेष उल्लेखनीय होता. अर्थात नवलाईने चकित करणारे उपक्रम त्यात नव्हते. प्रगतीच्या रथाची चक्रे सुरळीतपणे चालू राहण्यासाठी अधूनमधून त्यांना वंगण घालण्याची

आणि क्वचित दुरुस्ती करण्याची किंवा एखादा भाग बदलण्याची काय ती तेव्हा गरज होती. येथे आपण काही महत्त्वाच्या गोष्टींची फक्त नोंद घेऊ. 1927 साली सर मनुभाई मेहता यांच्या जागी आलेले दिवाण सर व्ही. टी. कृष्णमाचारी यांनी रस्ते सुधारण्याचा कार्यक्रम नेटाने हाती घेतला. सर मनूभाईच्या दहा वर्षांच्या कारकीर्दीत शासनव्यवस्थेत लोकांचा सहभाग असावा, या दृष्टीने विशेष प्रगती साधली गेली. त्यांनी प्रशासन अधिक कार्यक्षम आणि प्रामाणिक बनविले. ग्रामोद्धाराच्या व ग्रामसुधारणेच्या अनेक योजना त्यांनी सुरू केल्या होत्या. सर व्ही. टी. कृष्णमाचारी यांनी या गोष्टीला जोराची चालना दिली. रस्तेसुधारणा हा त्यांच्या कारकीर्दीचा एक अविभाज्य भाग होता. रेल्वे स्थानकांना जोडणाऱ्या उपमार्गांना त्यात अग्रक्रम देण्यात आलेला होता. 1938-39 पर्यंत 289 मैल लांबीचे 114 रस्ते पूर्ण करण्यात आले. 1931-32 मध्ये सरकारी साहाय्याने 459 विहिरी खेड्यापाड्यांतून खोदण्यात आल्या. प्रांतिक पंचायतींमार्फत 272 अन्य विहिरी बांधल्या गेल्या व 277 कूपनलिकाही खोदण्यात आल्या. शेतीसुधारणेवर दरवर्षी शासनाकडून साडेसात लाख रुपये खर्च होत असे. गुरेढोरे मोकाट सोडून शेतातील उभ्या पिकांचे नुकसान करण्यास कारणीभूत होणाऱ्या लोकांना शिक्षा करण्याची तरतूद असणारा एक कायदाही करण्यात आला. मलेरियाविरोधी मोहीम हाती घेऊन प्रत्येक खेड्यासाठी पाच मैलांच्या परिसरात एकेक वैद्यकीय केंद्र स्थापन करण्यात आले. 1938-39 साली शासकीय साहाय्याने चालणारी अशी एकूण 110 केंद्रे होती. तसेच राज्यात ग्राम-आरोग्य केंद्रे आणि आठ रुग्णालये होती. गरीब मुसलमानांना कारखान्यांतील ग्यार मी (सत्रातील शिजविलेले अन्न) देण्याची व हिंदूंना खिचडी वाटण्याची जुनी चालत आलेली प्रथा 1936-37 साली महाराजांनी बंद केली. त्याऐवजी अशा मंडळींना दरमहा ठराविक वृत्तिवेतन देण्यात येऊ लागले. 1935-36 मध्ये पुरातत्त्व सर्वेक्षण खाते सुरू करण्यात आले व त्याच्या पुढील वर्षीच सांख्यिकी खातेही सुरू झाले. 1936-37 साली बडोद्याजवळ हरणी खेड्यात एक विमानतळ उभारण्यात आला. 1937-38 साली माध्यमिक शिक्षकांसाठी प्रशिक्षण महाविद्यालय निघाले, तसेच जिल्हा पातळीवर शाखा असणारे एक राज्य-आर्थिक-मंडळ स्थापन झाले.

1935 च्या मे महिन्यात सयाजीरावांनी आपल्या राजवटीची साठ वर्षे पुरी केली. तन्निमित्त एक हीरकमहोत्सव साजरा करण्याचा निर्णय घेण्यात आला. वृद्धत्वाकडे झुकलेल्या महाराजांनी आपल्या नेहमीच्याच उत्साहाने या संधीचा उपयोग करून घेऊन एक कोटीचा हीरकमहोत्सव विश्वस्तनिधी निर्माण केला. त्या निधीच्या उत्पन्नाचा विनियोग खेड्यापाड्यांतील जनतेची, विशेषतः पददलित व दीनदुबळ्या प्रजेची स्थिती सुधारण्यासाठी व्हावयाचा होता. हे कदाचित, महाराजांचे अखेरचे सत्कृत्य असावे. या निधीचे कार्य लवकरच योजनाबद्ध रीतीने सुरू झाले. या शेवटच्या टप्प्यात बडोद्यात

एक विद्यापीठ आणि एक आकाशवाणीकेंद्र स्थापन करण्याचा विचार पुढे आला व त्या संदर्भातील पुष्कळसे प्राथमिक कार्यही या टप्प्यात पुरे झाले होते. पण या योजना साकार होण्यापूर्वीच महाराजांचे निधन झाले. आधुनिक बडोद्याच्या या महान शिल्पकाराचे-सर सयाजीराव गायकवाडांचे मुंबई येथे 6 फेब्रुवारी 1939 रोजी विश्रब्धपणे प्राणोत्क्रमण झाले !

## चार

# स्वदेशात आणि परदेशात

27 मे 1875 दिवशी सयाजीरावांचे किंवा नेमके सांगायचे तर गोपाळरावाचे दत्तकविधान होऊन ते राजपदी बसले, पण "शिरावर राजमुकुट धारण करणारे मस्तक सदैव अस्वस्थच असते!" असे जे राजपदाविषयी शेक्सपियरने म्हटले आहे, ते आपल्या बाबतीतसुद्धा अगदी यथार्थ ठरणार आहे, याची सयाजीरावांना त्या वेळी कल्पनाही नसेल किंवा त्यांना तसे कधी स्वप्नातही वाटले नसेल! दिवसाचे चोवीस तास महाराज म्हणून वावरण्यात कोणत्या यातना असतात, त्या त्यांना प्रारंभी ताबडतोबच अनुभवायला मिळू लागल्या. कालौघाबरोबर एकामागून एक वाट्याला आलेले घरगुती जीवनातील आघात, आयुष्याच्या अखेरीपर्यंत आमवातासारख्या चिवट दुखण्याने पुरविलेला पिच्छा, मन पोखरून टाकणारी राज्यकारभाराची चिंता, सार्वभौम ब्रिटिश सरकारने गैरसमज करून घेतल्याने कंठावा लागलेला संत्रस्ततेचा काळ आणि शेवटी आपली दुःखे वा निराशा मनमोकळेपणे उघड करता येतील, अशा सलगीच्या व्यक्तीचा अभाव या सर्वांमुळे महाराज म्हणून त्यांना लाभलेल्या स्थानाचा कोणी हेवा करावा, अशी काही स्थिती नव्हती.

त्यांचे चरित्रकार राईस, सार्जंट आणि सरदेसाई यांनी तद्वतच मिस् टॉटनहॅमबाईनेही आपल्या लेखनातून कसोटीच्या प्रसंगी महाराजांची झालेली घालमेल व त्यांना सहन कराव्या लागलेल्या मानसिक यातना यांची झलक दाखविलेली आहेच. 'श्रीमंत महाराज सयाजीराव गायकवाड यांचा खाजगी व कौटुंबिक वृत्तांत' या बहुधा खाजगी प्रचारार्थ असलेल्या गोपनीय ग्रंथावरून महाराजांचा स्वभाव, राहणी, कामकाजाविषयीच्या सवयी, वर्तनामागील रहस्य, खाणेपिणे, पोशाख, करमणूक व खेळ तसेच अन्य व्यक्तिगत गोष्टी यांबाबत पुष्कळच अधिकृत माहिती उपलब्ध होते. सयाजीरावांच्या 'हुजूर हुकूम' या नावाखाली ओळखल्या जाणाऱ्या आज्ञा, त्यांचे आप्तस्वकीय व भोवतालचे लोक, त्यांचे खाजगी कारभारी, बडादे या राजधानीच्या नगरीचे महत्त्व व तिच्यासंबंधीच्या त्यांच्या कल्पना, बढत्या देण्याची त्यांची पद्धती, वेदोक्त प्रकरणाच्या वादंगाचे बारकावे, धार्मिक निधींविषयीच्या सुधारणा, राजवाड्याकडील खर्चावर असणारे त्यांचे नियंत्रण, 'हुजूर स्वाऱ्या' आणि त्या स्वाऱ्यांची विगतवार, अगदी तक्त्यांच्या स्वरूपात तपशीलाने

भरलेली कोष्टके, येथपर्यंत बारीकसारीक माहिती सरदेसाई यांच्या या ग्रंथावरून मिळते. आपल्यापुढे असणाऱ्या अशा प्रचंड साधनसामग्रीच्या राशीतून सयाजीरावांचे जे चित्र उधसून वर येते, ते साधे वा एकसुरी नाही. त्यांचे व्यक्तिमत्त्व गुंतागुतीचे, परस्परविरोधी गुणांनी युक्त असे मोठे व्यामिश्र होते. मनात काय चालले आहे, याचा थांगपत्ता ते इतरांना लागू देत नसत. भोवतालच्या लोकांविषयी ते संशयग्रस्त असत असे नव्हे; पण त्यांचा स्वभाव अंतर्मुख असल्याने किंवा ते भिडस्त होते व म्हणून कोणाजवळही आपले मन मोकळे करण्याची त्यांची वृत्ती नव्हती. घरात, आपल्या संस्थानात व देशात ते महाराजा होते; मात्र परदेशात एक सर्वसामान्य व्यक्ती म्हणून जरी नव्हे, तरी एक सर्वसाधारण खानदानी व्यक्ती म्हणूनच ते वावरत असत, तेव्हा वारंवार होणाऱ्या परदेशी दौऱ्यांमुळे, आपण महाराज आहोत, हे विसरण्याची संधी त्यांना लाभत असे, असाही निष्कर्ष कोणी काढू शकेल. परदेशात परंपराप्राप्त बंधनातून मुक्त आणि कोणाच्याही डोळ्यांत न भरणारे जीवन त्यांना उपभोगता येई.

स्वदेशी असताना महाराज स्वतःच्या अधिकाराविषयी मत्सरी व अहंकारीही असत. त्यामुळे रेसिडेंटकडून किंवा खुद्द व्हाइसरॉयकडून आपल्यापेक्षा उच्चतर सत्ताधारी असल्याची व आपल्या हुकुमाची तामिली करण्याची जाणीव करून दिली गेल्यास तीसुद्धा त्यांना कधी सहन झाली नाही. ज्याच्याशी आपला मैत्रीचा तह झालेला आहे, त्या ब्रिटिश सम्राटाचा प्रतिनिधी या नात्याने व्हाइसरॉय किंवा बडोद्याचा रेसिडेंट हे उत्तम परराष्ट्रीय वकीलाप्रमाणे ब्रिटिश सम्राट किंवा देशी संस्थानिक यांचे हितसंबंध समानत्वाच्या पातळीवर सांभाळीत नसत, याचे त्यांना वैषम्य वाटे. परदेशातच प्रदीर्घ काळ वास्तव्य होत असल्यामुळे अशा अप्रिय मंडळींच्या आमनेसामने गाठीभेटी आपोआप टळत असत; परंतु प्रथम क्वीन व्हिक्टोरिया व त्यानंतरचे उत्तराधिकारी ब्रिटिश राजे यांच्याशी संपर्क ठेवण्याची संधी मात्र त्यांनी कधीही दवडली नाही.

युरोपीय जीवनपद्धती त्यांनी अगदी सहजपणे स्वीकारली होती; ती त्यांना मनोमन आवडूही लागली होती. नाही म्हटले तरी, देशातील तसेच परदेशातील त्यांची निवासस्थाने प्रामुख्याने युरोपीय जीवनपद्धतीचेच दर्शन घडविणारी आहेत. आपले हरकामे कारभारी, तर कधी व्यक्तिगत कार्यवाह, ड्रायव्हर, आचारी आणि शिक्षक नेमताना ते युरोपीय व्यक्तीची निवड करीत. त्यांचा पत्रव्यवहार पाहिल्यावरही आपल्या देशबांधवांपेक्षा युरोपीय व त्यांतल्या त्यात इंग्लिश लोकच त्यांचे जवळचे मित्र होते, असे दिसेल. गोल्फ, टेनिस, बिलियर्ड हे खेळ ते खेळत आणि घोड्यावरून रपेट करण्याची तसेच अश्वशर्यतींची त्यांना आवड होती. युरोपीय स्त्री-पुरुषांचा सहवासच त्यांना अधिक रोचक वाटत असे व क्लब, पार्ट्या, नृत्यसमारंभ अशा कार्यक्रमांतील स्त्री-समूहाविषयी सयाजीरावांना विशेष आपुलकी वाटे, असे दिसून येई. युरोपीय जीवनपद्धतीमुळे त्यांना शारीरिक आरोग्य, सुखसोयी तसेच मानसिक शांततेचा लाभ झाला. म्हणूनच शक्य

होईल तेव्हा ते घरच्यापेक्षा परदेशातच अधिक काळ घालवीत. 'गैरहजर संस्थानिक' असा शिक्का त्यांच्यावर मारला जात असला, तर त्यात आश्चर्य वाटण्यासारखे काही नव्हते.

सयाजीरावांच्या प्रथम पत्नी पहिल्या चिमणाबाई यांच्यावर त्यांचा जीव होता, असे दिसते. या दांपत्याला जुलै 1881 मध्ये एक व जून 1882 मध्ये दुसरी अशा दोन मुली झाल्या; पण त्या अल्पवयीन ठरल्या. 3 ऑगस्ट 1883 रोजी राजदांपत्याला पुत्ररत्नाचा लाभ झाला आणि राज्याला वारसही मिळाला. त्यांचे नामकरण फत्तेसिंहराव असे करण्यात आले. सयाजीरावांनी आता लक्ष्मीविलास राजवाड्यात वास्तव्य करण्यास सुरवात केल्याचा उल्लेख मागे आलाच आहे. जुना पडका सरकारवाडा कोंदट, धुळीने भरलेला आणि आजूबाजूला कळकट लोकांचा वावर असणारा असा त्यांना वाटे. आपले वसतिस्थान पालटण्यात त्यांचा आणखीही एक हेतू होता. घरातील वडीलधारी मंडळी व सर्व नातेवाईक यांच्यासह ते जुन्या वाड्यात राहत असत; अर्थात त्यांना एकांत असा फारसा मिळत नसे व मोकळेपणाने वावरता येत नसे. शिवाय कदाचित त्यांच्या वैचारिक स्वातंत्र्यावरही तेथे बंधने येत असत. म्हणून लांब असला, तरी त्यांनी प्रथम मकरपुरा राजवाड्यात राहावयास जायचे ठरविले. हा राजवाडा चांगला ऐसपैस आणि प्रशस्त होता. चांगल्या सजावटीने व सर्व प्रकारच्या सुखसोयींनी तो सुसज्जही करण्यात आला होता; त्याच्याभोवती विस्तृत उद्यानेही होती. त्यामुळे तेथे अगदी इतमामाने राहणे शक्य होते. तेथे सयाजीरावांनी आपल्या पत्नीच्या शिक्षणाचीही व्यवस्था केली होती. त्यांच्या लक्ष्मीविलास राजवाड्यातील रहिवासाची कथा तदनंतरची होय.

आता त्यांची दिनचर्या निश्चित झालेली होती. नियमितपणा आणि नेमस्तपणा हे तिचे खास वैशिष्ट्य होते. सूर्योदयाबरोबर ते उठत, मग नित्यकर्मानंतर व्यायाम व स्नान करून ते हलकी न्याहारी घेत. नंतर पायी वा घोड्यावरून रपेट करीत. अकरा वाजता भोजनाची वेळ होईपर्यंत ते कामकाज पाहात. नंतर थोडा वेळ विश्रांती घेऊन किंवा एखादा बिलियर्डचा डाव खेळून चहापानाच्या वेळेपर्यंत म्हणजे दुपारी साडेतीन किंवा चार पर्यंत ते सरकारी कचेरीतील कामे पाहात. त्यानंतर सवडीनुसार आपल्या कुटुंबियांसमवेत ते काही वेळ घालवीत किंवा लोकांच्या गाठीभेटी घेत. संध्याकाळी साडेपाच किंवा सहा पासून सुमारे दोन तास ते फिरायला जात किंवा घोड्यावरून फेरफटका मारीत. परत येताना काही वेळ नातेवाईकांना वा आश्रितांना भेटून त्यांची विचारपूस करीत. मग रात्रीच्या भोजनासाठी ते राजवाड्याकडे परतत. भोजनोत्तर साधारणपणे नऊ ते अकरा पर्यंत वाचन, दैनंदिनीलेखन आणि मग झोप असा त्यांचा प्रायः क्रम असे. बडोद्यातील हा दिनक्रम अखेरपर्यंत त्यांनी निष्ठेने पाळलेला होता. परदेशात असताना या चाकोरीतल्या जीवनक्रमात जो काय थोडाफार फेर होत असेल, तेवढाच !

तारुण्याच्या प्रारंभकाळी महाराजांना घोड्यावर बसण्याची विशेष हौस होती. शिकारीसाठी अठरा मैलांवर असणाऱ्या दाबका येथे ते जात व परत येऊन पुन्हा सायंकाळी न थकता घोडदौड करण्यास चुकत नसत, असे सांगतात. वाढत्या वयाबरोबर शारीरिक मेहनतीचे प्रमाण कमी झाले, तरीपण नियमितपणात मात्र कधीच खंड पडला नाही. चालण्याचा व्यायाम त्यांना नेहमीच आवडत असे. डोंगराळ मुलुखात वास्तव्य असले, तरीही त्यांनी तो कधी चुकवला नाही. अशा फेरफटक्याच्या वेळी त्यांच्या सोबत असलेल्या लोकांना त्यांच्या गतीने चालणे कठीण जात असे. "आपल्या अनेकानेक परदेशसफरीत बोटीवरसुद्धा त्यांचा पायी रपेट करण्याचा क्रम न चुकता चालत असे." कामाकडे त्यांचे कधीच दुर्लक्ष होत नसे; कारण काम व खेळ या एकाच नाण्याच्या दोन बाजू होत, असे त्यांना वाटत असे. संस्थानात खुल्या मैदानी खेळांची भरपूर वाढ व्हावी, अशी आपली मनीषा त्यांनी आपल्या एका मित्रापाशी व्यक्त केलेली होती. "करमणुकीची गरज अधिकाधिक वाढत जात आहे व ती अगदी अपरिहार्यही होऊन बसलेली आहे. जीवनाची शर्यत आता तीव्र बनते आहे आणि तिची गतिमानता अधिकाधिक वाढते आहे" ते त्यांना अगदी अनुभवाने कळून चुकले होते. त्रेसष्ठ वर्षांचे वय झाले, तरी टेनिस खेळण्याची त्यांची हौस अद्याप कायम होती. डिसेंबर 1925 मध्ये त्यांच्याच प्रेरणेने हिंद विजय जिमखान्याच्या विद्यमाने भरलेल्या सातव्या वार्षिक खेळांच्या सामन्याचे यजमानपद बडोद्याकडेच होते, यावरून व्यायामपटूंना आश्रय व उत्तेजन देण्याची महाराजांना किती उत्कंठा होती, याची चांगलीच कल्पना येते. "त्या काळी पश्चिम हिंदुस्थानातून तसेच खुद्द बडोदे संस्थानातून एकूण बावीसशे स्पर्धक नोंदविण्यात आले होते. धावणे, उडी मारणे, कुस्ती व इतर शारीरिक कसरती तसेच भारतीय अन्य खेळांचा एक मोठा भरघोस महोत्सवच तेव्हा साजरा झाला. आपल्या या जिमखान्याला हिंदी ऑलिंपिक खेळांची प्रतिष्ठा मिळवून देण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा होती. इंग्लंडमधील ऑस्टर्ली येथे स्थापन झालेल्या नव्या इंडियन जिमखान्याच्या क्लबचे महाराज हे एक उपाध्यक्ष होते. स्वतःच्या मुलांनीही टेनिस व क्रिकेटसारखे खेळ खेळावे, म्हणून त्यांनी प्रोत्साहन दिले व त्यासाठी शिक्षकही नेमले.

आपले रहिवासाचे स्थान बदलल्यावर महाराजांनी आपल्या खाजगी खात्याचीही पुनर्रचना केली. सन 1883 मध्ये त्यांच्याकडे सुमारे दोनशे लोकांचा लवाजमा होता. या संख्येत मोठी कपात करून त्यांनी ती चाळीसवर आणली आणि त्यांतील सेवकांना ठराविक कामे नेमून दिली. राजवाड्यात मानकरी मंडळींचीही भाऊगर्दी होती; त्यांत नातेवाईकही बरेच होते. त्यांच्याकडे निश्चित अशी कामगिरी कसलीच सोपविलेली नसल्याने नेहमी गोंधळ उडत असे. त्यांच्यापैकी कित्येक निरक्षरच असल्याने खेळ किंवा गप्पा करण्यापलीकडे त्यांचा उपयोग होण्यासारखा नव्हता. सयाजीरावांनी मानकऱ्यांकडे निरनिराळ्या जबाबदाऱ्या वाटून दिल्या. जेव्हा कधी त्यांच्यापैकी कोणाला

प्रशासकीय कामकाजात सामावून घेणे शक्य होई, तेव्हा ते त्याची ताबडतोब त्या कामावर पाठवणी करीत. 'ब्राह्मणांना करावयाच्या दानधर्मा'तही त्यांनी कपात केली. गृहव्यवस्थेसाठी अनेकांचा अनुभव घेतल्यानंतर शेवटी त्यांनी पेस्तनजी दोराबजी खंडाळावाला यांची प्रथम सन 1884 मध्ये खाजगी कार्यवाह म्हणून व सन 1887 मध्ये खाजगी कारभारी म्हणून नेमणूक केली. त्याच वर्षी आपले बंधू संपतराव यांना पुढील शिक्षणासाठी परदेशी पाठविण्याचा काहीसा धिटाईचा निर्णय त्यांनी घेतला.

7 मे 1885 रोजी महाराजांना प्रिय पत्नीच्या निधनाचा जबरदस्त धक्का बसला. या पत्नीवर त्यांचे विशेष प्रेम असल्याने त्यांना तिचा वियोग अतिशय जाणवला. पत्नीच्या मृत्यूमुळे सयाजीरावांना अनेक दिवस धड झोपही येत नसे आणि त्याचा त्यांच्या प्रकृतीवर फार अनिष्ट परिणाम झाला, असेही सांगण्यात येते. परिस्थितीत पालट म्हणून डॉक्टरांनी त्यांना युरोपच्या सफरीचा सल्ला दिला व तो त्यांनी मानलाही. या पहिल्या चिमणाबाई स्वभावाने 'मृदुकोमल, दानशूर, मनमिळाऊ अशा निष्ठावंत माता आणि अतिप्रेमळ पत्नी' असल्याने महाराजांना दीर्घ काळ त्यांचा विसर पडला नाही. त्यांच्या निधनाने महाराजांच्या जीवनात एक पोकळी निर्माण झाली. न्यायमंदिराच्या मध्यवर्ती सभागृहात चिमणाबाईचा एक पुतळा आहे, आणि घड्याळाच्या एका मनोऱ्यानेही त्यांची स्मृती आज कायम करून ठेवली आहे.

महाराज अधिकाधिक म्लान दिसू लागले आणि विषण्ण अवस्थेत त्यांची कालक्रमणा होत राहिली. साहजिकच जमनाबाईंना त्यांची काळजी वाटू लागली आणि त्यांनी महाराजांना दुसरा विवाह करण्याची सूचना केली. ती त्यांनी नाइलाजास्तव मान्य केली. योग्य वधूची निवड करण्यासाठी नेहमीप्रमाणे वधूसंशोधन सुरू झाले आणि शेवटी मध्यभारतातील देवास या छोट्या संस्थानची चौदा वर्षांची राजकन्या गजराबाई हिची निवड करण्यात आली. 28 मे 1885 रोजी हा विवाह साजरा झाला व नववधूचे नामकरण 'दुसऱ्या' चिमणाबाई असे झाले. पण विवाहामुळे अपेक्षित किमया घडून आली नाही. महाराजांची निद्रानाशाची व्यथा कायमच राहिली. सप्टेंबर 1886 मध्ये हवापालट म्हणून राजस्थानातील थंड हवेचे ठिकाण अबू येथे काही आठवडे महाराजांनी मुक्काम केला. त्यानंतर त्यांनी सिलोनला भेट दिली व परत येताना फेब्रुवारी 1887 मध्ये ते महाबळेश्वरला राहिले. पण धड झोप लागत नसल्याने त्यांची अशक्तता तशीच कायम होती. डॉक्टरांनी मज्जाक्षीणतेचा विकार जडल्याचे निदान केले आणि महाराजांना युरोपला हवा पालटण्यासाठी जाण्याची सूचना केली.

आपल्या व्याधीवर सुचविल्या जाणाऱ्या या उपायांचे महाराजांना चांगलेच भान आलेले होते, असे दिसते. अनेकांनी त्यांचे आजारीपण गांभीर्याने घेतलेच नाही; त्यांची त्याबद्दल थट्टाही केली. पण त्या थट्टेकडे दुर्लक्ष करून त्यांनी परदेशच्या दौऱ्याचा निर्णय घेतला. अर्थात त्याबद्दल त्यांना स्वतःलाही उत्सुकता होतीच. कारण हा सुचविला

गेलेला उपाय त्यांच्या पसंतीस उतरणाराच होता. सिलोनला गमन करण्यापूर्वी 'गैरहजर संस्थानिक' ही कल्पना आपणास कशी तिरस्कृत वाटते, हे त्यांनी लॉर्ड डफरिन यांना कळविले होते. आणि प्राप्त परिस्थितीत सुरक्षित प्रशासनाची शक्य ती व्यवस्था करण्याचे आश्वासनही दिले होते. राज्यकारभाराची सूत्रे त्यांनी दिवाण लक्ष्मण जगन्नाथ यांच्या हाती सोपविली आणि 31 मे 1887 रोजी मुंबईहून प्रयाण केले. त्यांच्याबरोबर महाराणीसाहेब, एक खाजगी डॉक्टर, राजपुत्र फत्तेसिंहराव आणि पन्नास लोकांचा परिवार होता. इतउत्तर ज्या सफरी त्यांनी केल्या, तशी ही सफर नव्हती. नंतरच्या सफरीत पाच-सहा माणसांहून अधिक लवाजमा बरोबर नसे. या पहिल्या सफरीतील एकूण लबेद्यामुळे घडून आलेल्या प्रसंगांच्या ते पुढील काळात विनोदाने आठवणी सांगत असत. हिंदुस्थानात आणि सिलोनमध्ये प्रकृतिस्वास्थ्य मिळविण्याचा त्यांचा प्रयत्न अयशस्वी झाल्याने त्यांनी युरोपला जाऊन ती किमया साधून घेतली. यामुळे युरोपमध्ये जाऊन प्रकृतिस्वास्थ्य राखण्याचा त्यांचा न संपणारा शोध सुरू झाला. मात्र युरोपचे हे दौरे त्यांनी सत्कारणी लावले, हे श्रेय त्यांना द्यावेच लागेल. पश्चिमेतील नव्या सुधारणांशी, तसेच नवनवे लोक, नवनव्या चालीरीती आणि जीवनक्रम यांच्या संपर्कात ते आल्याने संस्थानचा एक प्रकारे फायदाच झाला.

आपल्या त्रेसष्ट वर्षांच्या राजवटीत महाराजांनी चोवीस वेळा (ईजिप्त भेटीसह) युरोपचा प्रवास केला आणि जवळजवळ बावीस वर्षे म्हणजे आपल्या कारकीर्दीचा तिसरा हिस्सा त्यांनी भारताबाहेर म्हणजे युरोप, अमेरिकेत घालविला. यामध्ये हवापालटासाठी किंवा सरकारी भेटींच्या निमित्ताने बडोद्याबाहेर पण भारतातच त्यांनी केलेल्या दौऱ्यांचा सुमारे आठ वर्षांचा काळ मिळविल्यास एकूण तीस वर्ष ते आपल्या राज्याबाहेरच राहिले, असे निष्पन्न होते. त्यांच्या राजवटीचा हा जवळजवळ अर्धा हिस्सा ठरतो. 'गैरहजर राजा' असा त्यांच्यावर थट्टेखोरपणे शिक्का मारला जाई, आणि तरीही त्यांनी आपला क्रम तसाच चालू ठेवला, हे महाराजांच्या वर्तनावरील एक दुर्दैवी भाष्यच ठरावे. साधारणतः मार्च-एप्रिल ते नोव्हेंबर-डिसेंबर या मोसमात महाराज परदेशी असत. 1923 सालच्या अखेरपर्यंत युरोपला झालेल्या पहिल्या चौदा सफरीत त्यांनी 11 वर्षे 10 महिने आणि 2 दिवस एवढा कालक्षेप केला व त्यासाठी रु. 56,73,423 एकूण खर्च झाला असावा असा अंदाज आहे. तेव्हा थेट भारत मंत्र्यापासून तो खालच्या छोट्या-छोट्या अनेक संस्थानिकांपर्यंत ते अनेकदा टीकास्पद ठरत आले, हे साहजिकच आहे. आपली पहिली सफर महाराजांच्या चांगलीच स्मरणात राहिली होती. त्यांच्या लव्याजम्यात त्या वेळी एक शिंपी आणि एक उपाध्यायही होता. या सफरीत अगदी बडोद्यापासूनच अडचणी सुरू झाल्या होत्या. समुद्राचे काळे पाणी पार करून परदेशी जाणे, हे त्या काळी सनातनी हिंदू समाजाच्या दृष्टीने निषिद्ध होते. मनधरणी करून आपल्याबरोबर येण्यासंबंधी काही मंडळींचे मन मोठ्या मिनतवारीने वळविता आले.

महाराजांनी काही मंडळींना स्वतंत्र घरे बांधण्यासाठी द्रव्य पुरविण्याचेही कबूल केले. हा बेत झाला, तेव्हा त्यांच्या दत्तकगृहीच्या मातोश्री व काक्या-माम्या या तर दुःखाने रडू लागल्या. अपरिचित प्रदेश, अगदी भिन्न प्रकारचे अन्नपाणी, भिन्न रीतिरिवाज यांची एकूणच साऱ्यांना धास्ती वाटत होती. त्यामुळेच आपल्या जवळच्या गोतावळ्याला, अल्पकाळ का होईना, पण सोडून जाताना महाराजांनाही दुःख झाले. पुढे बोटीवरच्या प्रवासी जीवनातही अडचणी उद्‌भवल्या. स्त्रियांसाठी गोशाची व्यवस्था करणे, ही एक डोकेदुखीच ठरली. युरोपातील आणि विशेषतः इंग्लंडखेरीज इतर देशांतील उपाहारगृहांच्या व्यवस्थापकांनी कसल्याही शर्तीवर जागा देण्यास नकार दिला. घरमालकांनी राजपरिवाराची विविध प्रकारे लुबाडणूक केली. भारतीय पद्धतीच्या स्वयंपाकामुळे व त्यातही भोवती दरवळणाऱ्या कांदालसणीच्या वासामुळे घरमालक विशेष रुष्ट होत. युरोपातील दूधसुद्धा विटाळ झालेले, भ्रष्ट; तेव्हा बोटीवरून चार म्हैशीही बरोबर नेण्यात आलेल्या होत्या; परंतु त्या बिचाऱ्या एडनचा पल्ला गाठण्यापूर्वीच मध्येच गतप्राण होऊन गेल्या!

महाराजांची स्वारी इटाली, फ्रान्स, स्वित्झर्लंड असा दौरा करीत करीत अखेर इंग्लंडला पोहोचली. 2 डिसेंबर 1887 रोजी सयाजीरावांना महाराणी व्हिक्टोरिया यांची प्रत्यक्ष भेट घेण्याची संधी मिळाली व त्या प्रसंगी 'जी. सी. एस्. आय.' ('ग्रँड कमांडर ऑफ दि ऑर्डर ऑफ दि स्टार ऑफ इंडिया') अशी किताबत देऊन महाराजांचा गौरवही झाला. ही पहिली सफर आठ महिने आणि तेवीस दिवसांची झाली. 21 फेब्रुवारी 1888 रोजी महाराज हिंदुस्थानात परतले. या सफरीवर 7,57,949 रुपये खर्च झाला.

त्यानंतरचे महाराजांचे परदेश दौरे एकामागून एक असे पटापट झाले. 1888, 1891 व 1892 या सालांत महाराज पुन्हा युरोपला गेले. 1893 सालच्या म्हणजे पाचव्या दौऱ्याच्या वेळी महाराजांना एकीकडे स्वतःच्या प्रकृतीची काळजी लागून राहिली होती आणि दुसरीकडे वारंवार प्रदीर्घ काळपर्यंत त्यांच्या संस्थानातील स्वतःच्या गैरहजेरीमुळे हिंदुस्थान सरकार अस्वस्थ झाले होते. एक प्रकारे कटुता धुमसू लागली होती. पण सरकारी गोटात गुप्तपणे काय शिजत आहे, याची काहीच कल्पना नसल्यामुळे सयाजीरावांनी लॉर्ड लॅन्सडाऊन यांना सदर सफरीमुळे कसकसा फायदा झाला आणि एकंदरीत कशी मौज वाटली, ते मोठ्या उत्साहाने कळवून टाकले. या पत्रामध्ये 'युरोपातील ग्रामीण भागातील सृष्टिसौंदर्य, शहराशहरांतील चित्रे आणि अन्य कलाकृती, रंगमंच, उपाहारगृहे (कॅफे) आणि चित्त विचलित करणारी एकूण युरोपीय आकर्षणे यांनी आपल्या मनावर मोठी मोहिनी पाडल्याचे' नमूद केलेले होते. आणि नेमक्या अशा प्रकारच्या युरोप खंडातील आकर्षणांपासून हिंदी संस्थानिकांचे रक्षण व्हावे, अशी सरकारची इच्छा होती. त्यांच्या परदेशी सफरींवर जे अनेकानेक निर्बंध घालण्यात आले, त्यांमागे हीच चिंता होती. पण हिंदी संस्थानिक आणि ब्रिटिश सरकार यांच्यामध्ये या निर्बंधांमुळे

ताणतणाव निर्माण झाले. लॉर्ड लॅन्सडाऊन यांच्या उत्तरामध्ये अशा परदेश सफरींबद्दलची धास्तीच अचूकपणे व्यक्त झालेली दिसून येते.

सयाजीरावांची दैनिंदिनी व पत्रे यांमधून त्यांची निरीक्षणशक्ती, दुर्दम्य जिज्ञासा आणि सर्व प्रकारच्या स्थळांना भेटी द्यायची हौस या गोष्टी स्पष्ट दिसून येतात. त्यांच्या प्रारंभीच्या परदेशसफरी प्रामुख्याने प्रकृतीच्या स्वास्थ्यासाठी व विश्रांतीसाठी झाल्या असल्या, तरी त्या सफरींचा बडोदे संस्थानच्या सामाजिक व आर्थिक जीवनावर अमाप परिणाम झाला. तिसऱ्या सफरीवर असताना त्यांना आपल्या राज्यात सक्तीचे प्राथमिक शिक्षण सुरू करण्याची कल्पना सुचली, असे सांगतात. सहाव्या सफरीत 'आपल्याकडील स्त्रियांसाठी विशेषतः विधवांसाठी लाभप्रद ठरतील असे घरगुती उद्योगधंदे कोणते', याची लंडनमधील मुक्कामात त्यांनी चौकशी केली होती. योग्य ती काळजी राखून, स्त्रियांना सजावटीच्या कलांचे शिक्षण दिल्यास ते अतिशय फायदेशीर ठरेल, अशी त्यांची खात्री पटली होती. ह्या विचारातूनच पुढे चिमणाबाई-स्त्री-उद्योगालय स्थापन झाले. त्यांच्या अमेरिकेच्या सफरीनंतरच मध्यवर्ती ग्रंथालय स्थापनेची कल्पना साकार कशी झाली, याचा उल्लेख मागे आलाच आहे. जिनीव्हा येथील म्यूझियम आणि चित्रसज्जा पाहूनच त्यांना बडोद्यातील म्यूझियमची व चित्रसज्जाची प्रेरणा मिळाली होती. झूरिचमध्ये त्यांनी 'स्कूल ऑफ आर्ट' पाहिले आणि मग बडोद्यात कलाभवन स्थापन केले. युरोपीय शहरांची स्वच्छता, व्यवस्थित रचना, तेथील समाजसेवेची आवड आणि 'उद्यमशील विश्रांती'ची संकल्पना या गोष्टींची नंतरच्या दौऱ्यांमधून त्यांच्या मनावर विशेष छाप पडली, आणि त्यांतील जमेल तेवढा ग्राह्यांश आपल्या राज्यामध्ये बाणविण्याचा त्यांनी प्रयत्न केला. बडोद्यातील रक्षकांचा गणवेष, सेवेकऱ्यांचे पांढरेधोप स्वच्छ कपडे, मर्यादशील वर्तन आणि राजवाड्यावरील पहारेकऱ्यांचा काटेकोर नेटकेपणा' यांतही पश्चिमेचा प्रभावच जाणवत असे. युरोपीय पद्धतीच्या क्लब-जीवनाला त्यांचे प्रोत्साहन होते व सयाजीविहार क्लबामागे त्यांचीच प्रेरणा होती. महाराजांचा व्यापक दृष्टिकोण त्यांच्या प्रशासनात आणि नेमलेल्या अधिकाऱ्यांतही दिसून येत असे. अनेक अधिकाऱ्यांना प्रशिक्षणार्थ किंवा अन्य विशिष्ट कामगिरीच्या निमित्ताने त्यांनी युरोप किंवा अमेरिका या देशात धाडले होते. यामुळे कोणी परदेशी मंडळी इकडे आली की तिला, बडोदे वा नवसारी जेवढी सुपरिचित तेवढेच लंडन वा बर्लिन सुपरिचित असणारी एखाददुसरी व्यक्ती बडोद्यात सहज आढळल्यास त्यात अपूर्वाईचे असे काहीच नव्हते.

युरोपमधून परत आल्यावर चिमणाबाईंना 12 मे 1888 रोजी पुत्ररत्न झाले. त्याचे नाव जयसिंगराव ठेवण्यात आले. त्यानंतर पुढच्याच पाच वर्षांत त्यांना आणखी तीन अपत्ये झाली. शिवाजीराव म्हणून पुत्ररत्न 31 जुलै 1890 रोजी झाले, महाराजांच्या एकुलत्या एक कन्यका इंदिरा राजे यांचा जन्म 1 मार्च 1892 रोजी झाला आणि सर्वांत

धाकटे पुत्र धैर्यशीलराव 31 ऑगस्ट 1893 रोजी जन्मले. या अपत्यांच्या जन्म सोहळ्याने अर्थातच महाराजांना आनंद झाला. पण त्यानंतरच्याच पाच वर्षांत त्यांच्या दत्तक-घराण्यातील मातोश्री व भगिनी यांची दुःखद निधने घडून आली. ताराबाई 14 जून 1897 रोजी व त्यांच्यामागून लवकरच मातोश्री जमनाबाई 29 नोव्हेंबर 1898 रोजी मरण पावल्या. महाराजांवर जमनाबाईचे विशेषच ऋण होते. त्यांच्याविषयी महाराजांना मनोमन प्रेमादरही होता. त्यांच्या चारित्र्यशील व्यक्तित्वाचे ते विशेष चाहते होते. महाराजांचे बालपणीचे घरगुती जीवन ज्या दोन आप्त स्त्रियांशी निगडित होते, त्या दोघींनाही काळाने त्यांच्यापासून ओढून नेले होते.

या घरगुती शोकांतिका तर होत्याच; पण महाराज प्रदीर्घकाळपर्यंत वारंवार संस्थानात अनुपस्थित असल्याने कारभारात रेसिडेंटचे प्रस्थ विशेष वाढलेले होते व त्यामुळे महाराज तेव्हा काहीसे क्षुब्धही झालेले होते. सार्वभौम सत्तेकडून त्यांना असा 'सल्ला' (म्हणजे 'आदेश'च) दिला गेला होता की, त्यांच्या गैरहजेरीत राज्याचे जे सामान्य सल्लागार मंडळ (जनरल कौन्सिल) कारभार पाहत असे, त्या मंडळाकडे त्यांनी आपले काही अधिकार सुपूर्द करावेत. या सल्लागार मंडळाच्या बैठकीतही रेसिडेंटचा शब्द निर्णायक ठरू लागला; अर्थात ही बाब सयाजीरावांनी नेमलेल्या दिवाणांच्या वृत्तीवर बरीच अवलंबून असे. महाराजांना ही गोष्ट मुळीच पसंत नव्हती; पण त्याबाबत त्यांचा काही इलाजही चालण्याजोगा नव्हता. 1888 साली एलियटला राजकीय अधिकारी या नात्याने युरोपला आपल्याबरोबर दुसऱ्यांदा नेण्याची महाराजांची इच्छा होती (पहिल्यांदा त्यांना 1887 नेलेले होतेच); पण या गोष्टीला परवानगी मिळाली नाही. हस्तक्षेपाचा हा सरकारी चिमटा महाराजांना विशेष जाणवला. 1892 साली रेसिडेंट कर्नल रेनॉल्डस् याने, महाराज स्वतःबरोबर ज्या लोकांना नेणार होते, त्यांची माहिती मागितली आणि त्यांनी आपल्या परिवारात हिंदुस्थान सरकारच्या अधिकाऱ्याचा समावेश करण्याचाही त्यांना सल्ला दिला. 1893 मध्ये हिंदुस्थान सरकारने प्रत्यक्ष असेही सुचविले की, महाराजांच्या अनुपस्थितीत त्यांचे सर्व वैयक्तिक अधिकार सामान्य सल्लागार मंडळाकडे सुपूर्द केले जावेत. रेसिडेंटची चौकशी महाराजांना अनावश्यक वाटली; पण हिंदुस्थान सरकारच्या सूचनेचे स्वरूप तर विशेषच गंभीर होते. ती सूचना म्हणजे युरोपात सफरीवर असताना सयाजीरावांनी बडोद्याचे महाराज असता कामा नये, हे मान्य करणे असा त्याचा अर्थ होत होता. आपल्या परिवारात एका राजकीय अधिकाऱ्याचा समावेश करण्याची रेसिडेंटची सूचना महाराजांना अमलात आणावी लागली व त्या अधिकाऱ्याचा खर्चही त्यांनाच करावा लागला. पण अशा अधिकाऱ्याच्या उपस्थितीच्या उपयुक्ततेबद्दल मात्र महाराजांच्या मनात शंकाकुशंकाच होत्या. त्या अधिकाऱ्याचा काही उपयोग होण्यापेक्षा उपद्रवच अधिक होणार होता. प्रत्यक्ष महाराजांपेक्षा आपण कोणीतरी वरिष्ठ आहोत, असा जो आव हे अधिकारी आणीत असत, त्याने महाराजांचे पित्त खवळत असे. पण एक अपरिहार्य

आपत्ती म्हणून त्यांनी या गोष्टीला रुकार दिला होता.

हिंदुस्थान सरकारच्या सूचनेचे होष्यमाण चांगलेच अवलक्षणी होते. महाराज त्याबद्दल खूपच नाराज होते. 'माझ्या विनंतीवरून प्रशासनात प्रत्यक्ष भाग घेण्यास यांना मान्यता दिलेली आहे' असे म्हणून स्वतःच्या अधिकाराचा वरकरणी देखावा त्यांना वरील संदर्भात करावा लागत असे. वस्तुस्थिती, अर्थातच, उलट होती. बऱ्याचशा कालावधीनंतर या राज्यव्यवस्थेचा परिणाम म्हणून महाराजांच्या अधिकाराला गौणत्व येत गेले, आणि त्यांच्या प्रतिष्ठेलाही हानी पोचली. सयाजीरावांनी परदेशपर्यटनाची आपली हौस योग्य मर्यादेपलीकडे जाऊ दिली नसती, तर ही परिस्थिती टाळता आली असती. पण त्यांच्या व्यक्तिमत्त्वातील 'भटक्या'ने ('जिप्सीने') त्यांना तसे करू दिले नाही. कदाचित अजाणता असेल; पण त्यांच्या आक्षेपकांनी अपेक्षिलेलाच खेळ ते खेळले आणि त्याची जबर किंमत त्यांना मोजावी लागली. काहीतरी अरिष्ट त्वरित कोसळण्याची अवलक्षणे दिसू लागली होती. त्यांच्या तत्कालीन पत्रावरून त्यांना स्वतःलाही याची जाणीव झाली असल्याचे दिसून येते. आपल्याला त्रास देण्यास उत्सुक असणारी मंडळी रेसिडेन्सीत आहेत, हे त्यांना माहीतच होते. पूर्वी एकदा बडोद्याचे रेसिडेंट असणाऱ्या सर जॉन वॉटसन यांनी महाराजांना लिहिले होते, "देशी संस्थानिकांनी लक्ष देण्याच्या दृष्टीने एकूणच गोंधळात टाकणाऱ्या प्रश्नांची जटिलता वर्षावर्षाला वाढत चालली आहे. अडचणी आणि बंधने यांच्या कात्रीत सापडल्याने संस्थानिकाला स्वाभिमान आणि पूर्वजांकडून प्राप्त झालेली प्रतिष्ठा यांना मुकावे लागत आहे," याच पत्रात त्यांनी पुढे अशी इच्छा प्रकट केली होती की, सार्वभौम सरकारने 'रेसिडेन्सीकडून काळजीपूर्वक संपादित होऊन सादर करण्यात येणाऱ्या वृत्तांतावर'च केवळ अवलंबून राहू नये; कारण देशी संस्थानांच्या कारभारातील वरवरच्या दोषांचा फायदा घेण्यासाठी रेसिडेन्सी नेहमीच टपलेली असते.'

सन 1893 च्या पाचव्या सफरीच्या वेळी त्यांना आपले सर्वाधिकार सर्वसामान्य सल्लागार मंडळाकडे सुपूर्द करावे लागले होते. भडक माथ्याचे रेसिडेंट कर्नल बिडुल्फ यांच्यापुढे मणीभाई जसाभाई हे दिवाणसाहेबसुद्धा निष्प्रभ ठरले. या कर्नल बिडुल्फला एलियट बिलकुल आवडत नसे. याच वर्षी देशी वृत्तपत्रांतून संस्थानी कारभाराविरुद्ध प्रक्षोभक टीका येऊ लागली होती. दिवाणसाहेब हे फार चांगले आहेत; पण भोवतालची मंडळी वाईट असल्याने महाराज न्यायाला खो देतात, असा त्या टीकेचा रोख होता. एलियटच्या शत्रूंनी काहीतरी कुरापत काढून ही आरडाओरड सुरू केलेली होती, असे सांगतात. हा सारा बनाव 'बापट केस' म्हणून गाजला. वासुदेव सदाशिव बापट या नावाचे एक गृहस्थ एलियटच्या जमाबंदी आणि सर्वेक्षण खात्यात नोकरीला होते व त्यांना अगदी एलियटचा उजवा हात, असे समजण्यात येई. 1894 साली सदर बापट हे लाचखाऊ असल्याच्या तक्रारी आपल्याकडे आल्या असल्याचे रेसिडेंटने दिवाणांना कळविले 'अहमदाबाद टाइम्स' सारख्या पत्रात हा आरोप जाहीरपणे केला गेला. त्यामुळे

बडोद्याच्या नावाला बट्टा लागू नये या हेतूने महाराजांनी सल्लागार मंडळाला कारवाई करण्याचा आदेश द्यावा, अशी अपेक्षा लोकांत निर्माण झाली. रेसिडेंटच्या पत्रामुळे सल्लागार मंडळात, अर्थातच, खळबळ उडाली. रेसिडेंट, मंडळ आणि महाराज यांमध्ये परस्परात खूपच पत्रव्यवहार झाला. चौकशीत प्रशासनाच्या वतीने सुप्रसिद्ध वकील भाईशंकर नानाभाई यांनी, बापट यांच्या वतीने लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांनी अटीतटीने बाजू घेतल्याने नेमल्या गेलेल्या आयोगाच्या चौकशीला खूपच प्रसिद्धी मिळून तिच्याकडे लोकांचे विशेष लक्ष वेधले, या सर्व प्रकरणात रेसिडेंटच्या अनुज्ञेनुसार मंडळाने जे वर्तन ठेवले, त्यामुळे महाराजांना वाईट वाटले. हे प्रकरण घडण्यापूर्वी काझी शहाबुद्दीन यांना महाराजांनी लिहिले होते की, पूर्वीच्या कोणत्याही रेसिडेंटपेक्षा या रेसिडेंटला अधिकारीवर्ग कधी नव्हे असा घाबरू लागला आहे. बापटप्रकरणी काही प्रमाणात न्यायाच्या दृष्टीने च्युती घडून आलेली होती. बापटांना, त्यांनी मागितलेली काही कागदपत्रे पुरविण्यात आली नव्हती; तसेच आपल्या पसंतीचा वकील देण्यासही त्यांना परवानगी नव्हती. सयाजीराव परत आल्यानंतर या प्रकरणाची कसून छाननी करण्यात आली व चौकशी आयोगाचा अहवाल विरोधी असूनही बापटांची निर्दोष म्हणून मुक्तता करण्यात आली. संस्थानी प्रशासन नियमानुसार बापटांना नोकरीतून काढून टाकण्यात आले व त्यांची सेवा ध्यानात घेऊन त्यांना अल्प निवृत्तिवेतन चालू करण्यात आले. निर्णयात फिरवाफिरव झाल्यामुळे रेसिडेन्सी त्रस्त झालेली असणारच. परंतु आपल्या सार्वभौम प्रतिष्ठेचा बळी देऊन दिवाणांनी ज्या प्रकारे हे प्रकरण हाताळले, त्यामुळे महाराजही नाराज झाले व त्यांनी दिवाणांना त्यागपत्र देण्याची सूचना केली. हिंदुस्थान सरकारने 1896 साली एलियटची बदली केली. अशा प्रकारे या प्रकरणातील तिन्ही प्रमुख व्यक्तींची बडोद्याबाहेर उचलबांगडी करण्यात आली. पण तोपर्यंत व्हावयाची ती हानी झालीच. सदर प्रकरणामुळे राज्ययंत्रणेत बिघाड निर्माण होऊन मध्यवर्ती सत्ता खिळखिळी झाली. स्टॅन्ले राइस यांच्यामते हे सर्व प्रकरण म्हणजे 'राज्यातील मराठी व गुजराती पक्षांच्या बलाबलाची जणू चाचणी होती.' या मतात अगदीच तथ्यांश नाही, असे नाही. संस्थानात अशी संकुचित जातीयता केव्हाही प्रादुर्भूत झालेली नव्हती, असे मुळीच नाही. कारण 1939 च्या जानेवारीत या दोन्ही समाजांत दंगल माजून ही जातीय वृत्ती उफाळून आली होती. बिडुल्फ आणि एलियट या दोघा इंग्रजांमध्ये वितुष्ट असल्याने, तसेच एलियटमुळे रेसिडेंट आणि महाराज यांचेही संबंध बरे नसल्याने बापटप्रकरण उद्‌भवले, असण्याची शक्यता आहे.

बापटप्रकरणामुळे सयाजीरावांना कमालीचे एकाकी वाटू लागले. प्रशासनात भाग घेण्यासही ते कचरू लागले व त्यांना राज्यकारभाराचाच उबग आल्यागत झाले. त्यांनी स्वतःच म्हटल्याप्रमाणे त्यांचा आत्मविश्वासच गेला आणि ते किंकर्तव्यमूढ झाले. केव्हाही येऊन काठीने बडवावा अशा एखाद्या ढोलासारखी आपली अवस्था रेसिडेन्सीने करून

टाकली असून आपले सद्धेतूही उधळून लावण्यात येत आहेत, असे त्यांना वाटू लागले. गोंधळात आणखी भर नको म्हणून सन 1900 पर्यंत ते युरोपला गेलेच नाहीत. चिमाणाबाईवर एक मोठी शस्त्रक्रिया करण्याचा वैद्यकीय सल्ला मिळाल्याने त्या वर्षी त्यांना घेऊन महाराज युरोपला गेले. पण दुर्दैवाने या प्रवासातच त्यांना आणखी एक हादरा बसावयाचा होता. नाचक्की होऊन नव्या संघर्षाला तोंड लागावयाचे होते. आदल्या वर्षी म्हणजे 1899 मध्ये नवे व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन यांची महाराजांनी भेट घेतली होती व त्यांना ते 'अतिशय हुशार आणि व्यवहारदक्ष गृहस्थ' वाटले होते. पण नवीन शतकाचे पहिले पान उलटतानाच व्हाइसरॉय यांच्या स्वभावाचे आणखी पैलू उघड झाले व सयाजीवारांना काही ते पटण्याजोगे नव्हते.

सयाजीराव चिमणाबाईसह 1900 सालाच्या मेमध्ये युरोपला बोटीने रवाना झाले आणि तीनच महिन्यांनी 'कर्झन-सर्क्युलर' म्हणून ओळखले जाणारे परिपत्रक 1900 च्या ऑगस्टमध्ये प्रसिद्ध झाले. हिंदी संस्थानिकांनी परदेशी जाण्यापूर्वी सरकारची परवानगी घेतली पाहिजे, हा निर्बंध या पत्रकाद्वारे जारी करण्यात आला. आपल्या ग्वाल्हेरला झालेल्या एका भाषणात व्हाइसरॉय यांनी ह्या विषयाचे सूतोवाच केले होते. पण त्या वेळी त्याकडे कोणाचे फारसे लक्ष गेले नव्हते. सदर भाषणात व्हाइसरॉय यांनी म्हटले होते, की संस्थानिकांनी 'आपल्या हाती असलेल्या सत्तेचा आपण रास्तपणे उपयोग करतो, हे दाखवून दिले पाहिजे; त्यांनी या सत्तेचा गैरवापर करता कामा नये.' तसेच त्यांनी 'त्यांनी उपस्थिती केवळ पोलोच्या मैदानावर, रेस कोर्सवर किंवा युरोपीय उपाहारगृहांतूनच दिसून चालणार नाही.' त्यांचे खरेखुरे कर्तव्य त्यांनी आपल्या प्रजाजनांमध्ये राहण्यात असते, हेही निदर्शनास आणले.

सदर परिपत्रक खास सयाजीरावांविरुद्ध वा अमुक एका विशिष्ट व्यक्तीविरुद्ध नव्हते. पण त्या वेळी सयाजीरावांची सहावी सफर चालू होती. पत्रक प्रसिद्ध झाले, तेव्हा ते खुद्द लंडनलाच होते. त्यामुळे पत्रकाची प्रस्तुतता व एकूण रोख आपल्यावरच आहे, असे त्यांना विशेष जाणवले असावे, असे वाटते. पुढे इंग्रजी साम्राज्यातील वृत्तपत्रांमधून सयाजीरावांच्या नावाचे उघड उघड उल्लेखही याबाबत आले. लंडनच्या 'टाइम्स' या वृत्तपत्रात व्हाइसरॉयसाहेबांच्या या परिपत्रकाचा गोषवारा प्रसिद्ध करण्यात आला होता. सदर गोषवारा त्या वृत्तपत्राच्या सिमला येथील वार्ताहराकडून आलेला होता. वार्ताहराने परिपत्रकावर मल्लीनाथी केली होती, "दिवाणांच्या हाती कारभार सोपवून वारंवार युरोपच्या वाऱ्या करणारे बडोद्याचे गायकवाड आणि कपुरथळ्याचे महाराज यांच्यासारख्या संस्थानिकांवर याचा यथायोग्य परिणाम होईल!" दोनच दिवसांना या संदर्भात लिहिलेल्या अग्रलेखात 'टाइम्स'ने सदर मल्लीनाथीचा पाठपुरावाच केला होता.

महाराजांना तेवढ्यात आणखी एक धक्का बसला. ऑगस्टच्या प्रारंभी बडोदे राज्यातून पुढे जात असताना लॉर्ड कर्झन यांनी बडोदे संस्थानचा आदरसत्कार स्वीकारला

नाही. उलट, येत्या नोव्हेंबरमध्ये खुद्द महाराजांनी आपले स्वागत करावे असे त्यांनी सुचविले. परंतु प्रकृति-अस्वास्थ्यास्तव त्यांच्या सूचनेप्रमाणे राजदंपतीला नोव्हेंबरमध्ये परत येणे शक्य झाले नाही. यामुळे व्हाइसरॉय व नोकरशाही यांनी आपल्याविरुद्ध चालविलेल्या तक्रारींची धार तीव्र करण्यास स्वतः सयाजीरावांनीच चांगले कारण पुरविले.

लॉर्ड कर्झन यांच्या पत्राची छाननी केल्यास त्यातून पुढील चार मुद्दे निघतात :–

1. हिंदुस्थानाबाहेर वारंवार सफरीवर जाणे ही कर्तव्यच्युती मानण्यात येईल.
2. परदेशी जाण्यासाठी खाजगी सोय हे निमित्तकारण निकष म्हणून चालणार नाही; वैयक्तिक व सार्वजनिक कल्याण हा निकष राहील.
3. परदेशी सफरींसाठी वारंवार मंजुरी मागणे टाळले पाहिजे. अशा दोन सफरींमध्ये बराच कलावधी असणे अगत्याचे आहे.
4. परदेशी सफरीने चारित्र्य आणि सवयी यांवर होणाऱ्या परिणामांचा विचार साक्षेपाने केला जाईल.

या पत्रातील किंवा सुपरिचित शब्द योजायचा, तर परिपत्रकातील निर्बंध महाराजांना रुचणारे नव्हते. पण न्याय्य दृष्टीने पाहिल्यास परिपत्रक समर्थनीयच ठरते. सार्वभौम सत्ताच संस्थानिकांना अंतर्गत आणि बाह्य धोक्यांपासून संरक्षण देत आली होती. संस्थानिकांना आपापल्या मर्जीप्रमाणे जीवन व्यतीत करण्यासाठी पुरेसा पैसा उपलब्ध होईल, याची हमीही दिली गेलेली होती. कधी कधी तर ही हमी प्रशासनातील हयगयीकडे काणाडोळा करूनही देण्यात येत असे. असे असूनही दोघा-तिघा संस्थानिकांचा अपवाद वगळल्यास हिंदी संस्थानिकांची आपल्या राजकर्तव्याच्या बाबतीत खूपच खाली घसरण झालेली होती. सुदैवाची गोष्ट अशी की बडोद्याचे प्रशासन या वर्गात मोडणारे नव्हते; तरीपण महाराज 'गैरहजर राजा' याच वर्गात पडणारे होते, ही वस्तुस्थिती बदलत नाही.

या परिपत्रकाने देशी संस्थानिकांचे स्थान व प्रतिष्ठा यांना पुष्कळच गौणत्व येत होते, असे महाराजांचे मत होते. त्यांनी आपल्या एका स्नेह्याला लिहिले होते, "आम्हांला संस्थानांचे अधिपती समजण्यात येते खरे; पण पगारी नोकरापेक्षाही कमी दर्जाची वागणूक दिली जाते." या उदासीन व अनुत्साहित करणाऱ्या काळात, महाराजांनी आपल्या दोघा मित्रांना व हितचिंतकांना पत्रे लिहून आपल्या भावना उघड केल्या होत्या; उलट या मित्रांनीही आपापली मते स्पष्ट केली होती. दादाभाई नौरोजी यांनी सल्ला दिला की, बडोद्यासारख्या संस्थानात हस्तक्षेप अपरिहार्य असल्याने संघर्ष करीत बसण्याऐवजी हस्तक्षेपाला वाव देणारी कारणे दूर करणे अधिक श्रेयस्कर. बेहेरामजी मलबारी यांनी आपले मत अधिक परखडपणे स्पष्ट केले होते : सतत संघर्ष करीत राहून किंवा शत्रूच्या डावाला बळी पडून स्वतःला दुःखी बनविण्यात काय हाशील आहे, अशा सवालच त्यांनी केला. सयाजीरावांच्या युक्तिवादातील वाजवी व अवाजवी भाग दाखवून

देताना मलबारींनी लिहिले होते, "ही अलीकडची इंग्लंडची सफर चुकीची होती. व्हाइसरॉयला निमंत्रण देऊन परत न येता तिकडेच राहणे, तर मोठीच चूक होती– आपल्या परिवारात वैरी असतीलही; पण महाराज हे स्वतःच 'आपुले आपण' मोठे वैरी आहेत."

महाराज आपल्या प्रकृतीविषयी वर्षानुवर्षे तक्रार करीत असत. त्यांची ती तक्रार प्रामाणिक व खरीही होती, पण बडोद्याला परत आल्यावर मग कारभार पाहण्याइतपत त्यांची प्रकृती उत्तम असल्याचे ज्यांनी पाहिले होते, त्यांना या अशा ढासळत्या प्रकृतीची तक्रार खरी न वाटणे साहजिक होते, असेही त्या काळी बोलले जाई. महाराजांचा हिंदुस्थानातील आणि बडोद्यातील वर्षानुवर्षांचा रहिवास लोकांनी पाहिलेला होता, त्यामुळे त्यांच्या प्रकृतीवर युरोप हाच काय तो रामबाण उपाय आहे काय, अशीही साहजिकच विचारणा होत असे. हिंदुस्थानातील हवामान असह्यच व्हावे, एवढी त्यांची प्रकृती ढासळलेली नव्हती, हेही लोकांनी पाहिलेले होते.

परिपत्रकाला विरोध करून काही निष्पन्न होण्यासारखे नाही, याची जाणीव असल्याने, त्याबाबत मौन पाळणेच दिवाणांनी शहाणपणाचे मानले. पण सयाजीरावांच्या सूचनेवरूनच संस्थानाने परिपत्रकाविरुद्ध आपला विरोध नोंदवला. परंतु हिंदुस्थान सरकारने त्यात रेसभर बदल करण्यास नकार दिल्याने अखेर दिवाणांची भूमिकाच रास्त होती हे सिद्ध झाले. या संदर्भात अन्य काही उपाययोजनांपेक्षा काळ हाच रोगमुक्तीचा उपाय ठरला. 1909 साली लॉर्ड कर्झननंतर आलेले व्हाइसरॉय लॉर्ड मिंटो यांनी, राजकीय सुधारणांची मागणी होऊ लागल्यामुळे संस्थानिक तरी आपल्या बाजूला असावेत, यासाठी परिपत्रकात अपेक्षित असा बदल केला व पुढे 1920 मध्ये ते परिपत्रकच अजिबात मागे घेण्यात आले.

कर्झन आणि सयाजीराव यांच्यासारख्या जबरदस्त मनोबळाच्या दोन व्यक्तींत खटका उडणे अनपेक्षित नव्हते आणि तो बेबनाव परिपत्रकापुरता मर्यादितही राहिला नाही. लॉर्ड किचनेरसारख्या भडक माथ्याच्या गृहस्थाशीही कर्झनचे खटके उडालेले होते. 1903 साली कर्झनची सयाजीरावांशी पुन्हा एक झटापट झाली. 1 जानेवारी 1903 रोजी राजे एडवर्ड यांच्या राज्यारोहण समारंभाच्या निमित्ताने दिल्लीला एक दरबार भरविला जाणार होता. त्या वेळी निघावयाच्या हत्तींच्या मिरवणुकीत संस्थानिकांनी सामील व्हावे, अशी व्हाइसरॉय यांची सूचना होती. या सूचनेवर सरकारने सयाजीरावांचे मत विचारले होते व म्हणून त्यांनी ते दिले होते. पण रेसिडेंटला सदर मत रुचले नाही. आपले समाधान झाले नसल्याचे त्याने महाराजांना सांगितले; सयाजीरावांनी त्याला हरकत घेतली. हत्तींची मिरवणूक, शेंदरी रंगाचा सरंजाम तसेच समारंभाची केंद्रवर्ती उत्सवमूर्ती व्हाइसरॉय राहणार, हे मतभेदाचे प्रमुख मुद्दे होते. अशा गोष्टीमुळे हिंदुस्थान सरकारची किंवा अँग्लो-इंडियन समाजाची आपल्यावर कृपादृष्टी होते, असल्या

युक्तिवादाची आपल्यावर सक्ती होणे, हेही महाराजांना आवडले नाही. एखादी गोष्ट आपण ठरविलेल्या विशिष्ट पद्धतीने करावयास भाग पाडण्याचा हा सरकारचा नेहमीचाच खाक्या असतो, याची जाणीव महाराजांना होती. 'व्हाइसरॉयसाहेबांच्या योजनेशी सहमत न होणे म्हणजे बादशहांविषयी अनादर दाखविणे होय, असा विपरीत अर्थ करण्याच्या हास्यास्पद पद्धतीनेही' महाराज संत्रस्त झालेले होते. म्हणून त्यांनी सक्तीच होणार असेल, तर आपण मिरवणुकीत भाग घेऊही, असे स्पष्टपणे कळविले. पण "अपमानाच्या धमकीने जे आपल्यावर लादण्यात येत आहे, ते आपण स्वखुशीने, उत्स्फूर्तपणे आणि जणू काही स्वतःहून करीत आहो, असे भासविणे आपणास जड जाते."

प्रत्यक्ष बादशहांपेक्षा लॉर्ड कर्झन यांच्याच गौरवार्थ हा दरबार भरवला जात आहे, असे अनेकांचे मत होते. आणि केवळ औपचारिक स्वामीनिष्ठेच्या प्रकटनापेक्षा यात काहीतरी अधिक मतलब आहे, असे सयाजीरावांना वाटले. म्हणून त्यांनी "राज्यारोहणाच्या निमित्ताने आपले हार्दिक व निष्ठापूर्वक अभिनंदन आणि नववर्षाच्या शुभेच्छा बादशहांकडे प्रविष्ट कराव्यात," अशी विनंती व्हाइसरॉयला केली. व्हाइसरॉयऐवजी ज्या सार्वभौम सम्राटांच्या सन्मानार्थ हा दरबार भरविला होता, त्यांच्यावर लक्ष केंद्रित करण्याची ही महाराजांची बहुधा सूचक कृती असावी.

पुढल्याच वर्षी 'इंपीरियल सर्व्हिस ट्रूप' च्या प्रश्नावर व्हाइसरॉयबरोबर सयाजीरावांची चकमक झडली. या प्रकरणी जे बदल करण्याचे योजिलेले होते, त्याबाबत व्हाइसरॉयने 1904 च्या एप्रिलमध्ये एक पत्र लिहिले होते. त्यावर सयाजीरावांनी जे एक मुद्देसूद निवेदन सादर केले होते, त्यात म्हटले होते; "चार वर्षांपूर्वी म्हणजे सन 1889 मध्ये रशियाच्या धास्तीमुळे संस्थानिकांनी उत्स्फूर्तपणे आणि व्यक्तिगत नात्याने केलेल्या प्रस्तावात 'इंपीरियल सर्व्हिस' चे मूळ आहे." आणि आता "केवळ हिंदी प्रदेशाचेच नव्हे, तर साम्राज्याच्या सर्वच परदेशी हितसंबंधाचे संरक्षण करण्यासाठीसुद्धा ब्रिटिश सरकारला द्रव्य आणि सैन्य पुरविण्याची जबाबदारी हिंदी संस्थानिकांनी मान्य करावी, असे सांगण्यात येत आहे." पण साम्राज्य सरकारने आपल्या साम्राज्यांतर्गत संस्थानिकांना त्या जबाबदारीस अनुरूप असे हक्क आणि मान्यताप्राप्त मताधिकार दिले नाहीत, तर सरकारची ही सूचना रास्त ठरणार नाही, असेही या निवेदनात पुढे नमूद केले होते. सयाजीराव हे जाहीरपणे स्वामीनिष्ठा व्यक्त करीत असले, तरी त्यांच्या मनात काहीतरी किंतू आहे, असे ब्रिटिश नोकरशाहीला वाटले होते व म्हणून यांचा पाणउतारा करण्याची संधी घेण्यासाठी नोकरशाही टपून बसली होती. लवकरच 1911 साली तशी संधी तिला मिळालीही.

दरम्यान महाराजांना खूपच मानसिक त्रास सोसावा लागला. आपल्या संकल्पित युरोप-सफरीचा कार्यक्रम आगाऊ सादर करण्याच्या मागणीमुळे ते नाराज होते. पत्नी आणि कुटुंबातील अन्य स्त्रियाही बरोबर जाणार असल्याने प्रस्तुत मागणीचा त्यांना

अधिकच विषाद वाटला. स्त्रियांबाबत अशी विचारणा करणे त्यांच्या भारतीय मनाला पटण्यासारखे नव्हते. आपल्या वरचेवर होणाऱ्या परदेशी सफरींवर अत्यंत हीन अशा हेतूंचा आरोप अज्ञानी आणि बेजबाबदार माणसे आणि वृत्तपत्रकार करीत असतात, याविषयीची, सर रिचर्ड मीड यांचे चिरंजीव आणि महाराजांचे स्नेही रेसिडेंट कर्नल एम. जे. मीड यांच्याशी एकदा त्यांनी वाच्यता केलेली होती. त्यांचे म्हणणे असे होते की, "अशा आपल्या सफरीवर होणाऱ्या खर्चापेक्षा, बाहेर न जाता संस्थानातच राहणारे राजे अधिक उधळपट्टी करीत असतात, हे रेसिडेंटला सिद्ध करून दाखविण्याची आपली तयारी आहे. एखाद्या 'राजाविषयीची भारतीय संकल्पना' तो किती परिश्रम घेतो किंवा किती नेकदारपणे कर्तव्यनिष्ठ राहतो, अशा स्वरूपाची सुतराम नव्हती; राजा म्हटला म्हणजे त्याने ऐषारामात राहावे, सुखोपभोगात काळ व्यतीत करावा, अशी होती. तो जर असा वागला नाही, तर त्याला मूर्ख समजले जाई." अर्थात सयाजीरावांची ही समजूत अंशतःच बरोबर म्हणता येईल. पूर्वग्रह आणि गैरसमज यांचा वारंवार बळी ठरलेल्या या राजाबद्दल गाढ सहानुभूती वाटली, तरी मलबारी यांनी म्हटल्याप्रमाणे वस्तुस्थितीच अशी होती की, सयाजीरावांना 'नाण्याची दुसरी बाजू ध्यानात घ्यायला काहीसा वेळच लागत असे.'

युरोपीय दौरे आणि प्रशासकीय दौरे यांसंबंधीच्या वादाच्या फेऱ्यात सापडलेले असतानाच महाराजांना आपल्या मुलांच्या शिक्षणाच्या व्यवस्थेसाठीही वेळ द्यावा लागला. टी. हार्वे फ्रेंच यांची व इतर शिक्षकांची आपल्या मुलांची काळजी घेण्यासाठी आणि त्यांच्या प्रत्यक्ष शिक्षणासाठी त्यांनी नेमणूक केली होती. फत्तेसिंहरावांना पूर्वसंकल्पित योजनेप्रमाणे ईटन वा हॅरो येथे न पाठविता त्यांचे सावत्र बंधू जयसिंगराव व शिवाजीराव यांच्याबरोबरच त्यांची बडोद्यातच ऑक्सफर्डच्या परीक्षेसाठी तयारी करून घेण्याची त्यांनी व्यवस्था केली. कारण 'श्रीमंत मुलांबाबतही अंगभूत धोके हे असतातच.' या अंगभूत धोक्यांची जाणीव असल्यामुळे 1898 साली जपानच्या सफरीत फत्तेसिंहरावांबरोबर गेलेल्या फ्रेंच या साहेबाला महाराजांनी लिहिले होते की, राजपुत्राने तूर्त नृत्य शिकणे योग्य नाही : 'फत्तेसिंहरावांना एवढ्यातच नाचरेपणाची तालीम मिळावी अशी माझी बिलकुल इच्छा नाही. मुली, विशेषतः तरुणी यांच्याशी सलगीचे संबंध येऊ न देताही तरुणांना चांगल्या चालीरीती शिकविता येतील.' गरजेपेक्षा अधिक पैसा हाती खेळविता आल्यास राजपुत्र बिघडण्याचीच अधिक शक्यता असते, असेही त्यांना वाटत असे. त्यामुळे त्या त्या राजपुत्रांच्या दर्जाप्रमाणे त्यांना खर्चाचे प्रमाण आखून देण्यात आलेले होते व ते वार्षिक चारशे पौंडांहून अधिक कधीही नसे. फत्तेसिंहरावांनी 1902 मध्ये ऑक्सफर्डच्या बॅलिअल कॉलेजमध्ये प्रवेश मिळविला; पण तेथे नको अशा सवयी आणि संगतसोबत यांची जोड त्यांनी केल्यामुळे त्यांना परत बोलावणे भाग पडले. जयसिंगरावांनी हॅरोला प्रवेश मिळविला होता; पण लवकरच त्यांना अमेरिकेत

हार्वर्डला पाठविण्यात आले. तेथे त्यांनी 1912 साली पदवी संपादन केली. शिवाजीरावांनाही अभ्यासक्रम पुरा झालेला नसतानाच ऑक्सफर्डहून परत यावे लागले. सर्वांत धाकटे धैर्यशीलराव काही काळ ईस्टबोर्न येथे राहिले. आणि बडोद्याला परत आल्यावर त्यांना योग्यतेनुसार प्रशासनाच्या कामात गुंतवून टाकण्यात आले. राजकन्या इंदिरा राजे या बडोद्याच्या कॉलेजमध्येच गेल्या आणि त्यांना अभिजात संस्कृत साहित्याविषयी विशेष गोडी उत्पन्न झाली.

कौटुंबिक सौख्याच्या दृष्टीने सयाजीराव फारच कमनशिबी होते. त्यांनी एका मित्राला एकदा सांगितले, "मला कौटुंबिक जीवन असे कधी लाभलेच नाही. अगदी छोटीशी बाब सांगायची तर साधे चुंबन नाही – सलगी नाही; – मला सर्वत्र मिळायचे ते सलाम ! मी लहान होतो, तेव्हा ही अशी परिस्थिती होती. विवाह होऊन अपत्ये झाल्यावरही महाराज म्हणून वावरण्यापेक्षा अन्य कोणत्या पद्धतीने कसे जगायचे, हे मला कळेनासेच झाले होते. माझी मुलेही मला सदान्‌कदा म्हणत, 'तुम्ही नेहमीच महाराज असता.' त्यांच्या पालनपोषणासंबंधात मी कधीच कसूर केली नाही; तरीपण मला त्यांचा जिव्हाळा कधीच लाभला नाही !" त्यांनी पुढे असेही म्हटले आहे, "मनाला वाटेल त्या वेळी राजवाडा सोडून घरकुलात पुन्हा परत यावयाचे, अशा रीतीने जीवनाचे दोन अलग विभाग करता आले असते, तर मला बरेच काही साधता आले असते." पण त्यांना ते शक्यच झाले नाही. बडोद्यात प्रारंभी त्यांना ज्या पद्धतीचे शिक्षण दिले गेले, त्यामुळे त्यांचा मूळचा हळवा संकोचीपणा वाढतच गेला आणि हा अडसर दूर करण्याची शक्तीच त्यांच्या ठायी उरली नाही. वाढत्या वयाबरोबर त्यांना या गोष्टीचा त्रासही होई. त्यांच्या वरील उद्‌गारांविषयी सार्जंट यांनी शेरा मारला आहे, "अनेकानेक अडसर मोडून काढण्याचे धैर्य ज्या व्यक्तीने दाखविले, तिने दिलेली ही कबुली विचित्रच म्हटली पाहिजे." पण यात अस्वाभाविक असे काही नाही; कारण विरोधी परिस्थितीला निश्चलपणे तोंड देणाऱ्या अनेक माणसांच्या बाबतीत हे असेच आढळते. वैयक्तिक संबंधांच्या बाबतीत पक्षघात झाल्यासारखे ते हतबल होतात, असेही त्याने पुढे नमूद करून ठेवले आहे.

सयाजीरावांच्या हयातीतच त्यांचे तीन पुत्र निधन पावले. कन्येने मातापित्यांच्या इच्छेविरुद्ध आपले लग्न केले आणि सयाजीरावांच्या हयातीतच ती गतधवा होण्याचा प्रसंग आला. राजपुत्र फत्तेसिंहराव यांचा विवाह सातारा जिल्ह्यातील फलटण संस्थानातील राजकन्या पद्मावती यांच्याशी 4 फेब्रुवारी 1904 रोजी साजरा झाला. चार वर्षांच्या वैवाहिक जीवनानंतर या दांपत्याचा दुर्दैवाने वियोग घडून आला. फत्तेसिंहराव मेंदूच्या विकाराने (न्यूरायटिस) मरण पावले. त्यांच्यामागे विधवा पत्नी, दोन मुली व एक छोटा पुत्र असा परिवार होता. कुटुंबात एकामागून एक घडून आलेल्या मृत्यूंनंतर फत्तेसिंहरावांचा अल्पवयी पुत्र राज्याचा वारस ठरला. 1903 साली सयाजीरावांचे खाजगी डॉक्टर आणि

स्नेही डॉ. बटुकराम मेहता यांचे निधन झाले. बटुकराम यांची जागा त्यांचे डॉक्टर पुत्र सुमंत मेहता यांनी घेतली.

1906 साली सयाजीरावांनी आपल्या कारकीर्दीची पंचवीस वर्षे पूर्ण केल्याने त्यांच्या राज्यारोहणाचा रौप्यमहोत्सव साजरा झाला. 1905-6 साली युरोपच्या सातव्या सफरीवर असताना भारतमंत्री लॉर्ड मोर्ले यांनी संस्थानातून दीर्घकाळ दूर राहिल्याबद्दल महाराजांची कानउघाडणी केली. हा प्रकार म्हणजे युरोपीय दौऱ्यांसंबंधात सारे काही ठीक नाही, यांची पुनश्च बोचरी आठवण करून देणेच होते. महाराज इंग्लंडहून अमेरिकेला गेले व 1906 च्या नोव्हेंबरमध्ये बडोद्याला परतले. रौप्यमहोत्सव 1907 साली 5-10 मार्च या दरम्यान थाटात साजरा करण्यात आला. महोत्सवाच्या अनेक कार्यक्रमांपैकी मशाल-मिरवणूक विशेष चित्ताकर्षक ठरली. महोत्सवाची स्मृती म्हणून महाराजांचा अश्वारूढ असा एक डौलदार पुतळा सार्वजनिक जागेसमोर उभारण्यात आला आणि शहराच्या मध्यभागी असणारी नवी ज्यूबिली बाग बडोद्यातील प्रजाजनांसाठी खुली करण्यात आली. त्याच वर्षी जुन्या सरकारवाड्यात असणारे बडोद्याचे राजसिंहासन लक्ष्मीविलास राजवाड्यात हालवून त्याची इंदुमती-महालात प्रतिष्ठापना करण्यात आली.

1909 मध्ये महाराजांनी व्हाइसरॉय लॉर्ड मिंटो यांचे बडोद्यात शाही स्वागत करून त्याप्रीत्यर्थ आनंदोत्सव साजरा केला. दिवाण रोमेशचंद्र दत्त हे लॉर्ड मिंटो यांच्या सन्मानार्थ आयोजित केलेल्या एका समारंभात आजारी पडून थोड्याच दिवसांत निवर्तले. या स्नेहशील दिवाणांच्या मृत्यूची स्मृती बुजली नाही, तोच पुढील वर्षी म्हणजे 1910 मध्ये सयाजीरावांचे मित्र, मार्गदर्शक व तत्त्वज्ञ एफ्. ए. एच्. एलियट यांच्या निधनाची बातमी इंग्लंडातून येऊन थडकली, 1910 साली सयाजीराव जपान, अमेरिका व युरोपचा दौरा करून आले. लोकांपैकी एक गट व वृत्तपत्रे यांच्या संदर्भातील काही कटू आठवणी वगळता राजदांपत्याने अमेरिकन सफरीचा आनंद पुरेपूर उपभोगला. पुढच्या वर्षी बादशहा पाचवे जॉर्ज यांच्या राज्यरोहण समारंभाला उपस्थित राहण्यासाठी महाराज इंग्लंडला गेले. परत आल्यावर एका बाजूला संस्थान दुष्काळाच्या खाईत सापडल्याचे महाराजांना आढळले, तर दुसऱ्या बाजूला आयुष्यातील अत्यंत विलक्षण खडाजंगीत ते अडकले. दिल्ली दरबार-प्रकरण म्हणून सुपरिचित असणाऱ्या या घटनेमुळे महाराज अगदी मुळापासून हादरून गेले. या प्रकरणाची तपशीलवार हकीकत पुढे येईलच.

याच काळात कन्येच्या विवाह प्रकरणाने महाराज अगदी अस्वस्थ होऊन गेलेले होते. राजकन्येचा विवाह, महाराजांनी ग्वाल्हेर संस्थानचे माधवराव शिंदे यांच्याशी निश्चित केला होता; तोही माधवरावांची प्रथम पत्नी हयात असता व दोघांच्या वयातही बरेच अंतर असता. जे काही घडत होते त्याबाबत इंदिरा अगदी नाराज होती. आणि एकामागून एक शोचनीय गोष्टींची एक मालिकाच घडून आली. दिल्ली दरबारच्या प्रसंगी 1911 मध्ये राजकन्येशी कुचबिहारचे राजपुत्र जितेंद्र नारायण यांच्याशी गाठ पडली होती व

तिने त्यांच्याशी विवाह करण्याचा निर्णय घेऊन टाकला होता. तेव्हा राजकन्येने स्वतःच पुढे येऊन शिंदे यांच्याबरोबरचा आपला ठरलेला वाङ्‌निश्चय मोडला आणि जितेंद्राबरोबर विवाह करण्याचा मनोदय जाहीर करून आपल्या मातापित्यांना आश्चर्याचा धक्का दिला. सयाजीरावांनी कन्येचे मन वळविण्याचा अटोकाट प्रयत्न केला; पण तिने ऐकले नाही. सयाजीराव त्या दरम्यान युरोपच्या सफरीवर निघण्याच्या तयारीत असल्याने सावधगिरीची उपाययोजना म्हणून त्यांनी राजकन्येलाही आपल्याबरोबर घेतले. कारण प्रेमी युगुलाने मुंबईहून परस्पर निसटून जाण्याचा बेत आखला होता. इंदिरेचा जळफळाट झाला पण तिला काही करताही येईना. यामुळे ती संधीची वाट पाहत राहिली. युरोपला निघण्याच्या पूर्वी महाराजांनी राजपुत्र जयसिंगराव यांचा विवाह शकुंतला राजे यांच्याशी दि. 27 फेब्रुवारी 1913 रोजी लावून दिला. राजकुटुंब इंग्लंडला पोहोचले, तेव्हा इंदिरेपाठोपाठ जितेंद्र नारायण हेही इंग्लंडमध्ये दाखल झाल्याचे आढळून आले. यामुळे इंदिरेवर नियंत्रण ठेवणे अशक्य झाले. काही झाले तरी कुचबिहारच्या राजपुत्राशीच विवाह करण्याचा आपल्या मुलीचा दृढनिश्चय पाहिल्यावर महाराजांनी आपला विरोध सोडून दिला. नंतर मात्र इंदिरेच्या हितसंबंधांचे रक्षण करण्याच्या दृष्टीने काही कायदेशीर उपचार पुरे झाल्यावर तिच्या विवाहासाठी आपल्या इंग्लंडमधील मित्रांची मदत मिळवून देण्याची व्यवस्था खुद्द महाराजांनीच केली. पण झाल्या प्रकाराने चिमणाबाई इतक्या रागावल्या की, त्यांनी मुलीशी बोलणे सोडले. या विवाहाची वार्ता लंडनमधील वृत्तपत्रांनी प्रसिद्ध केली. त्या वार्तेप्रमाणे हा विवाह 25 ऑगस्ट 1913 रोजी ब्राह्मोसमाज पद्धतीने झाला व नंतर तो रीतसर नोंदणी पद्धतीनेही नोंदविण्यात आला. महाराजांनी जाहीर केले की, या विवाहाला आपला जरी तीव्र विरोध होता, तरी मुलगी सज्ञान असल्याने तिच्या उत्कट इच्छेला मान्यता देण्याखेरीज दुसरा पर्यायच नव्हता.

या सर्व घटनाप्रसंगांनी सयाजीराव आणि त्यांच्या पत्नी खिन्न झाल्या. त्यांच्या अपत्यांमध्ये इंदिरा ही सर्वांत धीट होती, असे आढळून येते. आई-वडिलांच्या निर्णयाला न जुमानता ती स्वतःला चिकटून राहिली, आणि शेवटी आपल्या मार्गाने जाऊ देण्यास तिने त्यांना भाग पाडले. परंतु ही घटना म्हणजे सयाजीराव व चिमणाबाई यांच्या मनोवृत्तीवरील एक कटू भाष्यच होय; कारण राजपदाविषयीच्या व कुलप्रतिष्ठेविषयीच्या आपल्या नसत्या कल्पनांखातर एक पत्नी हयात असलेल्या आणि वयाच्या दृष्टीनेही विजोड अशा पुरुषाबरोबर कन्येच्या इच्छेविरुद्ध तिचा विवाह लावून देण्यास हे राजदांपत्य तयार झाले होते! सयाजीरावांसारख्या प्रगतीशील आणि सुधारक मताच्या राजाचा यातील सहभाग विशेषच आश्चर्यकारक वाटतो.

युरोपमधून परतल्यावर सयाजीरावांनी आपला पुत्र शिवाजीराव यांचा विवाह 1913 च्या डिसेंबरमध्ये साजरा केला आणि 1914 च्या एप्रिलमध्ये सयाजीराव सपत्नीक पुन्हा युरोपला गेले आणि पहिल्या महायुद्धाच्या तडाख्यात सापडले. एकदा तर

ऑस्ट्रियामध्ये अडकून पडलेल्या चिमणाबाईना आपण वेस्ट इंडियन असल्याचा बहाणा करून प्रवास करावा लागला. वाढती असुरक्षितता ध्यानात घेऊन डिसेंबर 1914 मध्ये सयाजीराव भारतात परत आले. या प्रसंगी प्रथमच चिमणाबाईनी गोषा वा पडदानशीनपणा टाकून दिला आणि एकाच गाडीत महाराजांच्या शेजारी बसून बडोद्याच्या राजरस्त्यावरून त्या फिरताना दिसल्या. अनेकांना ते दृश्य म्हणजे निःशब्द क्रान्तीसारखे वाटले.

सयाजीराव पुढील पाच वर्षे हिंदुस्थान सोडून बाहेर जाऊ शकले नाहीत. या संधीचा उपयोग त्यांनी संस्थानात आणि देशात दौरे काढण्यासाठी केला. शिवाय 'नरेंद्र मंडळ' (चेंबर ऑफ इंडियन प्रिन्सेस) स्थापन करण्याच्या प्राथमिक चर्चेत त्यांनी जातीने भाग घेतला. या मंडळाच्या कामकाजाबाबत जो प्रारंभिक नमुना ठरविण्यात आलेला होता, त्याविषयी सयाजीराव फारसे उत्सुक नव्हते. 'भावी काळातील हितसंबंधांची जपणूक करणारी संस्था' म्हणून या मंडळाचे कार्य व्हावे, अशी त्यांची इच्छा होती. "निश्चित स्वरूपाचे कार्य आणि सुनिश्चित अधिकार असणारे असे हे नरेंद्र मंडळ स्थापावे, हे आपल्यापुढील उद्दिष्ट आहे." असेही मत त्यांनी तदनंतर मांडलेले होते. तरीपण तडकाफडकी काहीही ठरविण्याच्या ते सर्वस्वी विरुद्ध होते. बुन्देसराथ (Bundesrath) या जर्मन संस्थेच्या धर्तीवर संस्थानांचा संघ प्रस्थापित केल्यास भावी शक्यतांच्या दृष्टीने तो अधिक फलदायी ठरणारा आहे, असे त्यांचे मत होते. म्हणून त्यांनी 'संस्थानी सल्लागार मंडळ' (कौन्सिल ऑफ स्टेटस्) या मंडळाची तसेच हिंदुस्थान सरकार आणि संस्थाने यांच्यातील वादग्रस्त प्रश्नात लवादाचे कार्य करण्यासाठी 'कोर्ट ऑफ अपील' म्हणून स्थापन करण्यात यावे, अशी सूचना केली. महाराजांनी व्यक्त केलेल्या या अभिप्रायात पुढील दोन संकल्पना प्रमुख होत्या. पहिली गोष्ट, निव्वळ अंतर्गत प्रश्नांत हस्तक्षेप करणे बंद झाले पाहिजे आणि दुसरी गोष्ट म्हणजे ब्रिटिश सरकार आणि संस्थाने या दोघांशी संबंधित अशा प्रश्नांबाबत संस्थानांशी समानतेच्या भूमिकेवरून विचारविनिमय झाला पाहिजे. या त्यांच्या अभिप्रायामागे विशिष्ट संदर्भ होता. तो म्हणजे भारतमंत्री एडविन मांटेग्यू हे घटनात्मक सुधारणांची नवी योजना तयार करण्याच्या दृष्टीने परिस्थितीची प्रत्यक्ष पाहणी करण्यासाठी त्या वेळी हिंदुस्थानात यावयाचे होते.

महाराजांच्या ज्या निष्ठेबद्दल वारंवार शंका व्यक्त केली गेली, ती साम्राज्यावरील निष्ठा व्यक्त करण्याची संधी याच वेळी महाराजांना महायुद्धाच्या रूपाने मिळाली. त्यांनी बत्तीस लाखांचे युद्धरोखे खरेदी केले आणि अडतीस लाखांच्या सरकारी प्रॉमिसरी नोटांचे युद्ध कर्जरोख्यांत रूपांतर केले. आजारानंतरच्या प्रकृतिस्वास्थ्यासाठी येणाऱ्या ब्रिटिश सैनिकांच्या उपयोगासाठी त्यांनी आपला मुंबईतला 'जयमाला' राजवाडाही हिंदुस्थान सरकारला सुपूर्द केला. युद्धप्रयत्नांसाठी केलेल्या साहाय्याबद्दल सयाजीरावांना 'जी.सी.आय.ई.' (ग्रँड कमांडर ऑफ दि इंडियन एंपायर) हा किताब 1918 च्या जानेवारी महिन्यात बहाल करण्यात आला. व्हाइसरॉय लॉर्ड चेम्सफर्ड यांनी पुढील वर्षाच्या मार्च

महिन्यात बडोदे संस्थानाला अधिकृत पातळीवरची भेट दिली. लाटसाहेबांच्या हस्ते गोयागेट येथे बडोदा राज्य रेल्वे कार्यशाळेचा शिलान्यास समारंभही साजरा झाला.

याच काळात ओखा मंडळाचा (द्वारका आणि बेत) संपूर्ण ताबा काही शर्तीवर संस्थानाकडे देण्यात आला त्यामुळे हिंदुस्थान सरकार आणि अफगाणिस्तान यांच्यामध्ये संघर्ष निर्माण होण्याची चिन्हे दिसू लागली, तेव्हा 1919 साली सयाजीरावांनी अगदी कृतज्ञतापूर्वक सर्व प्रकारचे सहकार्य देऊ केले.

महायुद्धानंतर युरोपात पुन्हा सारे स्थिरस्थावर झाल्यावर प्रकृतीच्या दृष्टीने हवापालटासाठी सयाजीरावांनी परदेशी जाण्याचे ठरविले. या सफरीला आणखीही एक कारण होते. राजपुत्र जयसिंगराव हे आजारी होते व त्यांच्या बाबतीत वैद्यकीयदृष्ट्या अधिक काळजी घेण्याची गरज निर्माण झालेली होती. अशा प्रकारे 1919 च्या सप्टेंबरमध्ये आजारी राजकुटुंब परदेशी रवाना झाले. पण तेथेही दुर्दैवाने त्यांचा पाठलाग केला. युवराज्ञी पद्मावती यांचे अल्सरने निधन झाल्याची वार्ता बडोद्याहून येऊन थडकली. तदनंतर अल्पावधीतच राजपुत्र शिवाजीरावही विषमज्वराला बळी पडले. स्वतःवर उपचार करून घेण्यासाठी रुग्णालयात प्रवेश करू पाहणाऱ्या आजारी महाराजांच्या कानांवर या दोन अपमृत्यूंच्या धक्कादायक वार्ता पडल्या. सयाजीराव आणि चिमणाबाई या उभयतांनाही एकमेकांच्या सहानुभूतीची खास गरज होती व त्या शोकप्रसंगी त्यांनी एकमेकांची मोठ्या धैर्याने साथ केली. स्वभावाच्या विशिष्ट ठेवणीमुळे सयाजीराव या दुःखातून लवकरच बाहेर पडले आणि एक व्यावहारिक करार पूर्ण करण्यासाठीही त्यांनी वेळात वेळ काढला.

गायकवाड कुटुंब जवळजवळ दरवर्षीच इंग्लंडला जात असल्याने त्यांना तेथे कायमच्या वास्तूची गरज होती. 1919 मध्ये वॉटफोर्डजवळची रसेल्स इस्टेट व सरे परगण्यातील ओल्डस्वर्थ या गावी एक घर अशा दोन वास्तू त्यांनी खरेदी केल्या. दुसरे घर सुप्रसिद्ध इंग्रजी कवी लॉर्ड टेनिसन यांच्या मालकीचे असल्याने त्या वास्तूशी काही ऐतिहासिक महत्त्वाच्या स्मृतीही निगडीत होत्या. याच मुक्कामात राजपुत्र प्रतापसिंगराव यांच्या शिक्षणाची व्यवस्थाही महाराजांनी केली.

प्रिन्स ऑफ वेल्स एडवर्ड यांनी 1921 च्या नोव्हेंबरात बडोद्याला भेट दिली आणि महाराजांनी त्यांचे हार्दिक स्वागत केले. ब्रिटिश राजकुटुंबातील कोणाही व्यक्तीचे आगतस्वागत करण्यास महाराजांना नेहमीच खास आनंद होत असे. कारण अशा प्रसंगी आपल्या बरोबरीच्या दर्जाच्या लोकांत आपण वावरत आहोत, अशी त्यांची भावना असे. व्हाइसरॉय किंवा गव्हर्नर यांचा सन्मान करण्यात महाराज कसूर करत नसले, तरी त्यांना ते प्रथम श्रेणीतले शाही पाहुणे म्हणून मानीत नसत.

1922 च्या मार्चमध्ये धैर्यशीलराव यांचा विवाह विमला राजे यांच्याशी झाल्यावर एप्रिलमध्ये महाराज पुन्हा यूरोपला गेले; पण तेथे पुन्हा क्रूर दैव त्यांची जणू वाटच

पाहत होते. 21 डिसेंबरला त्यांचे जामात जितेंद्र नारायण यांचे निधन झाले. महाराजांनी त्यांच्याशी यापूर्वीच दिलजमाई करून घेतली होती, आता त्यांच्या अंत्यविधीला उपस्थित राहण्याचा प्रसंग त्यांच्यावर आला होता. या दौऱ्यावर असतानाच त्यांनी इटालीचा फॅसिस्ट नेता मुसोलिनी याची भेट घेतली होती व त्याच्या नेतृत्वाखाली देशाची जी प्रचंड प्रगती घडून आलेली होती, ती पाहून ते प्रभावित झाले होते. प्रातिनिधिक राज्यपद्धतीपेक्षा बलिष्ठ हुकूमशाही राजवटच अधिक फायदेशीर असते, असा त्यांचा ग्रह झाला. पुढे एकदा इटालियन नमुन्यानुसार आपल्या बडोदा संस्थानासाठीही एक घटना तयार करावी, असा त्यांचा मानस होता.

स्वित्झर्लंडमध्ये सेंट मॉरिझ येथे आपल्या आमवातावर जलौषधीचे उपचार करून घेत असताना कुटुंबातील आणखी एका व्यक्तीच्या मृत्यूची वार्ता महाराजांना ऐकावी लागली. रेल्वेने बर्लिनहून पॅरिसला जात असता 27 ऑगस्ट 1923 रोजी जयसिंगराव यांचे गाडीतच निधन झाले. नेमके नाव न देता गायकवाडांचा मृत्यू झाल्याची बातमी प्रसिद्ध झाल्यामुळे भलताच गोंधळ उडाला. सयाजीरावांनाच मृत्यू आला, असा गैरसमज सगळीकडे पसरला. युरोपीय वृत्तपत्रांतून मृत्युलेखही आले. ही वार्ता बडोद्याला पोहोचताच सारी प्रजा सुन्न झाली. पण मग अधिक चौकशीनंतर सर्व घोटाळ्याचा उलगडा झाला. घरगुती शोकांतिकेबरोबर अशी एक फसगमतीची सुखान्तिकाही घडून आली. अर्नेस्ट हेमिंग्वेप्रमाणे सयाजीरावांनाही स्वतःवरचे मृत्युलेख वाचण्याचे भाग्य लाभले.

या वयातही म्हणजे सन 1924-25 मध्ये महाराजांनी फ्रेंच शिकण्यास प्रारंभ केला होता व त्यासाठी त्यांनी युरोपीय दौऱ्यात एक फ्रेंच शिक्षिका ठेवली होती. यातून थोडीफार कुजबूज सुरू झाली; कारण त्या काळी युरोपीय स्त्रीसमुदायामध्ये महाराज वरचेवर रमताना दिसून येत होते. पण आपल्या स्वभावानुसार महाराजांनी आपला तो क्रम तसाच चालू ठेवला. 1926 हे त्यांच्या राजवटीचे सुवर्णमहोत्सवी वर्ष होते. तन्निमित्त एक आनंदसोहळा जानेवारी महिन्यात मोठ्या थाटामाटाने व उत्साहाने साजरा झाला. व्हाइसरॉय लॉर्ड रीडिंग व त्यांच्या पत्नी यांनी या वेळी बडोद्याला भेट दिली. या भेटीची संधी साधून व्हाइसरॉय यांच्या हस्ते गोल्डन ज्यूबिली सायन्स इन्स्टिट्यूट या इमारतीचा शिलान्यास समारंभपूर्वक करण्यात आला. त्याच वर्षीच्या मार्चमध्ये एक अगदी वेगळ्या तऱ्हेची संस्था स्थापन झाली. तिला 'गरीब गृह' (पुअर हाउस) असे म्हटले गेले. तीत वृद्ध, अपंग आणि निराधार अशा लोकांची व्यवस्था करण्यात यावयाची होती. पुढे बहिऱ्या-मुक्यांसाठी, तसेच अंधांसाठीही शाळा सुरू करण्यात आली. आपल्या प्रजाजनांपैकी दुःखपीडितांविषयी आस्था दाखविण्याबाबत सयाजीरावांनी कधीही कुचराई केली नाही.

जीवनाच्या अखेरच्या टप्प्यात आपले जन्मगाव कवळाणे याचे त्यांना स्मरण झाले. 1926 च्या फेब्रुवारीत त्यांनी कवळाण्याला भेट दिली आणि सुदूरच्या भूतकाळात ते

अगदी हरवून गेले. बाळपणच्या काही थोड्या गोष्टी त्यांना अंधुकपणे आठवत होत्या.

उतारवयात आणखी एक नवी कल्पना त्यांच्या मनात आली. जादा विलंब होण्यापूर्वीच गादीचे वारस राजपुत्र प्रतापसिंह यांचा विवाह उरकून घेण्याचा त्यांनी बेत आखला. घोरपडे घराण्यातील शांतादेवी ही वधू म्हणून पसंत करण्यात आली आणि 4 जानेवारी 1929 रोजी हा विवाहसमारंभही थाटात साजरा झाला. हा सर्व समारंभ नीट पार पडावा म्हणून आजोबांनी जातीने विशेष मेहनत घेतली. पण आमवाताचा विकार बळावल्यामुळे ते पुनश्च युरोपला गेले. तेथे काही महिने घालवल्यावर व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यांच्या स्वागतसाठी 1930 सालच्या जानेवारीत भारतात परत आले, आयर्विन यांची कारकीर्द राजकीय चळवळीच्या दृष्टीने धामधुमीची होती. मात्र 1930-32 च्या स्वातंत्र्यचळवळीपासून महाराज अलिप्त राहिले. 1930 सालच्या एका खास घटनेमुळे त्यांना विशेष आनंद झाला. 2 एप्रिल रोजी शांतादेवींनी राजपुत्र फत्तेसिंगराव यांना जन्म दिला व महाराज पणजोबा झाले.

सयाजीरावांनी 1933 व 1934 या वर्षी अमेरिकेला दोन भेटी दिल्या. 1933 साली शिकागो येथे भरलेल्या 'सर्व धर्म सहभाव' (फेलोशिप ऑफ फेथ्स) परिषदेचे अध्यक्षस्थान त्यांनी भूषविले. त्या वेळच्या त्यांच्या भाषणाचे उत्तम स्वागत झाले. जगातील धर्माचे स्थान हा विषय त्यांनी आपल्या भाषणात मांडला. पुढे 1936 साली लंडन येथे भरलेल्या परिषदेचेही अध्यक्षपद त्यांनीच भूषविले होते आणि त्या प्रसंगीही त्यांनी सदर विषयाचेच आणखी पुढे विवेचन केले.

1934 साली, कवळाणे येथील आप्तांपैकी शेवटचा दुवा ठरणारे त्यांचे प्रिय बंधू संपतराव यांचे निधन झाले व त्यायोगे कधीही भरून न येणारी अशी त्यांची व्यक्तिगत हानी झाली. आपणही आता जीवनप्रवासाच्या अखेरच्या टप्प्यावर येऊन ठेपलो असल्याची त्यांना जाणीव झाली. पण तो अपरिहार्य प्रसंग येण्यापूर्वी त्यांच्या हातून अनेक सत्कार्ये घडून यावयाची होती. आपल्या राजवटीचा हीरकमहोत्सव त्यांनी 1935 साली साजरा केला. हे भाग्य लाभलेल्या थोड्या सुदैवी अधिपतींत त्यांची गणना करावी लागते. या निमित्ताने त्यांना मिळालेल्या शेकडो मानपत्रांना उत्तर देताना, आपण जे काही साधू शकलो त्याचे समालोचन केले. त्यांचे अभिनंदन करण्यासाठी लॉर्ड विलिंग्डन तसेच लेडी विलिंग्डन बडोद्याला आल्या होत्या आणि त्यांनी महाराजांना बादशहांच्या शुभेच्छा बहाल केल्या.

1936 मध्ये महाराज पुन्हा युरोपच्या सफरीवर गेले. या वेळी ऑलिंपिक सामने पाहण्यासाठी ते बर्लिनला गेले. तेथे त्यांनी हिटलरची भेट घेतली व हिटलरने त्यांचे सन्मानपूर्वक स्वागत केले. जर्मन हुकूमशहाबद्दल महाराजांचे मत चांगले झाले. 1937 साली साम्राज्य-परिषदेसाठी ते लंडनला गेले. या वर्षी क्रिकेट क्लब ऑफ इंडिया या संस्थेने त्यांना आश्रयदाता हे संस्थेचे पद बहाल केले. नरेंद्र मंडळाचे प्रमुखपद

स्वीकारण्याची त्यांना विनंती करण्यात आलेली होती; परंतु आपण दीर्घकाळ हिंदुस्थानात नसतो व त्यामुळे मंडळाच्या कामावर परिणाम होईल, यासाठी त्यांनी ते पद स्वीकारण्यास सौजन्यपूर्वक नकार दिला.

सन 1938 साली त्यांनी युरोपची आपली चोवीसावी व अखेरची सफर केली. इकडे शांतादेवींनी रणजितसिंग या आणखी एका पुत्राला जन्म दिला. त्याचा आनंदोत्सव सुरू असतानाच धैर्यशीलरावांच्या प्रकृतीविषयीची काळजी महाराजांच्या मनात निर्माण झालेली होती, त्यामुळे त्यांना परदेशसफरीतही मनःशांती लाभली नाही. हिटलरने सुडेटन जर्मनांची तळी उचलून धरल्याने युरोपात ताणतणावाची स्थिती निर्माण झालेली होती व सर्व युरोप खंडच स्वतःला आणि सर्व राष्ट्रांना जागतिक युद्धाच्या खाईत आणखी एकदा लोटू पाहत होते. त्यामुळे या खेपेस महाराज सफरीहून लवकर परतले आणि 31 ऑक्टोबर 1938 रोजी मुंबईस येऊन दाखल झाले.

परतीच्या वेळीही लक्षणे काही ठीक दिसत नव्हती. एकदा बोटीवर असताना महाराज अचानक पडले; पण प्रसंगावधान राखून ते ताबडतोब सावरले; पण मुंबईस पोहोचेपर्यंत त्यांची प्रकृती ठीक राहिलेली नव्हती. आजार बळावला होता आणि त्यांना बडोद्याला नेणेही अशक्य झाले. 1939 च्या फेब्रुवारी महिन्याच्या सुरवातीस त्यांच्या आजाराने गंभीर स्वरूप धारण केले व त्यांना बाहेरून रक्ताचा पुरवठा करावा लागला. डॉक्टरांचे एक मंडळ सतत दक्ष राहिले होते; पण उपचारांना प्रतिसाद मिळत नव्हता. 6 फेब्रुवारी 1939 रोजी वयाच्या शाहात्तराव्या वर्षी महाराजांचे शांतपणे प्राणोत्क्रमण झाले.

एका उदारहृदयी राजाच्या गौरवशाली कारकीर्दीला अशा प्रकारे पूर्णविराम मिळाला. बडोदे संस्थानात त्यांची स्मृती मात्र मागे राहिली. त्यांचे जे काही थोडे मित्र होते, त्यांच्या आणि विशेषतः ज्या बडोद्यातील प्रजेच्या कल्याणासाठी ते सतत झटले तिच्या मनीमानसी महाराजांची स्मृती चिरंतन राहील. त्यांचे निधन बडोद्यात होणे उचित होते, एवढे मात्र बडोदेकरांना खचितच वाटले असेल. त्यांचा जन्म बडोद्यात झालेला नव्हता व तेव्हा आता मृत्यूही बडोद्याबाहेर घडून यावा, हा एक दैवी योगायोगच होय. एक प्रदीर्घ कारकीर्द लाभलेला लोककल्याणकारी असा हा एक थोर राजा होऊन गेला आणि त्या कारकीर्दीची कहाणी आजही जनमनातील स्मृती जागवीत राहिलेली आहे.

पाच

# 'राजद्रोही' राजा

आपल्या जीवनाच्या अखेरच्या पन्नास वर्षांत महाराजांनी जगातले विविध देशविदेश पाहिले व त्याचा एक सामूहिक असा परिणाम घडून आला. "प्रत्येक दौऱ्यातून नानाविध अनुभव आणि नानाविध सूचना मिळत गेल्या.' भिन्न वंश, भिन्न धर्म आणि भिन्न संस्कृती यांच्याशी सतत संपर्क आल्याने धर्मवेड आणि सनातनी कर्मठपणा यांपासून त्यांचे मन मुक्त होत गेले. आपण हिंदू असल्याचा त्यांना अभिमान होता आणि आपले गुरुजन भिन्न भिन्न धर्मीय असूनही त्यांनी आपणांस हिंदू राहू दिले, याचेही त्यांना समाधानच वाटत असे. हिंदू जीवनपद्धती सर्वसमावेशक असल्यामुळे तिने अन्य जीवनपद्धतींकडे साहनुभूतीने व खुल्या मनाने पाहण्यास त्यांना शिकविले होते. अर्थात त्यामुळे त्यांच्या मनात सतत खळबळ चालू असे. युरोपीय लोक किती स्वतंत्र वृत्तीने आणि ताठरपणे वावरतात, हे त्यांनी पाहिले होते. इंग्लिश सत्ताधाऱ्यांचे आपल्या मानेवरचे जोखड अमेरिकन लोकांनी झुगारून देऊन आपले, 'नव्या जगा 'चे स्वप्न साकार केले, तसेच परकीय सत्ता, दारिद्र्य, अज्ञान, कालबाह्य रूढी आणि परंपरा यांच्या कचाट्यातून मुक्त झाल्यामुळे सामर्थ्य आणि सुबत्ता यांच्या दिशेने ते कशी वाटचाल करू लागले होते, हेही त्यांनी पाहिले होते. इंग्लंडात रुग्बी येथे शाळेत शिकणाऱ्या त्यांच्या पुतण्याने एकदा त्यांना अगदी चकित करून टाकणारे पत्र लिहिले होते. या विचित्र प्रसंगाने महाराजांच्या मनावर कोणत्या तऱ्हेचे दडपण असे, याची कल्पना येते. त्यांच्या पुतण्याने ताबडतोब ख्रिश्चन धर्म स्वीकारण्यासाठी पत्राने त्यांची परवानगी मागितली होती. त्याने हा निर्णय कोणत्या कारणास्तव घेतला आहे, याची त्यांनी त्वरित चौकशी केली. बालसुलभ अशा उत्साहाच्या भरात हिंदू धर्माची बंधने आपल्या प्रगतीच्या आड येतात, असे त्याला वाटू लागले होते. महाराजांनी त्याला प्रेमाने जवळ घेतले आणि बोध केला की, सर्व धर्म आपापल्या स्वत्वाला जागून सच्छील, मनाचा मोकळेपणा आणि सर्व मानवी सद्‌गुणांचीच भलावण करीत असतात व अखेर स्वदेशप्रीती हाच सर्वांत श्रेष्ठ धर्म होय. अशा रीतीने सयाजीरावांनी आपल्या जीवनाच्या प्रारंभकालीच आपला देश आणि धर्म यांच्याविषयीची आपली भक्तिभावना प्रकट केली होती.

कालौघात हे त्यांचे विचार अधिकाधिक दृढ गेले. आपण भारतीय असल्याचा ज्यांना अभिमान होता, अशा सर्वांचे, पिढ्यान्-पिढ्या गाढ निद्रावस्थेत असलेल्या देशाला खडबडून जागे करण्याचे प्रयत्न जोरात चालू होते, असा तो काळ होता. या गाढ निद्रेच्या मूळ कारणांवर सर्व शक्तीनिशी हल्ला करून सर्वांगीण सुधारणांच्या द्वारा ही जागृती घडवून आणावयाची होती. शैक्षणिक माध्यमातून अधिकतर जागृती साधणे, हेच त्यांचे अमोघ साधन होते. आपला सद्धर्म काळाच्या कसोटीवर उतरलेला आहे, हिंदी समाजाचे अंगभूत असे एक सामर्थ्य आहे आणि लोकांना एकदा आपल्या समस्यांची जाणीव झाली आणि त्या सोडविण्याची बुद्धिमत्ता आणि साधने त्यांच्यापाशी आहेत, याचे एकदा भान आल्यावर जनतेत प्रचंड आत्मविश्वास आला. हा प्रवाह सयाजीरावांच्या विचारसरणीत आढळून येतो व तदनुसार ध्येयपूर्तीसाठी स्वतःच्या जीवनाला आणि साधनसंपत्तीला तसा आकार देतानाही ते दिसतात. दीनदलितांना चांगली वागणूक, सामाजिक न्याय, अधिक सुधारलेले राहणीमान व हिंदी लोकांना प्रतिष्ठेचे स्थान या गोष्टी प्राप्त करून देण्याचे प्रयत्न करणारा राष्ट्राचा एक शिल्पकार अशी त्यांनी आपली एक प्रतिमा निर्माण केली. आधुनिकीकरण म्हणजे सदैव पाश्चात्त्यीकरण नव्हे, याची त्यांना जाणीव होती, म्हणून पाश्चात्त्यांच्या अंधानुकरणाचा सल्ला त्यांनी कधीच कोणाला दिला नाही. त्यांचा हा दृष्टिकोन, त्यांचे प्रत्यक्ष वर्तन आणि त्यांनी आखलेल्या उपाययोजना यांमुळे त्यांच्या राज्यात एक प्रकारचा विश्वकुटुंबी दृष्टिकोन निर्माण झाला. प्राचीन व आधुनिक जगतातील सर्व चांगल्या गोष्टींचा सुरेख संगम त्यात झालेला होता. पूर्व आणि पश्चिम यांची येथे जणू स्नेहशील युती झाली होती.

हिंदुस्थान हा एकात्म आणि आविभाज्य असून 'स्वदेशी 'ची संकल्पना ही राष्ट्र उभारणीची खरी शक्ती आहे, अशी सयाजीरावांची धारणा होती. 29 मार्च 1901 रोजी मुंबईच्या ग्रँट मेडिकल कॉलेजच्या बक्षीससमारंभात भाषण करताना सयाजीरावांनी सांगितले होते की, आपण कितीही विभक्त असलो, तरी आपल्या दैवानेच आपल्याला एकत्र बांधून ठेवले आहे. जात, धर्म किंवा लिंग असा कसलाही भेद न करता विद्यार्थ्यांना प्रवेश देणाऱ्या आणि लोकशिक्षणाचे उदात्त कार्य करणाऱ्या त्या महाविद्यालयाची त्यांनी प्रशंसा केली. एक आस्थेवाईक हिंदी गृहस्थ या नात्याने महाविद्यालयाच्या प्रगतीकडे आपले लक्ष असल्याचेही त्यांनी या प्रसंगी आवर्जून सांगितले.

देशाचे औद्योगीकरण व्हावे, यावर सयाजीरावांचा दृढ विश्वास होता आणि आपले अनेक उद्योगधंदे परक्यांच्या हातांत आहेत, याचे त्यांना फार वैषम्य वाटे. आपले सर्व लोहमार्ग परकीयांच्या भांडवलावर बांधले गेलेले आहेत, हे त्यांनी निदर्शनास आणलेले होते. साधारणतः ज्याला नवी सुधारणा किंवा नवी संस्कृती म्हटले जाई, ती केवळ नक्कलच आहे, असे त्यांना वाटे. उत्क्रांतीची प्रक्रिया कधीच थांबत नसते, देशाची प्रगती सतत होतच राहील, अशी त्यांची पक्की खात्री झालेली होती. 1902 च्या

डिसेंबरमध्ये अहमदाबादला राष्ट्रीय सभेच्या (काँग्रेसच्या) अधिवेशनाच्या जोडीने भरलेल्या औद्योगिक प्रदर्शनाच्या उद्घाटनप्रसंगी बोलताना त्यांनी आपले हे विचार जाहीरपणे मांडले होते. "राष्ट्रसभेशी संबंधित अशा एका समारंभात एका संस्थानिकाची उपस्थिती हे एक धाडसीच कृत्य होते. रोमेशचंद्र दत्त यांच्या *इकॉनॉमिक हिस्ट्री ऑफ ब्रिटिश इंडिया* या ग्रंथावर आधारलेल्या त्या भाषणात ईस्ट इंडिया कंपनीची राजसत्ता हेच हिंदुस्थानच्या दारिद्र्यामागील आदिकरण होय, हा मुद्दाही त्यांनी मांडला होता. या भाषणात, एक आशियाई देश युरोपीय देशांवर कशी मात करू शकतो, हेही जपानचा दाखला देऊन त्यांनी स्पष्ट केले होते. लोकांनी तांत्रिक शिक्षण घेऊन हिंदुस्थानच्या समृद्धीला हातभार लावावा, असे त्यांनी कळकळीने सांगितले, सोन्या-चांदीच्या दागिन्यांत पैसा अडकवून ठेवण्याऐवजी तो उद्योगधंद्यात गुंतवून, अजिबात परावलंबी न राहता आपले व्यवसायधंदे उभारण्याचे आवाहन त्यांनी श्रोत्यांना केले. प्रत्येक उद्योगपती केवळ स्वसमाजासाठीच नव्हे, तर उभ्या देशासाठी झटत आहे, अशी एक व्यापक चळवळ या राष्ट्रात उभी राहिलेली पाहण्याची आपणास मनोमन इच्छा आहे, असेही सयाजीरावांनी पुढे सांगितले. भाषणाच्या अखेरीस तेथे जमलेल्या राष्ट्रनेत्यांना त्यांनी इशारा दिला की, त्यांचे अपयश हे साऱ्या देशाचे अपयश होय, असे समजण्यात येईल; म्हणून जे जे म्हणून करावयाचे, ते ते सर्व अतिशय दक्षतेने करावयास हवे. एका जागृत संस्थानिकाचे हे देशभक्तिपर उद्गार अर्थातच ब्रिटिश नोकरशाहीच्या काकदृष्टीतून निसटणे शक्यच नव्हते.

राष्ट्रीय सभेने आपल्या अधिवेशनाबरोबर अशा प्रकारे एक हिंदी औद्योगिक प्रदर्शन भरविण्याची प्रथा 1905 पासून पाडली होती. बडोद्याचे नायब दिवाण रोमेशचंद्र दत्त हे पहिल्या परिषदेचे अध्यक्ष होते. महाराज काहीसे नाखुश असताही परिषदेचे कार्यवाह रा. ब. मुधोळकर यांनी त्यांना दुसऱ्या औद्योगिक अधिवेशनाचे अध्यक्षपद स्वीकारण्याची गळ घातली. सयाजीरावांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात देशाच्या अर्थव्यवस्थेची पुनर्घटना करण्याच्या योजनेत ग्रामीण उद्योगधंद्यांकडे दुर्लक्ष होऊ न देण्याची, तसेच स्वदेशीची शपथ वाहण्याची विनंती श्रोतृवर्गाला केली. मात्र त्यांनी हेही स्पष्ट केले की गुणवत्ता आणि दर्जा यांबाबत परदेशी मालाशी यशस्वी टक्कर देऊ शकेल अशाच स्वदेशीवर आपण भर दिला पाहिजे.

आर्थिक विकासाबरोबर सामाजिक सुधारणांचे कार्यही हातात हात घालून व्हावयास हवे. सयाजीरावांनी सक्तीचे प्राथमिक शिक्षण सुरू केलेले होते; बाल-विवाहावर बंदी घातली होती आणि तशाच आणखीही कित्येक सुधारणा संस्थानात होऊ घातल्या होत्या. 1904 साली हिंदी सामाजिक सुधारणा परिषदेत भाषण करताना त्यांनी कोणकोणत्या क्षेत्रांत सुधारणा होणे आवश्यक आहे, हे स्पष्ट केले होते. स्त्रीशिक्षण, बालविवाह बंदी, जातीबहिष्कार, मादक पेयांवर बंदी, विधवाविवाहास मोकळीक, आंतरजातीय रोटीव्यवहार,

परदेशपर्यटन आणि धार्मिक निधींची व्यवस्थित यंत्रणा, बहुपत्नीकत्वावर बंदी, आदिवासी व अन्य मागासवर्गीय यांच्या परिस्थितीत सुधारणा, अशी सुधारणीय अशा क्षेत्रांची त्यांनी यादीच सादर केली होती. परकीय सत्ताधाऱ्यांविषयी लोकांमध्ये संशयाची भावना असते, तशी ती स्वकीय संस्थानिकाविषयी असत नाही, त्यामुळे समाजसुधारणेच्या बाबतीत देशी संस्थानेच अधिक योग्य कार्यक्षेत्र होत, असेही त्यांनी पुढे सांगितले. महाराजांच्या राजवटीत बडोदा राज्याने या सर्व सुधारणा जवळजवळ अमलात आणल्या होत्या. सनातनी वातावरणात लहानाच्या मोठ्या झालेल्या असूनही सामाजिक सुधारणांच्या सर्व मोहिमांत महाराणीसाहेबांनीही आपल्या पतीराजांना उत्तम साथ दिली, ही उल्लेखनीय गोष्ट होय.

राजकीय क्षेत्रात अधिक काय करता येईल ते स्पष्ट करताना देशात एक कायम 'दरबार' स्थापन करण्याची अभिनव कल्पना याच भाषणात महाराजांनी मांडली. ब्रिटिश राजकुटुंबातील एखादी व्यक्ती या 'दरबारा'च्या अध्यक्षपदी व्हाइसरॉय या नात्याने कायम राहावी, असेही त्यांनी सुचविले.

1903 साली लाहोरला दयानंद अँग्लो-वेदिक कॉलेजात भाषण करीत असताना तसेच काश्मीरमधील एका मदरशात बोलताना त्यांनी हिंदू आणि मुसलमान या दोघांचेही राष्ट्रीयत्व एकच होय, असे मत मांडले होते. केवळ युरोपीय लोकांसाठी राखीव असणारा बडोदा जिमखाना 1909 साली सर्व हिंदी लोकांसाठी खुला करण्याच्या रेसिडेंट कर्नल एम्. जे. मीड यांच्या उपक्रमाचीही महाराजांनी अतिशय प्रशंसा केली. राष्ट्रीयत्व आणि समता या संकल्पनांचा विस्तार करताना बडोदा कॉलेजमधील एका भाषणात आपण लोकशाहीच्या बाजूचे आहोत, असेही त्यांनी जाहीर केले; पण त्याचबरोबर या संकल्पनेची तर्कशुद्ध परिणती राज्यात केव्हा होईल, हे खात्रीपूर्वक आज सांगणे शक्य नाही, असेही पुढे स्पष्ट केले. लोकशाहीचा त्यांना अभिप्रेत असणारा अर्थ काय होता, यावर त्यांनी काही प्रकाश टाकलेला नाही. कदाचित लोकशाही म्हणजे सरकारबरोबरचे लोकांचे अधिकाधिक साहचर्य इतपतच अर्थ त्यांच्या मनात असावा. कारण सन 1909 पर्यंत तरी ग्रामीण जनतेला लोकशाहीचे महत्त्व आणि जबाबदाऱ्या यांची पुरेशी कल्पना आहे, असे त्यांना वाटत नव्हते, ही गोष्ट परिचितच आहे.

राष्ट्रीय सभेत दुफळी पडत असताना त्यांनी तसे प्रकट उद्‍गार काढलेले होते. 1907 सालच्या सुरत अधिवेशनात टिळकांसारख्या पुढाऱ्याच्या नेतृत्वाखाली जहाल गटाने मवाळांची पार पंचाईत केली होती. टिळकांनी मवाळ नेतृत्वावर विदारक हल्ले चढविले व ते नेतृत्व उलथून टाकले. वारे कोणत्या दिशेने वाहू लागले होते, त्याचेच हे सारे निदर्शक होते. काळाची पावले ओळखली नाही, तर इंग्रजांना तसेच हिंदी संस्थानिकांना नव्या लोकशाहीच्या जमान्यात यत्किंचितही स्थान राहणार नाही, याची पूर्वकल्पना सयाजीरावांना आलेली होती. दुसरीकडे क्रांतिकारकांच्या दहशतवादी

चळवळीचा दबाव वाढत होता आणि ती काबूत आणण्यासाठी हिंदुस्थान सरकार चांगलीच कडक उपाययोजना करीत होते व त्यासाठी सरकारने हिंदी संस्थानांचे सहकार्य मागितले होते. यासंबंधात लॉर्ड मिंटो यांनी महाराजांना 6 ऑगस्ट 1908 रोजी एक पत्र लिहिले. सदर पत्रात व्हाइसरॉय यांनी म्हटले होते की, देशी संस्थानांत राजद्रोही लोक मूळ धरू पाहत आहेत, यात बिलकूल संशय नाही. हिंदुस्थान सरकारला हे लोक तेथून त्रास देऊ शकतील, तेव्हा अशा चळवळींना पायबंद घालण्याच्या दृष्टीने आजच्या इतकी गंभीर परिस्थिती पूर्वी कधीच निर्माण झालेली नव्हती. म्हणून 'या प्रश्नाबाबत खुली व स्नेहपूर्ण वातावरणात पुरेशी चर्चा करण्यासाठी' तसेच या प्रकारच्या चळवळींचा देशी संस्थानांतून शिरकाव न व्हावा यासाठी कोणती कारवाई करता येईल, याविषयी विचारविनिमय करण्यासाठी व्हाइसरॉयसाहेबांनी महाराजांना बोलावून घेतले. त्यांच्या पत्राला 19 नोव्हेंबर 1909 रोजी सयाजीरावांनी जे उत्तर पाठविले, त्यावर ब्रिटिश नोकरशाहीच्या वर्तुळात बरेच गंभीर स्वरूपाचे आक्षेप घेतले गेले. महाराजांच्या उत्तराचा एकूण सूर असा होता की, उभयविध सरकारांचे हितसंबंध समान असल्याने एकविचाराने कारवाई करण्यात यावी, या सूचनेशी आपण पूर्णपणे सहमत आहो; पण इतर संस्थानांतून राजद्रोही चळवळी सुरू असल्याची माहिती आपणास नाही, तसेच तशी माहिती मिळविण्याचे त्यांनी स्वतः केलेले प्रयत्न यशस्वी झाले नसल्याचेही महाराजांनी हिंदुस्थान सरकारला कळविले. त्याबरोबरच 'अराजक आणि राजद्रोह' दडपून टाकण्यासाठी जे रास्त स्वरूपाचे सहकार्य व साहाय्य मागितले जाईल, ते देण्यास आपण मनोमन तयार आहोत, असेही त्यांनी स्पष्ट केले होते.

महाराजांच्या या उत्तरासंबंधीची वार्ता ताबडतोब प्रसिद्ध झाल्याने बडोदे सरकार चकितच झाले. 'टाइम्स 'च्या 27 जानेवारी 1910 च्या अंकात कलकत्त्याच्या वार्ताहराने म्हटले होते की, एका महत्त्वाच्या संस्थानिकाचा अपवाद वगळता व्हाइसरॉयसाहेबांच्या पत्राला आलेल्या उत्तरांतून अन्य संस्थानिकांनी बिनशर्त सहकार्याचे आश्वासन दिलेले आहे. अपवाद काय तो बडोद्याच्या गायकवाडांचाच. देशी संस्थानांतून राजद्रोह किती प्रमाणात फैलावला आहे, त्याची आपल्याला कल्पना नाही व देशद्रोहाविरुद्ध रास्त ते साहाय्य देण्यास आपण तयार आहो, असे मर्यादित आश्वासन त्यांनी दिल्याचे कळते, असे या वार्ताहराने म्हटले होते.

सर व्हॅलेंटाइन चिरोल ('टाइम्स 'चे तत्कालीन वार्ताहर तेच असतील काय?) यांनी आपल्या 'इंडियन अनरेस्ट' या पुढे प्रसिद्ध झालेल्या ग्रंथात याविषयी उल्लेख करून म्हटले होते की, गायकावाडांच्या उत्तरात 'फार मोठे विरोधी मतप्रदर्शन नाही, पण त्यात एक प्रकारचा थंडपणा होता, त्यामुळे राष्ट्रीय पत्रांनी त्यांची वाहवा केली–' हा उल्लेख उघडच कलकत्त्याच्या 'अमृतबझार-पत्रिका' या पत्राबाबत आहे. त्या पत्राने सरळ व धिटाईची भूमिका घेतल्याबद्दल सयाजीरावांचे अभिनंदन केले होते. परिणामी

हिंदुस्थानातील नोकरशाहीने असा निष्कर्ष काढला की, महाराजांची जहाल राष्ट्रवाद्यांना आतून फूस आहे.

टाइम्सच्या वार्ताहराने वस्तुस्थितीचा विपर्यास केलेला होता, हे स्पष्टच आहे. सयाजीरावांचे इंग्रजी चरित्रकार स्टॅन्ले राइस यांनी ही गोष्ट पुरेपूर दाखवून दिलेली आहे. महाराजांचे आणखी एक इंग्रजी चरित्रकार सार्जंट यांनी सयाजीरावांशी या प्रश्नाबाबत प्रत्यक्ष चर्चा करून एकंदर परिस्थितीसंबंधीचे त्यांचे मनोगत उघड केले आहे. सार्जंट यांनी म्हटले आहे की, "महाराजांनी काहीसे दुःखाने सांगितले की, 'राजद्रोहा'च्या काळात आपल्याला जो मनस्ताप सोसावा लागला तो मनस्ताप सुधारणाप्रिय उत्साही वृत्तीमुळे आपल्याला लाभलेल्या लोकप्रियतेचा परिपाक होता." त्याबरोबरच हेही सांगितले पाहिजे की, हिंदुस्थान सरकारमधील काही मंडळींना देशाच्या अगदी कानाकोपऱ्यांतून राजद्रोह दिसत असला, तरी सयाजीरावांना सर्वत्र हा प्रकार बोकाळला आहे, असे वाटत नव्हते; त्यामुळे हिंदुस्थान सरकाराइतकी घबराट त्यांना मुळीच वाटत नव्हती. मात्र एवढे खरे की, या सर्व प्रकरणी सयाजीरावांना आपल्या लोकप्रियतेची किंमत मोजावी लागायची ती लागलीच.

सयाजीरावांच्या पत्रामध्ये या संदर्भात जो सावधगिरीचा सूर आढळतो तो त्यामध्ये रेसिडेंटला हस्तक्षेप करता येऊ नये, म्हणून असावा. पण 1910 च्या जानेवारीत 'टाइम्स' पत्राने सयाजीरावांवर जो हल्ला चढवला होता, तो म्हणजे अल्पावधीतच त्यांना जी मानहानी सहन करावी लागली, तिची केवळ रंगीत तालीम होती.

आपल्या संस्थानात एखादा राजद्रोही कट चालू आहे की काय, ते शोधण्यासाठी, खरे तर, सयाजीरावांनी चौकशी करविली पण तीत आढळून आले की, स्वदेशीची चळवळ, गोरक्षणाचा प्रचार आणि राष्ट्रीय शिक्षणाचे प्रयोग या उपक्रमांखेरीज राज्यात कसलीच गंभीर घटना घडलेली नाही. यांपैकी शेवटच्या उपक्रमासंबंधी अधिक चर्चेची आवश्यकता आहे.

1907 साली नर्मदेच्या काठी चांदोड या गावी एक संस्था स्थापन झाली. तिच्या परिसरात गंगानाथाचे शिवमंदिर असल्याने तिला, 'श्रीगंगानाथ भारतीय सार्व विद्यालय' असे नाव देण्यात आलेले होते. हे विद्यालय श्री. केशवराव देशपांडे यांच्या प्रमुखत्वाखाली चाललेले होते आणि हे गृहस्थ अरविंद घोषांचे घनिष्ठ मित्र होते. अरविंद घोष हे एकेकाळी (1903 मध्ये) सयाजीरावांचे खाजगी चिटणीस होते. उत्तरकालात जगप्रसिद्ध कीर्तीचे योगी म्हणून प्रसिद्धीस आलेले अरविंद तेव्हा कॉलेजात प्राध्यापक असून मोठे क्रांतिकारकही होते. देशपांडे हे एक नामवंत बॅरिस्टर असून बडोदे राज्यात त्यांनी सरकारी उच्च पदावर काम केलेले होते. गंगानाथ विद्यालयात मामासाहेब फडके आणि काकासाहेब कालेलकर यांच्यासारखे तसेच पुढे नाशिक-कटाच्या खटल्यात गोवले गेलेले विठ्ठल जोशी आणि वामन दातार यांच्यासारखे शिक्षक होते. बडोदे रेसिडेन्सीला सदर

संस्थेत 'राजद्रोही' परंपरा जोपासली जात असल्याचा जो संशय आला, तो सकृद्दर्शनी तरी रास्तच होता. रेसिडेन्सीने आपले 'लाल' डोळे वटारताच बडोदे संस्थानावर काही तोहमत येण्याची शक्यता टाळण्यासाठी चालकांनी 1911 साली संस्थाच बंद केली.

लार्ड मिंटो यांनी 1909 साली अहमदाबादला जेव्हा भेट दिली, तेव्हा त्यांच्या गाडीवर एक बॉम्ब फेकला गेला. बडोदे हे अनेक क्रांतिकारकांचे गुप्त आश्रयस्थान आहे, असा त्या काळी संशय होता. बडोदे रेसिडेन्सीच्या हाती 'वनस्पतीनी दवाओ' या नावाची एक गुजराती पुस्तिका आलेली होती. बॉम्ब कसे तयार करावेत, याची माहिती देणाऱ्या या पुस्तिकेला फसवे नाव दिलेले होते. बडोदे सरकारचा एक कर्मचारी नरसिंहभाई ईश्वरभाई पटेल हा त्या पुस्तिकेचा लेखक होता. अन्य लोकांच्या साहाय्याने तो एक मुद्रणालय चालवतो, अशीही वदंता होती. अरविंद घोष यांच्या 'मुक्ति कोन पथे' 'वुइच वे फ्रीडम्' या बंगाली पुस्तकाच्या गुजराती भाषांतराच्या प्रकाशनास नरसिंहभाईच कारणीभूत होता. या वस्तुस्थितीची बडोदे प्रशासनाला नीटशी माहितीच नव्हती. ती नजरेस येताच चौकशी चालू झाली. चौकशी चालू असताना मुंबई सरकारच्या एका अधिकाऱ्याने नवसारी येथे प्रत्यक्ष धाड घालून एका विहिरीतून अरविंदकृत सदर पुस्तकाच्या गुजराती भाषांतराच्या पाचशे प्रती हस्तगत केल्या होत्या. मुंबईच्या अधिकाऱ्याचे हे कृत्य बेकायदा होते. पण संस्थानी प्रशासन त्याला प्रतिबंध करू शकत नव्हते. बडोदे सरकारने या बाबतीत पुढे आपला निषेध नोंदवला, तेव्हा मुंबई सरकारने दिलगिरी प्रदर्शित केली. परंतु रेसिडेंटच्या समाधानासाठी बडोदे प्रशासनाला नरसिंहभाईला हद्दपार करणे भाग पडले. नरसिंहभाई पुढे आफ्रिकेला गेले व तिकडून परत आल्यानंतर रवींद्रनाथ टागोरांच्या शान्तिनिकेतन या संस्थेत जर्मन भाषेचे शिक्षक झाले. सदर पुस्तक ज्या मुद्रणालयात छापले गेले, असा संशय होता, ते मेहेसाणा येथील मुद्रणालयही प्रशासनाने बंद केले.

याच काळात आणखी एक प्रकरण घडून आले व त्यात दोघा महाराष्ट्रीय व्यक्तींना गोवण्यात आले. आनंदराव व माधवराव हे दोघेजण योग्य त्या परवान्यावाचून गायकवाडी संस्थानातील दक्षिण गुजरातमधील बिलिमोरा या शहरी युगांतर नावाचा छापखाना चालवीत होते. त्याचा सुगावा लागताच प्रशासनाने त्यांचे कबुलीजबाब घेऊन त्यांच्याविरुद्ध योग्य ती कारवाई केली. या प्रकरणाचा गवगवा मात्र फार झाला.

अशा उच्चस्तरीय किंवा सामान्य स्तरीय लोकांखेरीज रेसिडेन्सीला खुद्द महाराज सयाजीरावांचाही संशय होता. अर्थात महाराजांच्या विरुद्ध असणारे आरोप तिला सिद्ध करता आले नाहीत, ही गोष्ट वेगळी. महाराजांचे जवळचे स्नेही, एक वेळचे त्यांच्या मुलांचे शिक्षक आणि आता सरकारमध्ये उच्च पदावर असणारे श्री. खासेराव जाधव यांच्याविषयीही रेसिडेंटला संशय होता. बडोदे रेसिडेन्सीच्या या 'संशयपिशाचा' च्या शोधाबाबत महाराज सदैव नाराज असत. नेहमीच्या प्रशासकीय पातळीवरील कामकाजात

हाताळण्याजोग्या घटनांचा उगाचच बाऊ केला जात असतो, असे त्यांचे मत होते. ही निव्वळ चिखलफेक चालू आहे, असे त्यांना वाटे. 'आधी एखाद्या कुत्र्याला वेडा ठरवायचे आणि मग गोळी घालायची' अशी ही रेसिडेन्सीची वृत्ती असल्याचा शेरा त्यांनी मारलेला होता.

उभय पक्षीय आरोप-प्रत्यारोपात सत्य काहीही असो, नेहमीप्रमाणे या प्रकरणीही रेसिडेंटचीच सरशी झाली. केशवराव देशपांडे आणि खासेराव जाधव यांना संस्थानी नोकरीतून काढून टाकण्याबद्दल रेसिडेन्सीने दडपण आणले. महाराजांना त्रास होऊ नये म्हणून देशपांडे यांनी आपण होऊन राजीनामा दिला. पण महाराजांनी 'ग्रॅच्युइटी' म्हणून त्यांना दहा हजार रुपये दिले. खासेराव जाधव यांची मेहसाण्याच्या प्रांतसुभा-पदावरून सर्वेक्षण व जमाबंदी आयुक्तपदी पदावनती करण्यात आली. हे सर्व घडले, त्याविषयी सयाजीराव असमाधानी होते. आपले स्नेही आणि प्रशासनातील अधिकारी यांच्या पाणउताऱ्यापेक्षा रेसिडेंटच्या सततच्या हस्तक्षेपाचा त्यांना विशेष संताप येई. जखमेवर जणू मीठ चोळण्याचा प्रकार म्हणजे संस्थानातील राजद्रोही चळवळीविरुद्ध कडक कारवाई केली जाईल, अशा आशयाची अधिसूचना काढण्याचा 'सल्ला' त्यांच्या मनाविरुद्ध त्यांना दिला गेला. पण केवल रेसिडेन्सीच्या मुर्वतीसाठी त्यांनी तशी एक अधिसूचना काढली. दुर्दैवाने याच काळात कॉबसारखा रेसिडेंट होता व त्याला 'संशय पिशाचा'चा शोध घेण्यात सक्रिय रस होता. त्या काळात रेसिडेन्सीबरोबर झालेल्या महाराजांच्या पत्रव्यवहारावरून असे दिसते की, राष्ट्रीय भावनेविषयीच्या जिव्हाळ्यापेक्षा विपक्षीयांकडून अपेक्षित अशा 'अज्ञाता 'च्या भयाने सयाजीराव अधिक चिंताकुल झालेले होते. त्या काळी दिवाणपदी सी.एन्. सेडनसारखा इंग्रज गृहस्थ असूनही त्यांची ही चिंताकुलता यत्किंचितही कमी झाली नाही. रेसिडेंटचे पूर्ण समाधान करणे हे सेडनलाही शक्य झाले नाही. रेसिडेंटने सरळ सरळ दिवाणाला सांगितले की, हे संस्थान ब्रिटिश सरकारविरोधी असून त्यातले एक-चतुर्थांश ते एक-तृतीशांश प्रजाजन राजद्रोही वृत्तीचे आहेत. या विधानाने दिवाणालाही अगदी धक्काच बसला; कारण त्यात दुसरे काही नाही तरी अक्षम्य अतिशयोक्ती होती. पण त्या आरोपाचे दिवाणाने पूर्णांशाने खंडणहं केले नाही; अर्थात त्याचे कारण म्हणजे तो आरोप खंडण करण्याजोगताही नव्हता. रेसिडेंटबरोबर कसलाही वाद खेळण्याची इच्छा नसल्याने आपले उत्तर अगदी त्रोटक होते, असे सेडनने नमूद करून ठेवले आहे. संस्थानातल्या मुद्रणविषयक कायद्यात काही पळवाटा राहिलेल्या आहेत, हे दिवाणाला माहीत होते आणि व त्या कायद्यात दुरुस्ती करण्याच्या दृष्टीने काम चालू झालेले होते. पण काही प्रमाणात तो इंग्रज दिवाणसुद्धा रेसिडेंटच्या म्हणण्याशी सहमत होता काय ? 1912 साली लॉर्ड लॅमिंग्टनना लिहिलेल्या पत्रात सयाजीरावांनी अशी तक्रार केली होती की, मंडळाने हद्दपार केलेल्या नरसिंहभाई पटेलखेरीज दुसऱ्या कोणा व्यक्तीविषयीची तक्रार माझ्या कधीच नजरेस आणण्यात

आलेली नव्हती.

महाराजांनी कोणताही खुलासा सादर केला असला, तरी राजद्रोहाच्या या वावटळीच्या काळात, अन्याय झाल्याने असो वा अन्य प्रकारे असो, त्यांनी आपल्या राजनिष्ठेविषयी संशय घेण्यास वाव दिला होता आणि रेसिडेंट कॉब हा तर बडोदे, बडोद्याचा राजा आणि त्याचे प्रशासन या सर्वांविषयी कसलीही स्नेहभावना न बाळगणारा होता. ब्रिटिशांच्या सरकारी गोटाने 'राजद्रोह्यांचे आश्रयदाते' असाच शिक्का सयाजीरावांवर मारलेला होता व बडोदे संस्थान हे क्रांतिकारकांचे गुप्त आश्रयस्थानच आहे असे त्या गोटाचे ठाम मत होते.

अशा पार्श्वभूमीवरच सयाजीरावांच्या जीवनावर दाट काळी छाया टाकणारा आणखी एक प्रसंग घडून आला व त्यामुळे त्यांना आत्यंतिक मानसिक त्रास सहन करावा लागून त्याच्या विदारक स्मृती तदुत्तरकालातही रेंगाळत राहिल्या. हा प्रसंग म्हणजे 1911 च्या डिसेंबरमध्ये घडून आलेले दिल्ली-दरबार-प्रकरण! पाचच महिन्यांपूर्वी किंग जॉर्ज यांनी त्यांचे बकिंगहॅम पॅलेसमध्ये स्वागत केले होते आणि तदनंतर चिमणाबाईसाहेब वैद्यकीय उपचारार्थ जर्मनीत गेल्या होत्या. त्या वेळच्या तेथील निवांत वास्तव्यात एस्.एन. मिश्रा यांच्याशी विचारविनिमय करून चिमणाबाईनी 'दि पोझिशन ऑफ वुइमेन इन इंडियन लाइफ' या ग्रंथाचे काम पूर्ण केले. प्रसिद्धीनंतर त्या ग्रंथाचे उत्तम स्वागत झाले होते. तेव्हा या वर्षाच्या अखेरी अखेरीस काहीएक विपरीत घटना घडून येईल, असे राजदांपत्याच्या स्वप्नातही आले नसेल.

दिल्ली-दरबार-प्रकरणाच्या समग्र तपशीलात न शिरता एवढेच सांगता येईल की, बादशहा व राणीसाहेब यांच्याकडे पाठ फिरवून शाही पाहुण्यांचा जाणूनबुजून अपमान करणे तसेच राणीसाहेबांपुढे न वाकून त्यांच्याविषयी योग्य ती आदरभावना प्रकट न करणे, असे आरोप सयाजीरावांवर करण्यात आले होते. पुन्हा एकदा लंडनच्या टाइम्स पत्राने बोचक भाष्यासह ही वार्ता ठळकपणे प्रसिद्ध केली. इंग्लंडमधील इतर राष्ट्रीय पत्रांनी तो धागा पकडून महाराजांविरुद्ध खोट्या आरोपांचे पद्धतशीरपणे जाळे विणण्याची एक मोहीमच सुरू ठेवली. ज्यांना महाराजांविषयी पूर्वी काहीच माहिती नव्हती, त्यांनाही आता खुद्द बादशहांचाही अपमान करणारा एक राजा म्हणून मात्र माहिती झाली. अनेक वृत्तपत्रांनी अनेक प्रकारे तिखटमीठ लावून निरर्थक तसेच अतिशयोक्त अशी महाराजांच्या 1905 पासूनच्या कार्याची माहिती प्रसिद्ध केली. एका वृत्तपत्राने म्हटले होते, "असे म्हणतात की, अनेक हिंदी अतिरेकी चळवळे बडोद्याचे आहेत किंवा त्या संस्थानच्या नोकरीत आहेत; इतकेच नव्हे तर तसे लोक खुद्द गायकवाडांच्या घराण्यातही आहेत. स्वामीनिष्ठ संस्थानिकांवर शिवराळ हल्ले चढवीत असताना हिंदी जहाल वृत्तपत्रे जाणीवपूर्वक बडोद्याचा अपवाद करीत असतात. महाराज आणि लब्धप्रतिष्ठित व प्रगल्भ बुद्धीची महाराणी या उभयतांनी 1910 च्या युरोपच्या सफरीमध्ये, हिंदुस्थानात खुनांची

उघड उघड प्रचार मोहीम उघडणाऱ्या श्यामजी कृष्णवर्मांशी आणि मादाम कामांशी संबंध ठेवण्यास यत्किंचित मागेपुढे पाहिले नाही." या पत्रात पुढे असेही म्हटले होते, "बडोद्यात सरकारी अधिकाऱ्यांच्या आश्रयाखाली चालणारे एक मुद्रणालय सापडले असून त्याच्यामार्फत राजद्रोही साहित्याचा प्रसार खूप मोठ्या प्रमाणावर होत असतो. ब्रिटिश सरकारच्या पोलिसांना संस्थानी अधिकाऱ्यांनी केलेले एतत्संबंधीचे साहाय्य अत्यंत थंडे होते."

पॅरिस येथील *टेम्पस्* पत्रातसुद्धा ही बातमी झळकली व गायकवाडांनी ब्रिटिश सत्तेबद्दलचा आपला तिरस्कार कधीच लपवून ठेवलेला नाही. असा त्या बातमीत आरोपही केलेला होता.

गायकवाडांनी हा जो जाणूनबुजून अविवेकीपणा दाखविला आणि स्वतःवर जी नामुष्की ओढवून घेतली, ती एक त्यांना झणझणीत इशारा ठरो, अशीही आशा ब्रिटिश वृत्तपत्रांनी प्रदर्शित केली होती.

टाइम्स ने सूचित केल्याप्रमाणे आपली गायकवाडांशी केव्हाही भेट झालेली नसल्याचा खुलासा श्यामजी कृष्णवर्मा यांनी त्याच पत्रात प्रसिद्ध केला. पण 1912 सालच्या जानेवारीमध्ये लंडनमधील काही सचित्र वृत्तपत्रांनी दिल्ली दरबारची चित्रे छापल्यावर आगीत तेलच ओतल्यासारखे झाले. बदनामीची ही मोहीम पार्लमेंटचे एक सदस्य केर हार्डी यांच्या 'पायोनियर' पत्रातील लेखामुळे खुद्द भारतात येऊन थडकली.

या प्रसंगीचे हे सारे प्रकरण म्हणजे पराचा कावळा करण्याचाच एक प्रकार होता, हे निराळे सांगण्याची आवश्यकता नाही. सयाजीरावांविरुद्ध करण्यात येणारे आरोप बेलगाम होते व त्यांच्या वागण्याला खोडसाळ हेतू चिकटवले गेले होते. वास्तविक कौटुंबिक अस्वास्थ्यामुळे, एक तर महाराजांची मनःस्थिती थाऱ्यावर नव्हती, त्यामुळे हा प्रकार घडून आलेला होता. दुसरे असे की, दरबारातील कार्यक्रमाची आगाऊ माहिती देण्यात आली तेव्हा महाराज जातीने हजर नव्हते, त्यांनी आपल्या बंधूंना पाठविले होते. शिवाय, दरबारात काय करावयाचे आहे, याची कल्पना रेसिडेंटसुद्धा देणार होता; पण त्याने ती तशी दिली नव्हती. दरबारात महाराज जेव्हा बादशहांपुढे वाकले आणि पाठीमागे जाऊ लागले, तेव्हा एका खांबाशी ते अडखळले, पुढे काय करावे हे ध्यानात न आल्याने भांबावले आणि प्रमुख पाहुण्यांकडे त्यांची पाठ झाली. तेव्हा हे वर्तन म्हणजे मुद्दाम केलेला अपमान असणे कधीच शक्य नव्हते. महाराजांच्या हातून घडलेल्या चुकीबद्दल सर्वत्र चर्चा चालू आहे आणि त्यांच्याकडून माफीची अपेक्षा करण्यात येत आहे, हे दुसऱ्या दिवशी गोपाळ कृष्ण गोखल्यांकडून कळेपर्यंत आपल्या हातून काही गंभीर चूक घडली आहे, याची महाराजांना खरोखर कल्पनाही नव्हती. तेव्हा गोखल्यांकडून ती गोष्ट ऐकल्यावर महाराज आश्चर्यचकित झाले होते. वृत्तपत्रीय मोहीम हितसंबंधी लोकांकडून जादा भडकविण्यात आलेली होती. त्या काळी महाराजांसंबंधी जे काही

म्हटले वा लिहिले गेले, ते खरे असेल, तर सयाजीराव हे त्या काळातील एक सर्वांत धैर्यशाली पुरुष म्हणून गणता येतील, असे मत व्हाइसरॉयसाहेबांचे बंधू व्हिन्सेंट हार्डिंग्ज यांनी व्यक्त केले होते. परिणामांची तमा न बाळगता बलाढ्य ब्रिटिशांशी उघडपणे संघर्ष करणाऱ्या या देशी राजाला खरोखर शूरच म्हटले पाहिजे ! पण हे काही खरे नव्हते. सार्वभौम सत्तेशी महाराजांचे मतभेद होते. आपले स्थान व प्रतिष्ठा यांविषयी त्यांच्या स्वतःच्या काही खास कल्पना होत्या. त्यांची काही गाऱ्हाणी अवश्य होती; पण तेवढ्यासाठी आपले राजपदच पणाला लावण्याइतके ते दुधखुळे खचितच नव्हते. वरिष्ठ सत्तेचे सामर्थ्य आणि तिची उपद्रव देण्याची ताकद यांची त्यांना चांगली जाण होती. उद्‌भवलेले वाद किती टोकापर्यंत ताणत न्यावयाचे आणि केव्हा दैवावर हवाला ठेवून स्वस्थ बसावयाचे, हेही त्यांना चांगलेच अवगत होते. ते जसे आदर्शवादी तसेच व्यवहारवादीही होते. म्हणून त्यांच्यावर केल्या गेलेल्या आरोपाच्या बाबतीत ते पूर्णपणे निर्दोष होते, असा निष्कर्ष काढण्यास हरकत नाही. व्हाइसरॉयसाहेबांना एक पत्र लिहून त्यांनी आपली भूमिका स्पष्ट केली होती. 16 डिसेंबर रोजी प्रसिद्ध झालेल्या प्रस्तुत पत्रात 'राजसिंहासन आणि व्यक्तिशः बादशहा यांच्या बाबतीतली आपली नेकी आणि निष्ठा अगदी बावनकशी' असल्याचे महाराजांनी आश्वासन दिलेले होते. सदर पत्र म्हणजे 'सपशेल माफी 'च होय, असे काही ब्रिटिश वृत्तपत्रांनी म्हटले होते. पुढे लवकरच वादळ शमले आणि जनतेची स्मृती अल्पजीवी असल्याने या क्षुल्लक घटनेसंबंधीच्या सर्व गोष्टी विस्मृतीत गेल्या. पण महाराजांच्या मनावर मात्र या घटनेचा कधीही पुसला न जाणारा असा व्रण कायमचा राहिला.

या 'राजद्रोही' राजाने लोकांना जबाबदार असणारे असे प्रशासन देताना मात्र भिन्न प्रकारचा मुखवटा धारण केला. पहिल्या महायुद्धाच्या काळात सन 1916 मध्ये देशातील राष्ट्रीय चळवळीबरोबर राहण्याच्या हेतूने बडोदे प्रजामंडळाची स्थापना करण्यात आली. अशा प्रकारे या तिसऱ्या सयाजीरावांच्या राजवटीत बडोदे संस्थानाच्या इतिहासात एक नवा अध्याय सुरू झाला. त्याच वर्षी व्ही. पी. माधवराव हे जुन्या पठडीतील दिवाणही निवृत्त झाले. आणि जणू नव्या मनूचे पहिले प्रतिनिधी म्हणून त्यांच्या जागी मनूभाई मेहता आले. विवेकाने हाताळणी केली नाही, तर ही नवी संस्था धोकेबाजही ठरू शकेल, याची नोंद नव्या प्रशासनाने घेतली. विठ्ठलभाई पटेलांसारखे एक थोर राष्ट्रीय नेते प्रजामंडळाला प्रारंभीच मार्गदर्शक म्हणून लाभले. अर्थात यामुळे प्रशासन थोडेफार धास्तावलेच. जबाबदार सरकारच्या मागणीबाबत शासनाने प्रजामंडळाशी नेहमी दुटप्पी धोरण अंगीकारले. स्वतंत्र वृत्तीच्या आपल्या सेवेतील अधिकाऱ्यांना प्रजामंडळाच्या कामात सहभागी होण्यास प्रशासनाने मनाई केली; पण त्याचबरोबर मंडळाच्या नेत्यांना विश्वासात घेण्याचा मात्र प्रयत्न सुरू ठेवला. प्रामुख्याने शेतकरीवर्गाचा समावेश असणारी खेडूत-प्रजामंडळ नावाची आणखी एक संघटना सन 1918 मध्ये स्थापन झाली. या

संघटनेचा पहिल्या संस्थेशी तसा संबंध नव्हता; मात्र या उभय संघटनांचे ऐक्य होऊ नये अशी खबरदारी शासनाने घेतली.

वार्ता आणि मतप्रचार यांना प्राधान्य देणारे 'नव गुजरात' नावाचे वृत्तपत्र 1923 साली सुरू झाल्यावर प्रजामंडळाच्या कार्याला जोर चढला. तदनंतर प्रजामंडळापैकी 'संतप्त तरुणां'नी चळवळीचे नेतृत्व स्वतःकडे घेतले आणि प्रदीर्घ संघर्षाची तयारी केली. जबाबदार सरकारची सतत वाढती अशी ही मागणी अंशतः पुरी करण्याच्या दृष्टीने मनूभाईच्या शासनाने काही पावले उचलली. महाल-पंचायतींतर्फे निवडून येणाऱ्या सभासदांचे प्रमाण निम्म्यावरून दोन-तृतीयांशपर्यंत वाढविण्यात येऊन अप्रत्यक्ष निवडणुकीने येणाऱ्या सदस्यांचे प्रमाण कमी करण्यात आले. मागे एकदा उल्लेख केल्याप्रमाणे पंचायतीच्या विविध टप्प्यांवरील तसेच नगरपालिकांतील अध्यक्षपदे निवडणुकीने भरण्याचा प्रयोग याच काळात सुरू झाला होता, पण तो पुढे बंद करण्यात आला. व्हिलियर-प्रकरण म्हणून ओळखल्या जाणाऱ्या घटनेने सर मनूभाईची कारकीर्द मध्येच संपुष्टात आली नसती, तर क्रमाक्रमाने जबाबदार सरकार प्रस्थापित करण्याच्या उपक्रमाचा अधिकाधिक विस्तार झालाही असता. या व्हिलियर-प्रकरणी, कोळशाच्या खाणीत नुकसानीत आणणारी गुंतवणूक केल्यामुळे सयाजीरावांना जबरदस्त तोटा सहन करावा लागला होता. सर मनूभाईंच्या अधिकाराविषयी वाढत्या वयानुसार मत्सर वाटू लागलेल्या महाराजांना मनूभाईंची घटनाविषयक प्रगतिशील मते नापसंत असण्याचीही शक्यता होती.

दरम्यान राज्यात घडणाऱ्या घटनांवर महाराज नाराज होते. स्थानिक स्वराज्य-संस्था स्थापन करून आपण आपल्या प्रजेला पुरेसे अधिकार बहाल केले आहेत, असे सयाजीरावांना वाटे. शिवाय, ते अधिकार लोकांनी न मागता दिले गेले होते, हे विशेषच होते. हीरक महोत्सवी समारंभात मिळालेल्या अनेक मानपत्रांना महाराजांनी जी उत्तरे दिली, त्यांतून जबाबदार सरकारच्या मागणीबद्दलची त्यांची तीव्र नाखुशी अगदी उघड झालेली दिसून येते. जबाबदार शासनाची मागणी करण्यासाठी वा त्याचा वापर करण्यासाठी अवश्य असणारी तयारी अद्याप आपल्या प्रजेच्या ठायी नाही, असे त्यांना वाटत होते. योग्य वेळ येताच स्वतः होऊन त्या मागणीचा आपण जरूर विचार करू, असे ते म्हणत असत. पण हे म्हणणे म्हणजे, एक प्रकारे, मागणीबाबत कालहरण करण्याचाच प्रकार होता. कसेही असो, ही मागणी मान्य करण्याची पाळीच महाराजांवर आली नाही, हे खरे; पण त्यांच्या त्या उतारवयात या प्रश्नावरील संघर्ष होण्याचा दिवस फारसा दूर नाही, हे त्यांना स्पष्ट दिसू लागले होते.

1930-31 मध्ये आपल्या सर्व वैशिष्ट्यांसह राष्ट्रीय चळवळ आपल्याही संस्थानात खदखदू लागल्याचे त्यांना आढळून आले. धारासभेवर निवडून आलेल्या सदस्यांवर राजीनामे देण्याचे प्रसंग आले. हिंदू-मुसलमानांत नव्हे, तर गुजराती आणि महाराष्ट्रीय

यांच्यामध्ये दंगल उसळली. 1939 सालच्या जानेवारीत सरदार वल्लभभाई पटेल यांच्या आगमनप्रसंगी हा प्रकार घडून आला. हा गलिच्छ प्रकार बडोदे संस्थानच्या तोपर्यंतच्या धवल कीर्तीवरील कलंकच समजला जातो. या वेळी जीवनाच्या अंतिम प्रवासासाठी प्रस्थान ठेवून निघालेले महाराज बेशुद्धावस्थेतच होते. अर्थात त्यामुळे त्यांना दुःख होण्याचा प्रश्नच नव्हता. इतके असूनही अत्यंत प्रगतीशील आणि उदारमतवादी देशी संस्थान म्हणून हिंदुस्थानच्या मान-चित्रात बडोद्याला महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले ते सयाजीरावांमुळेच होय, यात तिळमात्र शंका नाही.

सहा

# उपदेशक राजा

आपल्या त्रेसष्ट वर्षांच्या प्रदीर्घ, घटनासंपन्न आणि सोद्दिष्ट अशा कारकीर्दीत स्वगत चिंतन प्रकट करण्याचे सुखदु:खाचे अनेकानेक प्रसंग सयाजीरावांवर त्यांच्या जगभरच्या रहिवासात येऊन गेले. विशिष्ट वेळी व विशिष्ट स्थळी आपल्या मनात काय विचार चालले होते, ते त्यांनी कित्येकदा स्पष्ट केले आहेत. त्यांच्या चरित्रग्रंथांतून यासंबंधी भरपूर माहिती मिळते. पण शेवटी चरित्रग्रंथ म्हटले तरी त्यांना अंगभूत अशी मर्यादा असतेच व त्यांचाही उद्देश विशिष्ट असतो. "जीवनातील नानाविध समस्यांबाबत ज्या तत्त्वांनी एखाद्या व्यक्तीची उद्दिष्टे स्पष्ट केली असतील आणि त्या व्यक्तीच्या दृष्टिकोनावर परिणाम केलेला असेल, त्या तत्त्वांचा खाजगी आणि सार्वजनिक भाषणांतून त्या व्यक्तीने जो आविष्कार केलेला असेल, त्या आविष्काराशी विश्वासार्हता आणि आंतर्मुखता या दृष्टींनी कोणतेही चरित्र बरोबरी करू शकणार नाही" असे जे म्हटले गेले आहे, ते रास्तच आहे. महाराजांना एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात हिंदुस्थानात एक महत्त्वाचे स्थान निर्विवाद प्राप्त झालेले होते व त्यांच्या शब्दालाही महत्त्व दिले जात होते. त्यांना निरनिराळ्या प्रसंगी भाषणे करण्यासाठी बोलावण्यात येई, यालाही एक कारण होते. त्यांची बुद्धी आणि भावना ही दोन्ही चांगली दमदार होती. त्यांचे आस्थाविषयही व्यापक होते; त्यांच्या भाषणात विचारांचा प्रसन्न, मनमोकळा आणि नेमका आविष्कार होत असे. त्यांचे वक्तृत्व छाप पाडणारे, आवाज गोड घुमाऱ्याचा आणि अभिव्यक्ती मनाला सरळ सरळ भिडणारी असे. ते, पुष्कळदा असेल ते स्पष्टपणे बोलून टाकीत. आपल्या राज्याच्या कारभारात उद्‌भवणाऱ्या घटना व सामोरी येणारी आव्हाने यांवर ते मोठ्या जाणकारीने व परिणामकारकपणे प्रकाश टाकीत असत. सरकारी समारंभाची संधी साधून आपण अमलात आणलेल्या उपाययोजनांचे उद्दिष्ट कोणते आहे, याची ते वाच्यता करीत व त्या दिशेने कुठवर पल्ला गाठता येईल, हेही ते स्पष्ट करीत, अशा अधूनमधून केलेल्या सिंहावलोकनाने त्यांच्या योजनांची प्रजाजनांना व शासनालाही माहिती होत असे. 'बडोदे आज करते, ते हिंदुस्थान उद्या करील', असे नेहमी म्हटले जाई. हे असे घडे, याचे कारण आपल्या बडोदे राज्यात जुन्या तसेच नव्या उभय

विश्वांचा प्रभाव पडावा, असा सयाजीरावांचा सतत प्रयत्न असे. बडोद्यातील योजना प्रथम सयाजीरावांच्या मनात साकार होत आणि नंतर बडोद्यातील परिस्थितीशी अनुरूप अशा रीतीने जुळवून घेऊन त्या अमलात आणल्या जात. महाराजांना यात नेहमीच यश मिळे, असे नाही; मात्र त्यांचे ध्येय कधीच निम्न पातळीवरचे नसे. राज्याच्या बोधचिन्हावर (कोट ऑफ आर्म्स) *'जिन घर जिन तक्त'* असे बोधवाक्य कोरलेले असे आणि आजही ते तसेच आहे. 'घोड्यावरचे खोगीर हेच घर आणि हेच सिंहासन' असा त्याचा अर्थ आहे. महाराज देश-विदेशात कोठेही असोत, त्यांच्या मनात बडोदे राज्याचाच विचार असे. शिवाय त्यांच्या ठायी 'चिंतन आणि कळकळीची भावना' हे उभय गुण होते. ही देणगी फार थोड्यांच्या वाट्यास येते. बाह्यतः क्षुल्लक वाटणाऱ्या बाबीपासून तो अत्यंत महत्त्वाच्या समस्येपर्यंत सतत गतिशील व जागृत असणारे ते एक उपदेशक राजे होते. तेव्हा त्यांचे व्यक्तिमत्त्व नीट समजावून घेण्यासाठी त्यांच्या मनोव्यापारात व चिंतनविषयांत जरा खोलवर डोकावणे अवश्य आहे. असे न केल्यास त्यांच्याविषयीची आपली समज अपुरी राहील.

सुदैवाने सयाजीरावांची भाषणे ग्रंथरूपाने जतन केलेली आहेत. 1877 ते 1938 पर्यंतच्या कालखंडातील त्यांच्या निवडक दोनशे भाषणांचे संगतवार संपादन आल्बन विजरी, केनेथ सॉंडर्स आणि सी. ई. न्यूहॅम यांनी केलेले असून ती चार खंडांत प्रसिद्ध झालेली आहेत. त्यांच्या भाषणाविषयांचा आवाका चकित करणारा आहे. त्यांच्या विचारांची आणि आस्थाविषयांची कक्षाही अशीच विस्तृत आहे. 1927 ते 1934 या दरम्यानच्या भाषणांतूनसुद्धा 'प्रगतिशीलता आणि कर्तव्यनिष्ठा' याचा सुखद मेळ आढळून येतो. त्यांची भाषा आणि आविष्कारपद्धती मृदुमवाळ असे. भाषणातले विचार व शब्दकळा या दोहोतही सुबोधता असे. वय आणि अनुभव वाढत गेल्यावर विश्लेषणाची, विवरणाची आणि प्रदीर्घ भाषणे करण्याची गरज वाटू लागली. आणि 'सर्वांत महत्त्वाची गोष्ट' म्हणजे जे राज्य अगदी कोवळ्या वयात त्यांच्या हाती आले, त्या राज्यातील उदासीनता, सुस्तपणा आणि एकंदर मागासपणा यांच्याशी मुकाबला करण्याची आवश्यकता त्यांना मनोमन वाटू लागली.

सयाजीरावांच्या भाषणांची गुजराती व मराठी भाषांतरेही उपलब्ध आहेत. प्रो. ए.एक्स. सोआरिस यांनी त्यांच्या निवडक भाषणांचा एक संग्रहही संपादित केलेला आहे. भाषणे गुजराती, मराठी किंवा हिंदी कोणत्याही भाषेतली असोत, प्रथम ते ती इंग्रजीत लिहून काढीत आणि नंतर मग त्या त्या विशिष्ट भाषांतून त्यांचे भाषांतर करवून घेण्यात येई, असे सांगतात. इंग्रजी भाषेचे स्वयंशिक्षण त्यांनी किती कसून केलेले होते आणि आपल्या भाषणांवर ते किती कसोशीने मेहनत घेत, याचेच ते निदर्शक होय.

वारंवार चर्चिल्या जाणाऱ्या विषयांपेक्षाही काहीशा आडवळणी, पण जीवनात दृढमूल असणाऱ्या विषयांबाबतच्या त्यांच्या विचारांवर पुढील पृष्ठांमध्ये दृष्टिक्षेप टाकण्याचा

यत्न केला आहे. 1890 पूर्वीची त्यांच्या नावावरील भाषणे त्यांची स्वतःची नसावीत, अशी अटकळ आपण निर्धास्तपणे बांधू शकतो. अगदी प्रारंभीची भाषणे तर सर टी. माधवराव महाराजांच्या वतीने वाचून दाखवीत असत यावरूनही या अटकळीला बळकटी येते.

1892 साली लॉर्ड मेयरने मेजवानी दिली, त्या प्रसंगी त्यांनी 'हिंदुस्थान आणि वसाहती' या विषयावर भाषण केले आणि मृत्युपूर्वी दोनच वर्षे आधी म्हणजे 1937 साली साम्राज्यदिनानिमित्त झालेल्या भोजनसमारंभाच्या प्रसंगी ब्रिटिश राष्ट्रकुलाच्या शुभचिंतनार्थ (टोस्टला उत्तर म्हणून) त्यांनी भाषण केले. पहिल्या भाषणात त्यांनी म्हटले होते, "वसाहतींना तसेच आपल्या अमलाखालील देशांना जबाबदार राज्यपद्धतीच्या हक्कांचे वरदान देऊन ब्रिटिश राष्ट्राच्या उपजतच्या उदार आणि प्रगमनशील स्वभावाला पूर्ण वाव दिल्यास, ते इष्ट ठरणार आहे." 1937 साली नवीन घटनेच्या कायद्यावर त्यांनी संमिश्र प्रतिक्रिया व्यक्त केली होती. ते म्हणाले होते, "राष्ट्रकुलातील एक स्वतंत्र व स्वायत्त राज्याच्या आपल्या ध्येयाच्या दिशेने टाकलेले एक पाऊल म्हणून हा कायदा स्वागतार्ह असला, तरी माझ्या देशबांधवांना याहून द्रुत गतीने आणि व्यापक प्रमाणावर सुधारणा झाली असती, तर अधिक आवडली असती." जवळजवळ पंचेचाळीस वर्षांचा प्रदीर्घ कालखंड लोटूनही विचारांचे हे सातत्य आपणास खचितच नवलाईचे वाटेल.

'सुधारलेल्या आणि सुसंस्कारित समाजाला विचारांच्या बाबतीत जी मनमोकळी आणि सहृदय देवाणघेवाण आवश्यक असते ती मिळून व तिच्याद्वारे समाजात माणुसकीला स्थान मिळून एकंदर सुसंवाद साधण्याची' गरज त्यांना वाटत असे. 1899 साली सयाजी विहार क्लबचे उद्‌घाटन करताना त्यांनी ह्या मुद्द्यावर विशेष भर दिला होता.

एकाच वर्षाने म्हणजे 1900 मध्ये दुष्काळ निवारक उपाययोजना म्हणून ओरसंग नदीवर बांधलेल्या पाणीपुरवठ्याच्या प्रकल्पाचे उद्‌घाटन केले गेले. कारण संस्थानाची दुष्काळी परिस्थितीने जी दैना उडविली होती, तिच्यामुळे महाराजांचे मन कमालीचे कष्टी झालेले होते. तरीसुद्धा एकंदर परिस्थितीचा विचार करून त्या प्रसंगी त्यांना सांगावेसे वाटले की, 'दारिद्र्य ही हिंदुस्थानातली महान वस्तुस्थिती आहे.' पण 'ती काही प्रमाणातच नैसर्गिक आहे; पण काही प्रमाणात, सध्या आढळणारा सच्च्या काटकसरीचा, उत्साहाचा आणि रास्त आकांक्षेसाठी लागणाऱ्या धाडसाचा अभाव, आणि काही प्रमाणात हावरी स्वामीत्व भावना, दैववाद आणि महान आपत्तीतसुद्धा बेपर्वाईने स्वस्थ राहण्याची प्रवृत्ती यांचा तो परिपाक आहे' असे त्यांना वाटत होते. त्यांचे हे विचार अप्रिय वाटणारे असले, तरी सयाजीरावांनी आपल्या आंतर्भेदक दृष्टीने सत्य जाणलेले होते, हे मात्र खरे.

'राष्ट्रीय जीवनातील विविध टप्पे आणि सर्जनशील साहित्याची व त्याच्या समीक्षेची निर्मिती यांमधील घनिष्ठ नाते' ध्यानात घेणे आवश्यक आहे, असा उपदेश त्यांनी

ग्रंथ-संपादक मंडळीच्या सदस्यांना 1901 सालच्या एप्रिलमध्ये केला होता. आणि मद्रास येथील कॉलेज कुमारांना 'आपल्या देशबांधवांशी सौजन्याने वागा, सत्यावर निष्ठा ठेवा आणि आपल्या धर्मावर व देशावर प्रेम करा,' असा उपदेश करून ते पुढे म्हणाले होते, 'हे सर्व करण्यामुळे तुम्ही आज अपेशी ठरलात, तरी आजच्या पिढीत नाही, तरी अधिक मोकळ्या व उदार वातावरणात वाढलेल्या भावी पिढीतील कोणीतरी तुमचा हुतात्मे म्हणून खचितच गौरव करील.' परकी सत्तेने देशात जे गुदमरून टाकणारे वातावरण निर्माण केले होते, त्याचा चातुर्याने उल्लेख करण्यात सयाजीरावांनी मोठेच धैर्य दाखविले, असे म्हणता येईल. सदर भाषण 1902 च्या सप्टेंबर महिन्यात झालेले होते.

त्याच वर्षी अहमदाबाद येथे औद्योगिक प्रदर्शनाचे उद्‌घाटन करताना सयाजीरावांनी 'कृतीस्वातंत्र्य, समान संधी व एक महान राष्ट्रीय वृत्तीचा बंधुभाव' वाढीस लावण्याची आवश्यकता प्रतिपादन केली. अल्पसंख्य या नात्याने मुस्लिमांच्या हितसंबंधांच्या संरक्षणासाठी काहीतरी रास्त तडजोड निघाली पाहिजे, असे त्यांचे मत होते. 1903 च्या सप्टेंबरात लाहोर येथील इस्लामिया कॉलेजात मुस्लिम श्रोतृवर्गापुढे बोलताना त्यांना सांगितले की, माझा प्रस्तुतचा हा दृष्टिकोन आजकाल लोकप्रिय ठरणारा नसला, तरी तोच खरोखर रास्त आहे, याची खात्री वाटते. हेच सूत्र पुढे चालवून लाहोरच्या आर्य समाजाच्या सभासदांना त्यांनी 1903 च्या ऑक्टोबरात स्मरण करून दिले, 'दुर्दैवी, तर्कहीन' अशा जातीभेदात्मक संस्थेने जेवढा अपाय केला आहे आणि जेवढे अपरिमित नुकसान केलेले आहे, तेवढे दुसऱ्या कोणत्याही संस्थेने केलेले नाही.' त्या वेळी त्यांनी केलेली अन्य काही विधाने समाजाच्या सदस्यांना तितकीशी रुचणारी नव्हती. नृत्यांगनांच्या नाचगाण्याच्या सामुदायिक कार्यक्रमांना आर्य समाजाचा जो विरोध असतो, त्याला उल्लेखून ते म्हणाले की, असे मेळे असायला हरकत नाही. मनोरंजनाचा आणि मनोविनोदनाचा निरामय आनंद देणाऱ्या या संस्था आहेत. म्हणून त्या पूर्णपणे बंद करणे योग्य ठरणार नाही. लोकांना आवडतात, म्हणूनच त्यांचे अस्तित्व आहे. स्त्रीसमाजाशिवाय मानवजातीचे चालण्यासारखे नाही.' त्यांनी पुढे असेही सांगितले की, 'आपल्या घरोघरी संगीत विद्येचा प्रवेश घडवून अनीतीला परिणामकारकपणे आळा घालता येईल.' स्वमतानुसार कृती करण्याचा आणि शक्यतो कमी बोलण्याचाही त्यांनी आर्य समाजी मंडळींना सल्ला दिला. ब्रह्मचारी, साधू आणि संन्याशी यांनी आपली दयाबुद्धी आणि सामर्थ्य सत्कार्याकडे खर्च केले, तर खूप काही साधता येईल, असेही ते म्हणाले. याच धर्तीच्या गुजरातमधील एका समाजाला त्यांना 1911 साली सल्ला दिला होता की, कडक टीकेपेक्षा सहानुभूतीमुळेच सुधारणा घडून येत असल्यामुळे संपूर्ण विरोधी भूमिकेचा आपण त्याग केला पाहिजे.

1909 साली देशातील राजकीय चळवळीला वेग आला होता. त्या संदर्भात हिंदी विद्यार्थ्यांच्या ध्येयधोरणासंबंधी बोलताना (सप्टेंबर 1909) बडोदे महाविद्यालयाच्या

विद्यार्थीसमुदायाला त्यांनी सांगितले, "राजकीय असंतोषाची भावना निर्माण होण्यास केवळ शिक्षणप्रसार जबाबदार होय, असे केव्हा केव्हा सांगितलेले आपण ऐकतो. असंतोष ही गोष्ट सर्वथा अनिष्टच असते, असे नाही. कारण शिक्षणाने लोकांचे विचार अधिक प्रगल्भ झाले आणि सुशिक्षित लोकांच्या मनात उच्च आकांक्षा साकारू लागल्या आणि त्या पुऱ्या करून घेण्याचे प्रयत्नही ते करू लागले की, वर्तमान स्थितीविषयी असंतोष हा निर्माण होणारच." याच संदर्भात त्यांनी म्हटले, 'अराजक व हिंसाचार यांचा धोका पूर्णतः दूर करावयाचा तर या गोष्टींचा खरा अर्थ साक्षेपाने जाणून घेण्याचा आणि मूलभूत कारणांचे दक्षतेने निराकरण करण्याचा प्रयत्न केला पाहिजे.' तीन वर्षांनी याच महाविद्यालयात बोलताना सयाजीराव म्हणाले की, स्वतःसंबंधी, कुटुंबासंबंधी व राष्ट्रासंबंधी अशा त्रिविध जबाबदाऱ्या तरुणांवर असतात.

1909 च्या सप्टेंबर महिन्यामध्ये पुण्यात डिप्रेस्ड क्लास मिशनने आयोजिलेल्या सभेत बोलताना त्यांना लावलेला 'निराश्रित' (डिप्रेस्ड) हा शब्द आपल्याला स्वतःला पसंत नाही व आजची आपली स्थिती त्यांना सुधारायची की नाही, हे त्यांच्या स्वतःच्या परिश्रमांवर अवलंबून आहे, असे महाराजांनी सांगितले. जगाच्या पाठीवर कोणत्याही देशामध्ये निराश्रित वर्गासाठी अशा प्रकारची संस्था आढळून येणार नाही, असेही मत त्यांनी व्यक्त केले.

1911 च्या एप्रिलात बॉम्बे सॅनिटरी असोसिएशनपुढे भाषण करताना ते म्हणाले, "आरोग्यरक्षणावर नुसती भाषणे देणारे कित्येक सुशिक्षित लोक आढळून येतात; पण आरोग्यरक्षणार्थ उपाययोजना करण्यावर खर्च करण्याचा प्रश्न आला की त्याला मात्र त्यांचा विरोध असतो. कारण या गोष्टीचे महत्त्व कळण्याइतके अद्याप आपले लोक पुरेसे शिक्षित नाहीत, असे त्यांचे म्हणणे असते. पण लोकांत शिक्षणाची वाढ व्हावी, यासाठी पुन्हा ही मंडळी काहीच करीत नाहीत."

जगातील वांशिक समस्यांबाबत कोणते धोरण असावे, ते दिग्दर्शित करताना, लंडन येथे सन 1911 मध्ये भरलेल्या पहिल्या जागतिक वंशविषयक परिषदेमध्ये सयाजीराव म्हणाले, "मानवजातीचे प्रश्न नवीन नाहीत; तसेच ते सहजासहजी सुटणारेही नाहीत. आणि त्यांपैकी एक सर्वांत मोठा प्रश्न सर्व वंशांना आणि सर्व लोकांना समान आहे. तो म्हणजे विचारविश्व आणि भावनाविश्व यांच्यामध्ये समतोल साधणे, हा होय."

या विचारसूत्राचे प्रत्यक्ष उदाहरण देण्याचाच प्रसंग 1911 च्या ऑगस्टमध्ये एक प्रकारे योगायोगानेच महाराजांकडे चालून आला. लंडनमधील पहिले हिंदी कौन्सिलर सर कृष्ण गोविंद गुप्ता यांच्या सन्मानासाठी भरलेल्या सभेत त्यांना बोलण्याची संधी मिळाली. ते म्हणाले "देशी हिंदी संस्थानिकांनी मोठ्या संख्येने युरोपीय लोकांच्या नेमणुकी आपापल्या संस्थानातून केलेल्या असून त्याचा संबंधित प्रशासनांना चांगला लाभ होत असतो, तद्वतच कार्यक्षमतेच्या कसोटीवर उतरणाऱ्या हिंदी लोकांची

प्रशासनातील जोखमीच्या आणि मानाच्या जागांवर ब्रिटिश-हिंदी प्रशासनाने नेमणूक न करण्यात तादृश काही कारण दिसत नाही."

गुजराती साहित्याच्या विकासार्थ झटणाऱ्या गुजराती साहित्य परिषदेपुढे 1912 सालच्या एप्रिलमध्ये सयाजीरावांचे भाषण झाले. त्या वेळी 'सर्जनशील प्रतिभेतून स्फुरणाऱ्या विचारांपेक्षा पढिक शैलीतील किंवा सुंदर सुंदर भाषेतील लेखनाला उत्तेजन देण्याविरुद्ध' त्यांनी सावधगिरीचा इशारा दिला. हिंदुस्थानातील विविध भाषांसाठी एकच समान लिपी स्वीकारणे कितपत शक्य आहे, याचाही विचार व्हावा, असे त्यांनी सांगितले. जीवनात यशस्वी झालेल्या व्यक्तींची चरित्रे तरुण वर्गासाठी प्रसिद्ध करणे व 'इतर राष्ट्रांतील उत्तमोत्तम विचारधन आपलेसे करता यावे' म्हणून अन्य भाषांतील अभिजात साहित्याचे आपल्या देशी भाषांतून भाषांतर करणे या सूचनांचाही विचार व्हावा, असे त्यांनी सांगितले.

ग्रंथालयांच्या उपयुक्ततेसंबंधी बोलताना ते म्हणाले होते, "मनाची पुरेशी मशागत न झाल्याने देवाने आपणांस दिलेल्या अनेकानेक सौख्यांना आणि संधींना आपण मुकत असतो. आपल्या सर्व कार्यप्रवृत्तींचा विकास होत नाही. आपण या कार्यप्रवृत्तींना जोपासले पाहिजे व इतरांना तसे करावयास शिकविले पाहिजे. ग्रंथालयांची गरज यांसाठीच असते."

'परिवर्तन' ही मानवी मनाची मूलभूत प्रवृत्ती आहे, याची सयाजीरावांना उत्तम जाण होती. हिंदी सामाजिक विचारांत आणि चालीरीतीत होणाऱ्या परिवर्तनाची दखल घेण्याचे अनेक प्रसंग त्यांना आले. 1915 च्या जानेवारीत सयाजी विहार क्लबच्या सभासदांना त्यांनी सांगितले की, सर्वच युरोपीय शिष्टाचारांचे वा चालीरीतींचे आंधळे अनुकरण करण्याची आपणास मुळीच गरज नाही; आपल्या राष्ट्रीय जीवनाला उपयुक्त आणि पोषक ठरतील, अशाच गोष्टी आपण घेतल्या पाहिजेत. त्याच ठिकाणी तीन वर्षांनंतर ते म्हणाले, "हिंदुस्थानात क्लबपद्धतीच्या जीवनाचे महत्त्व सामान्यतः नीटपणे समजून घेतले जात नाही. आपले लोक 'क्लबानुकूल' नाहीत. अर्थातच बडोद्याची स्थिती मात्र तशी नाही." आणखी एका प्रसंगी, बहुधा अधिकारीवर्गापुढे (एप्रिल 1917) 'सेवेची प्रतिष्ठा' या विषयावर भाषण करताना त्यांनी आग्रहाने सांगितले होते, "धनी आणि सेवक या उभयतांनीही हे लक्षात ठेवले पाहिजे की, उत्तम रीतीने पार पडलेले कोणतेही काम कमी प्रतीचे वा लाजिरवाणे नसते."

काही वृत्तपत्रांतून होणाऱ्या मत्सरी प्रचाराचे महाराजांना वारंवार बळी व्हावे लागले. वृत्तपत्रांच्या साह्यकारी वा उपद्रवकारी सामर्थ्याविषयी बोलताना महाराज 1923 साली म्हणाले, "असत्य वार्ता, वैयक्तिक हल्ला, विषारी टीका आणि पक्षपाती प्रचारमोहीम या गोष्टींमुळे ती समाजाला नीतिभ्रष्ट बनवितात. अशा वेळी 'ती सर्व समाजाचे किंवा लोकांच्या एकूण विचारांचे प्रतिनिधित्व करीत नसून काही हितसंबंधी व्यक्तींचेच व्यक्तिगत विचार मांडीत असतात, हे ध्यानात ठेवण्याची आवश्यक ती काळजी आपण

घेतली पाहिजे. भय वा लोभ यांची क्षिती न बाळगता आपले स्वतःचे स्वतंत्र मत बनविणे आवश्यक आहे."

धर्म आणि तत्त्वज्ञान यांचे व्यावहारिक आकलन आणि मनोमन आस्था सयाजीरावांइतकी फारच थोड्या लोकांना होती. ते गूढवादी आध्यात्मिक नव्हते, खरेखुरे धार्मिक होते. त्यांना हिंदू धर्मामध्ये सुधारणा घडवून आणावयाची होती, तो नष्ट करावयाचा नव्हता. हिंदी तत्त्वज्ञान काँग्रेसपुढे 19 डिसेंबर 1927 रोजी मुंबई येथे बोलताना भारतीय तत्त्वज्ञानविषयक विचारांचे सातत्य टिकविण्याची आवश्यकता त्यांनी आवर्जून प्रतिपादन केली. सर्वसाधारण हिंदी लोकांच्या बौद्धिक वारसाचा भाग म्हणून आजही टिकून असलेल्या प्राचीन भारतीय तत्त्वज्ञानातील विचारांचा खरा अर्थ आणि त्यांचे खरे मूल्य यांचा शोध भारतीय लोकांना आपल्या या भूमीतच अधिक समाधानकारक रीतीने घेता येण्यासारखा आहे, असा त्यांना विश्वास होता.

बडोदा-संगीत-परिषदेचे उद्‌घाटन करताना ते भारतीय तत्त्वज्ञानाकडून भारतीय संगीताकडे वळले (मार्च 1929). 'संगीताने जीवनात माधुर्य व सौंदर्य प्राप्त होते. हृदयाला पाझर फोडण्याचे तसेच वीरवृत्तीला चेतना देण्याचे सामर्थ्य संगीतात असते' असे त्यांना वाटत असे. आज भारतीय संगीत, नृत्य व नाट्य यांचे शिक्षण देणाऱ्या विद्यालयाचे मूळ केंद्र म्हणून बडोद्यात संगीत शाळा स्थापन झाली, ती महाराजांच्या या विचारसरणीतूनच. त्यांनी आपल्या 'कलावंतखान्या'त प्रख्यात भारतीय संगीतज्ज्ञाच्या नेमणुकी केल्या होत्या. युरोपीय संगीतालाही त्यांनी प्रोत्साहन दिले. आठवड्यातील ठरलेल्या दिवशी सार्वजनिक उद्यानांतून ते संगीत नियमितपणे वाजविले जात असे.

सहकाराची भावना आणि चांगले शिष्टाचार या गोष्टी एकमेकांना पूरक असल्याने त्यांच्या बाबतीत महाराज जागरूक असत. आपल्या राज्यातील अधिकारीवर्गासमोर या विषयांवर बोलण्याचा मोका त्यांना अनुक्रमे 28 मार्च व 7 एप्रिल 1930 या दिवशी लाभला. सहकारभावना ही मिलाफ घडवून आणणारी, संबंध दृढ करणारी व निर्मितीक्षम अशी शक्ती आहे. शिष्टाचार हे कारडे, कंटाळवाणे व गुंतागुंतीचे वाटले, तरी त्यामुळे त्यांचे म्हणून काही महत्त्व आणि गोडवा आहेच, असे त्यांना वाटत असे. चांगल्या चालचर्येवर मानवी जीवित खरोखर आधारलेले असते. 'ही चालचर्या भ्रष्ट झाली की जीवनाचा इमलाच धोक्यात येतो.'

हिंदुस्थानच्या राज्यघटनेचा विचार करण्यासाठी 1930-31 साली भरलेल्या गोलमेज परिषदेला सयाजीराव भारताचे प्रतिनिधी म्हणून गेले होते. तेथे त्यांनी आपली मते धिटाईने मांडली. 12 नोव्हेंबर 1930 रोजी परिषदेत बोलताना ते म्हणाले, "ब्रिटिश शासनाने खूप काही केलेले आहे; तरीपण अद्याप कितीतरी अधिक करावयाचे राहिलेले आहे! राजकीय व आर्थिक, नैतिक व सामाजिक अशा सर्वच दृष्टींनी हिंदुस्थानची पुनर्रचना करण्याची गरज आहे. प्राचीन परंपरेशी प्रामाणिक राहून आणि लोकांना मर्दानी

वृत्तीची आणि राष्ट्रीय ऐक्याची उत्तम जाणीव राहील, अशा रीतीने ही पुनर्रचना होणे अगत्याचे आहे."

महाराजांची आकलनशक्ती आणि विनोदबुद्धी तीव्र होती, असे नमूद केले गेलेले आहे. 21 मार्च 1933 रोजी पुण्यातील टिळक मंदिरात विविध संस्थांतर्फे झालेल्या सत्काराच्या वेळी त्यांनी जे भाषण केले, त्याची सुरवात अशी होती. "बंधुभगिनींनो, सूर्यास्त होत असल्याने प्रकाश मंदावत चालला आहे. मी तुम्हा सर्वांना नीट पाहू शकत नाही. तुमची विविध शिरस्त्राणे, विविध तऱ्हेचे पेहराव पाहून विविधरंगी फुलांनी बहरलेल्या उद्यानाकडे पाहण्याचा आनंद मला लाभत आहे !"

किती सुंदर उपमा ! – आणि तीसुद्धा हलक्या-फुलक्या सुरात !

1933 मध्ये त्यांनी आपले धर्मविषयक विचार एकूण दोन वेळा मांडलेले आढळतात. एप्रिलमध्ये पुण्यातच खरा धर्म कोणता आणि धर्मभोळेपणा कोणता, असा प्रश्न त्यांनी स्वतःच उपस्थित केला, हिंदुस्थानात अनेक धर्म असल्याने हा प्रश्न समर्पकही ठरतो. जीवनासाठी सामर्थ्याची गरज सर्वांनाच असल्याने ते ती शोधीत असतात; पण काहींना या बाबतीत प्रमाणाचे आणि समतोलाचे भान राहत नाही, असे त्यांनी ठामपणे सांगितले, म्हणून आपल्या लोकांनी इतर धर्मांचाही अभ्यास करावा आणि जेथे जेथे म्हणून चांगले विचार आणि ध्येयदृष्टी आढळेल, तेथून तेथून त्या गोष्टी स्वीकाराव्यात, अशी इच्छाही त्यांनी प्रकट केली. लोकशाहीच्या संकल्पनेशी धर्म कसा विसंवादी नाही, ते सांगताना शिकागोच्या दुसऱ्या जागतिक धर्मपरिषदेत ('पार्लमेंट' मध्ये) 27 ऑगस्ट 1933 रोजी ते म्हणाले होते, "लोकशाही म्हणजे सर्वसामान्य माणसाचा तसेच त्याच्या हक्कांचा उदय, असाही तिचा अर्थ करता येतो." तेव्हा मागासवर्गातील लोकांनी आपणासही जगात स्थान लाभावे, अशी मागणी करण्यात अस्वाभाविक असे काहीच नाही. तद्वतच पूर्वेस आणि पश्चिमेस 'जुलूमजबरदस्ती आणि थापेबाजी' यांना नेहमी आव्हान दिले जाते; कारण त्यामुळे हक्कांना नाट लागत असतो. धर्माने युद्ध, हाव आणि पिळवणूक यांचे निर्मूलन केले पाहिजे, दारिद्र्य व बेकारीसारख्या आजच्या ज्या महान समस्या आहेत, त्यांच्या मुळावरच धर्माने प्रहार केले पाहिजेत अशी इच्छा त्यांनी व्यक्त केली.

21 जुलै 1933 रोजी लंडनच्या ईस्ट इंडिया असोसिएशनने केलेल्या सत्कारप्रसंगी भारतमंत्री सर सॅम्युअल होअर यांच्या उपस्थितीत हिंदुस्थानच्या घटनात्मक रचनेमधील नियोजित बदलाबाबत अधिक विस्तारपूर्वक बोलण्याची संधी सयाजीरावांना मिळाली. आपल्या सार्वजनिक जीवनाच्या पंचावन्न वर्षांच्या अनुभवाच्या आधारे बोलत असताना सयाजीरावांनी या भाषणात व्यक्तिगत सूर लावला. हक्क आणि कर्तव्ये या उभय बाबींची जाणीव ठेवून 'वैफल्याविना संघराज्य, वर्चस्वाविना विकास' साधण्याची मागणी त्यांनी पुढे मांडली. हे जणू एक ब्रीदवाक्य असून ते सदैव ध्यानात बाळगले पाहिजे, असे त्यांचे मत होते. ते पुढे म्हणाले, "राष्ट्रकुल म्हणजे स्वतंत्र झालेल्या लोकांची

भागीदारी" होय. म्हणून राष्ट्रकुलातील स्वयंशासित हिंदुस्थानची उभारणी अशा व्यापक व खोल पायाभरणीवरच झाली पाहिजे."

बडोदा येथे 27 डिसेंबर 1933 रोजी सातव्या हिंदी प्राच्यविद्या परिषदेचे उद्‌घाटन त्यांच्या हस्ते झाले. त्या वेळी बोलताना महाराज म्हणाले, "आम्हा भारतीयांना आपला स्वतःचा इतिहास चांगला अवगत असला पाहिजे; पण त्याच्या यथार्थ आकलनासाठी समग्र आशियाई इतिहासाचा एक भाग म्हणून त्याचा अभ्यास झाला पाहिजे, शिवाय संस्कृतीसंकर कसे घडले, तसेच पूर्वेकडे व पश्चिमेकडे अनेक वंशीय लोकांनी केलेल्या स्थलांतरामुळे निर्माण झालेले संस्कृतीसंघर्ष आणि घडून आलेले संस्कृतीसमन्वय यांचीही माहिती आपण करून घेतली पाहिजे."

मुंबई येथील एका कन्याशाळेतील समारंभात 2 फेब्रुवारी 1934 रोजी बोलताना, माणसाला कोणत्या प्रकारची पत्नी हवी असते, हा व त्यासारखेच इतर प्रश्न त्यांनी स्वतःच उपस्थित करून त्यांची उत्तरे दिली. "यच्चायावत गोष्टी नवे रूप धारण करीत आहेत, अशा इतिहासातील नाट्यमय टप्प्यावर आज आपण उभे आहोत, व्यापक स्वरूपाच्या मोठ्या गोष्टी आणि घरगुती छोट्या गोष्टी या अलग न राहता आज त्यांची घट्ट निरगाठ बसत आहे." पुढे या संदर्भात त्यांनी हिंदुस्थानातील स्त्रियांच्या वाट्याला फक्त काबाडकष्ट कसे आले आहेत यांचे उदाहरण दिले. त्या केवळ काबाडकष्ट करणाऱ्या बनू नयेत, म्हणून त्यांचे कष्ट आणि मेहनत वाचविणारी साधने आपण तयार केली पाहिजेत, असे त्यांनी प्रतिपादन केले. ते पुढे म्हणाले, "आपण ज्याला साधेपणा म्हणतो तो किती खर्चिक असतो पाहा - नुसते जेवण तयार करायचे तर स्त्रियांना चिकाटीने तासन् तास खर्ची घालावे लागतात! स्वयंपाकाकडे दुर्लक्ष करावे असे नाही. पण आपणास आपल्या कन्या आणि पत्नी कशा प्रकारच्या असायला हव्यात, याचाही आपण विचार करावयास हरकत नाही. पोरेबाळे, स्वयंपाक आणि धर्म यांच्यापुरतेच स्त्रीचे जग मर्यादित असावे, असे कैसरचे मत होते; असे तर काही आपणाला नको आहे. पण त्याचबरोबर स्वयंपाक, स्वच्छता व साफसफाई या गोष्टी टाळायचीही आपली इच्छा नाही. आधुनिक चळवळीने परस्परविरोधी अशी दोन टोकेच निर्माण केली आहेत. बिनतक्रार मान तुकवावयास सांगणाऱ्या सीतेच्या आदर्शापलीकडे जाण्याची आपली इच्छा असून बौद्धिक व आध्यात्मिक दृष्टी खरी सहचरी ठरू शकणाऱ्या पत्नींच्या वा मातांच्या शोधात आपण सध्या आहोत." भाषणातील काहीशा विस्तृत अशा या अवतरणावरून महाराजांचे भारतीय स्त्रीजीवनाविषयीचे विचार चांगले स्पष्ट होतात.

माणसाचे पूर्वग्रह आणि स्थितीशील सुस्तपणा यांच्या विघातक शक्तीची त्यांना जाणीव होती; म्हणूनच शिक्षण म्हणजे नुसती माहिती किंवा ज्ञान देणे नव्हे; तर चारित्र्य घडविणे, उत्तम चालीरीती अंगी बाणविणे, शहाणपणा वाढीला लावणे होय, या गोष्टीची जाणीव त्यांनी 15 जानेवारी 1934 शिक्षणतज्ज्ञांना दिली. एखाद्या ऐतिहासिक थोर

व्यक्तीकडे लोकांनी पूर्वग्रहरहित दृष्टिकोनातून पाहिले पाहिजे, हेही त्यांनी सांगितले. 8 मार्च 1934 रोजी बडोद्यात शिवाजीमहाराजांच्या पुतळ्याचे अनावरण करताना त्यांनी म्हटले होते, "हे खडबडीत व्यक्तिमत्त्व वादंगाच्या धुराळ्यातच गवसले होते; पण आपण त्यांना देवत्वही बहाल करू नये किंवा 'डोंगरचा उंदीर' अथवा 'विश्वासघातकी' अशीही त्यांची संभावना करू नये. खरोखर, आपली मातृभूमी आणि कर्तव्य यांच्याविषयी भक्तिप्रेमाची ज्योत आपल्या मनात प्रज्वलित ठेवली पाहिजे." आणखी एका प्रसंगी, 19 मार्च 1934 रोजी ते म्हणाले, "मानवाला जडलेली स्थितीशील सुस्ती जबरदस्त आहे. मानव प्राणी पुष्कळदा अत्यंत क्रूर आणि मूर्ख बनतो. स्वातंत्र्याचे माहेरघर असणाऱ्या अथेन्सने आपल्या थोर सुपुत्राची हत्या केली. इस्राएल या प्रेषितांच्या देशाने अनेकानेक प्रेषितांना यमसदनाला पाठविले आहे." म्हणूनच प्राणिसंग्रहालयात गेल्यावर माकडापुढे हॅट काढून नम्र होत माणसांच्या वतीने त्यांची माफी मागणाऱ्या बर्नार्ड शॉविषयी त्यांना आत्मीयताच वाटली. सयाजीरावांनी इतिहासाचे वाचन डोळसपणे केलेले होते.

दिल्लीत भरलेल्या हिंदी साहित्यसंमेलनाच्या तेविसाव्या अधिवेशनात 24 मार्च 1934 रोजी बोलताना आपल्या भाषणाची सुरवातच त्यांनी अशी केली : "हिंदुस्थानला ताबडतोब एक समान भाषा हवी आहे, याविषयी युक्तिवादपूर्वक प्रतिपादन करण्याची गरज नाही. भाषिक तट हा आपल्या राष्ट्रीय दौर्बल्याचा एक फार मोठा घटक आहे." भारतात पुढे जो इतिहास घडून आला, त्याने या विधानाची सत्यता पटवून दिलीच आहे. सदर भाषणात महाराजांनी या प्रश्नाकडे पाहण्याच्या दोन विचारप्रणालींची चर्चा केली होती. दक्षिणेकडून येणारा विचारप्रवाह इंग्रजीचा पुरस्कार करतो, तर उत्तरेकडचा हिंदीची भलावण करतो. यास्तव प्रत्येक हिंदी माणसाला त्रिभाषी होण्याची गरज आहे. एक भाषा ही त्याच्या घरगुती व सामाजिक जीवनासाठी, दुसरी भाषा सार्वजनिक व आंतरप्रांतीय आदानप्रदानासाठी, तसेच तिसरी, आपल्या जीवनाशी मुळीच संबंध नसणारी इंग्रजी भाषाही त्याला येणे अवश्य आहे. महाराजांनी याखेरीज तिसऱ्याही भाषेची जोड हवी असे सांगितले. 'हिंदू असेल तर त्याने संस्कृत आणि मुस्लिम असेल तर त्याने अरेबिक वा पर्शियन' शिकायला हवी, आपल्या वाङ्मयीन वारशापासून तुटून पडावयाचे नसेल, तर या भाषांची आवश्यकता आहेच. उत्तर हिंदुस्थानातील दोन-तृतीयांश लोकांची समान भाषा होण्याची हिंदीची क्षमता सयाजीरावांनी ओळखली होती. पण आपल्या नैसर्गिक सावधपणाला धरून त्यांनी सांगितले की, इंग्लंडशी आणि पाश्चात्त्य जगताशी संबंध राखण्यासाठी इंग्रजी भाषा ही शिकलीच पाहिजे. ही सूचना करताना त्यांच्यासमोर दोन गोष्टी असाव्यात : पहिली गोष्ट म्हणजे इंग्रजी भाषा केवळ बुद्धिजीवी वर्गासाठी असेल, बहुसंख्य लोक ती शिकणार नाहीत. दुसरी गोष्ट अशी की, परक्या भाषेचा सतत वापर केल्याने प्रायः न्यूनगंडाची भावना निर्माण होते. आणि मग 'भाषाविषयक सहज-दारिद्र्याने संकरयुक्त आणि बाटगे वाक्प्रचार प्रचलित होतात आणि भाषेचा

उत्स्फूर्तपणा आणि सौंदर्य नष्ट होते." शिवाय 'ज्या गोष्टीमुळे राष्ट्रीयत्वाची भावना हिरावली जाते, ती गोष्ट गुलामी वृत्तीही वाढवीत असते.' म्हणून त्यांनी सुचविले की, सुंदर आणि डौलदार हिंदी भाषा आपणा सर्वांची भाषा व्हावी. "पण तिच्या स्वरूपाची व्याख्या आपण दक्षतेने केली पाहिजे." देवनागरी लिपीतील हिंदी ही सार्वत्रिक राष्ट्रभाषा मानण्यात यावी. पण उत्तर हिंदुस्थानातील मुस्लिम बोलतात, त्या उर्दूचाही परामर्श घेतला गेला पाहिजे, अशी त्यांची इच्छा होती. थोडक्यात सांगायचे तर त्यांना संस्कृतनिष्ठ हिंदी नको होती, जिला 'हिंदुस्तानी' म्हणून म्हटले जाते, ती हिंदी त्यांना अभिप्रेत होती.

यापूर्वी दोन दिवस आधी, ते अगदी भिन्न अशा विषयावर बोलत होते. बडोद्यात भरलेल्या पुष्पप्रदर्शनाचे त्यांनी उद्घाटन केले होते. तेथे ते म्हणाले, "निसर्ग हे असे एक सुखकारक स्थान आहे की जेथे कोणीही वाटसरू दुःखाचे चटके बसत असतानाही आणि उन्हाची दाहक झळ लागत असूनही आराम करू शकतो." सयाजीराव हे निसर्गाच्या औदार्याचे आणि सौंदर्याचे गीत गाणारे कवीच व्हायचे; पण कोठेतरी चूक झाली. दुसऱ्या एका संदर्भात 23 डिसेंबर 1935 रोजी ते म्हणाले होते, "शारीरिक सौंदर्य हे निसर्गाचे देणे असते; पण शारीरिक स्वास्थ्य स्वतःच्या बळावर कमावता येते."

1937 सालच्या मे महिन्यात हिंदुस्थानची घटनात्मक प्रगती आणि राष्ट्रकुलातील त्याचे स्थान या गोष्टींबाबत विस्ताराने चर्चा करण्याची संधी महाराजांना इंग्लंडमध्येच दोनदा मिळाली. इतिहासाची गती निश्चित व्हावी, अशा विचारांचे, भावभावनांचे आणि आकांक्षांचे अदृश्य प्रवाह गेली साठ वर्षे मी अलिप्तपणे पाहत आलो आहे, असे त्यांनीच म्हटलेले आहे, सध्या हिंदुस्थानात हे प्रवाह जेवढ्या जोराने वाहत आहेत, तेवढे ते अन्य कोठेही वाहत नाहीत. प्रदीर्घ काळच्या शांततेनंतर देश खडबडून जागा होत असून तो चैतन्याने नुसता सळसळतो आहे. तो आता कोणत्या दिशेने वाटचाल करील?" सयाजीरावांनी, न चाचरता, 14 मे 1937 रोजी. स्वतःच या प्रश्नाचे उत्तर दिले आहे; "राजकीयदृष्टया तो ब्रिटिश राष्ट्रकुलातील एक स्वायत्त घटक म्हणून आपले सर्वोच्च स्थान गाठण्याच्या दृष्टीने व सामाजिकदृष्ट राष्ट्रकुलाशी अविभक्तपणे निगडीत असणारे ध्येय गाठण्याच्या हेतूने म्हणजेच स्वातंत्र्याला सुव्यवस्थेने लाभलेले पूर्णत्व आणि सुव्यवस्थेला स्वातंत्र्याने लाभलेले पूर्णत्व प्रस्थापित करण्याच्या दिशेने तो वाटचाल करील". "ब्रिटिश राष्ट्रकुलाचा एक समाधानी सदस्य" असा हिंदुस्थान "पूर्व आणि पश्चिम यांच्यामध्ये कोणताही संघर्ष होऊ नये, म्हणून खबरदारीचे एक प्रभावी साधनच ठरेल." पुढे त्यांनी इशारा दिला, "त्याला तसे स्थान देण्यास विलंब झाल्यास ते मात्र घातक ठरेल."

मृत्यूपूर्वी जवळजवळ एक वर्ष अगोदर, बडोद्यामध्येच 22 जानेवारी 1938 रोजी हिंदुस्थान, ब्रह्मदेश, सिलोन व अफगाणिस्तान या देशांच्या पाचव्या रोटरी परिषदेत भाषण करताना 'स्वतःपेक्षा सेवा प्रथम' या त्यांच्या बोधवाक्याची सयाजीरावांनी मीमांसा

केली होती. 'जॉन मोर्ले यांच्या एका फारशा परिचित नसलेल्या वचना'ची त्या वेळी त्यांना आठवण झाली. त्या ब्रिटिश मुत्सद्याने म्हटले होते, "श्रेय कुणाला मिळते याचा विचार माणसाने केला नाही, तर त्याच्या हातून अद्‌भुत कल्याणकारी गोष्टी घडून येतील." मौजेची गोष्ट म्हणजे या प्रसंगी सयाजीरावांनी बडोद्यातील आपल्या त्रेसष्ट वर्षांच्या प्रदीर्घ घटनासंपन्न आणि प्रयोजनयुक्त राजवटीचा अभावितपणे आढावा घेतला. अर्थात त्यांची राजवट कोणालाही अभिमान वाटावा, अशीच होती.

सयाजीराव हे विश्वव्यापक व्यासपीठावरून शिक्षण देणारे व उपदेश करणारे असे जवळ जवळ एक फिरते विद्यापीठच होते; पण त्याचबरोबर जीवनाच्या शाळेत एखाद्या विद्यार्थ्यासारखे ते शिकतही होते. या दृष्टिकोनातून महाराज म्हणजे जगातले एक उल्लेखनीय विद्यार्थीरूप शिक्षक ठरतात.

# उपसंहार

सर सयाजीराव, तिसरे, हे इंग्रजी, गुजराती व मराठी अशा अर्ध्या डझनाहून अधिक चरित्रग्रंथाचे नायक ठरलेले आहेत. या चरित्रकारांपैकी कोणी, एक तर त्यांच्या सेवेत तरी होते किंवा त्यांचे स्नेही तरी होते. एकदा आपले चरित्र लिहिण्यासाठी महाराजांनी स्वतःच सेंट निहालसिंग यांची अधिकृतपणे नेमणूक केली होती; पण ती योजना अमलात आली नाही. तेव्हा त्यांचे चरित्रकार एक तर त्यांच्या खूपच प्रभावाखाली असणारे किंवा त्यांच्या स्नेहभावाने तरी प्रेरित झालेले असेच होते. त्यामुले ते एखाद्या भावनेने भारलेले किंवा पक्षपाती होते. या प्रत्येकाच्या चरित्राला स्वतःचे असे एक मोल असले, तरी त्यातले प्रत्येक चरित्र कमी-जास्त प्रमाणात संकुचित दृष्टिकोनाने डागाळलेले आहे. अर्थात या गोष्टीचे आश्चर्य वाटण्याचेही कारण नाही. तिसऱ्या सयाजीरावांचे जीवन विविधरंगी आणि व्यक्तिमत्त्व खूपच व्यामिश्र होते, तेव्हा अशा व्यक्तीच्या सर्वच पैलूंना गवसणी घालून यथायोग्य न्याय देता येणे अशक्य आहे. जे त्यांच्या सहवासात आले आणि ज्यांना मुळातच लेखनाची आवड होती, अशांनाच त्यांच्याविषयी लिहिण्याची प्रेरणा मिळालेली दिसून येते. एखाद्या अद्‌भुत परीकथेसारखे, त्यांच्या जीवनकहाणीला अंगभूत असे आकर्षण आणि मोहकता होती. समकालीन बहुचर्चित व वादग्रस्त विषयांच्या तडाक्यात सापडल्यानेही त्यांना आपली भूमिका सुस्पष्टपणे पुढे मांडली जाण्याची गरज वाटली असावी आणि त्यामुळेही ते चरित्रविषय बनले असावेत. त्यांच्या काही चरित्रांमधून अशा तऱ्हेच्या समर्थनाकडे कल असल्याचे स्पष्ट जाणवतेही. शिवाय पाश्चात्त्य जगतात आपली एक विशिष्ट प्रतिमा निर्माण व्हावी, अशीही गरज त्यांना भासलेली दिसते. त्यांच्या इंग्रजी चरित्रांमधून पाश्चात्त्यांना रुचेल असे त्यांचे चित्रण केलेले अनेकदा आढळून येते. त्यांच्या जीवनाच्या हरेक पैलूवर प्रखर प्रकाश पडावा, अशा साधनांच्या राशी अगदी जतन करून ठेवलेल्या आहेत; त्या चरित्रकाराला सहजोपलब्ध आहेत; मग त्या चरित्रलेखनामागे हेतू कोणताही असो. त्यांच्या चरित्रकारांपैकी काही स्वतंत्र बुद्धीने लेखन करणारे असतीलही; पण इतर काही चरित्रे ही पुरस्कृत परप्रेरित किंवा आदेशानुसार लिहवून घेतलेली अशीच आहेत. लेखकाचे म्हणणे ग्राह्य मानल्यास 'लाइफ ऑफ सयाजीराव, थर्ड, महाराजा ऑफ बरोडा' हे स्टॅन्ले राइस यांनी दोन खंडांत

लिहिलेले उत्तम चरित्र आदेशानुसार किंवा मुद्दाम लिहवून घेतलेले नाही. फक्त संबंधित साहित्य लेखकाला उपलब्ध करून देण्यात आलेले होते. राइसने ठासून म्हटले आहे, "मी लिहिलेल्या चरित्रातील एक ओळही महाराजांनी पाहिलेली नाही." मात्र त्याचा ग्रंथ 1931 मध्ये प्रसिद्ध झाला व चरित्रनायक पुढे आणखी आठ वर्षे जगले. अर्थात तेवढा काळ या चरित्रग्रंथात आलेला नाही.

एक व्यक्ती आणि एक राज्यकर्ता या उभय दृष्टींनी सयाजीरावांचे चरित्र खरोखर भारून टाकणारे आणि चित्तवेधक आहे. गैरकारभाराची बजबजपुरी माजलेल्या संस्थानचा कारभार त्यांना हाती घ्यावा लागला आणि तोही तुलनेने अगदी कोवळ्या वयात. त्यांना अगदी कोऱ्या पाटीवर जणू प्रारंभ करूनच पुष्कळ गोष्टी शिकाव्या लागल्या. अर्थात कधी कधी तेही फायदेशीरच ठरते. त्यांना आपल्या नव्या मातोश्री आणि भगिनी यांच्यावर प्रेम करावे लागे आणि आपल्या खऱ्या आप्तांना फारसे भेटताही येऊ नये, असा प्रकार होता. यामुळे बडोद्यातील नवे जीवन त्यांना पुष्कळच त्रासदायक झाले असणार. कवळाण्याला असताना ते अगदी मुक्त होते; आपल्याला वाटेल तसे वागू शकत होते, 'अमूक कर, तमूक करू नको' असे सांगणारे तेथे फारसे कोणी नव्हते! आता अनेक लोकांचा दिवसरात्र भोवती गराडा पडलेला. सर्वांचे लक्ष्यकेंद्र सयाजीराव. शिवाय 'हे करा', 'ते करू नका' असे सांगणारी जागरूक वडीलधारी मंडळीही होती. आसमंतात ही स्थिती आणि भरीला जुन्या बंदिस्त सरकारवाड्याचे कोंझे वातावरण; त्यामुळे ते अगदी गुदमरून गेले असणार. म्हणूनच आपले वसतिस्थान मकरपुरा राजवाड्यात हालविण्याची जी पहिली संधी मिळाली, ती त्यांनी साधली.

याबरोबरच त्यांच्यासारख्या अल्पवयीन मुलाला आकर्षण वाटावे अशाही गोष्टी या बदलत्या जीवनात होत्या. पण आपण काही आपले धनी नाही, हा विचार त्यांच्या मनात सतत डोकावे. परंपरानिष्ठ अशा संस्थानी वातावरणाचे व समाजाचे ते रुळलेले असे सदस्य अद्यापतरी बनले नव्हते. नाना प्रकारच्या बाबतीत सल्ला देणारी वडीलधारी माणसे होती. त्यांचे दोन विवाह झाले व दोन्ही ठरवूनच झाले. पण निवडलेल्या वधूंसमवेत त्यांचा संसार समाधानाचा व आनंदाचा झाला. जेव्हा का त्यांना आपल्या मनाप्रमाणे वागण्याची मुभा मिळाली, तेव्हा मात्र आपल्या प्रगतीच्या आड येणाऱ्या परंपरा त्यांनी सरळसरळ धुडकावल्या.

प्रथम एकदा मुंबईस आणि एकदा दिल्लीला असे दोन ठिकाणी जावे लागून त्यांच्या बडोद्याच्या चाकोरीच्या ठरीव जीवनात खंड पडला. पूर्वी आपण ज्यांची नुसती नावेच ऐकून होतो, ती स्थळे आता आयुष्यात प्रत्यक्ष पाहावयास मिळत होती. या दौऱ्यांमुळे सयाजीरावांच्या ठायी नवी नवी स्थळे आणि नवे नवे लोक पाहण्याची दुर्दम्य आकांक्षा निर्माण झाली असली पाहिजे. राजशाही विद्यालयातील अनेक व्याख्याने व पाठ यांपेक्षा असे प्रवासच शिक्षणाचे अधिक चांगले साधन असल्याचा अनुभव

त्यांना येत गेला असणार. पुढे युरोपीय दौऱ्यांचा मोह अधिकाधिक वाढत गेला. दौरे घाईघाईने वरचेवर होत, त्यामुळे त्यांच्याबरोबर जाणाऱ्या व्यक्तींची संख्या मर्यादित होत गेली. स्वतःच्या मर्जीतले तीन-चार लोक बरोबर नेता येऊ लागल्यावर आपण आता स्वतंत्र, मुक्त झालो, असे त्यांना वाटले असावे. परदेशी दौऱ्यात महाराजपदाची राजवस्त्रे उतरवून ठेवून सामान्य माणसासारखे मनमोकळे हवे तसे वावरता येत असे आणि ही गोष्ट त्यांना विशेष प्रिय होती.

त्यांना आपल्या सूक्ष्म निरीक्षणातून एक गोष्ट ध्यानात आली असेल की, त्या काळी युरोपीय व्यक्तीला आणि त्यातल्या त्यात इंग्रज व्यक्तीला सर्वत्र विशेष, मान मिळतो. सर्वसाधारण हिंदी माणूस इंग्रजाला म्लेंच्छ समजत असला, तरी तो वरिष्ठ सत्ताधारी बनलेला होता. आपले इंग्रज शिक्षक एलियट आणि गव्हर्नर जनरलचे एजंट प्रारंभी सर रिचर्ड मीड व नंतर फिलिप्स सॅण्डस् मेलव्हिल हे अन्य व्यक्तींपेक्षा सयाजीरावांच्या मर्जीतले असावे. युरोपीय जीवनपद्धतीचे त्यांना खास आकर्षण होते. आणि ते अखेरपर्यंत टिकलेही. त्यांचे मराठी चरित्रलेखक गो. स. सरदेसाई यांना वाटे की, एलियटने महाराजांची जीवनदृष्टी जवळजवळ युरोपीय बनविली. सुरवातीला मात्र सरदेसायांचे मत तसे नव्हते. कदाचित सरदेसाई यांना असेही म्हणायचे असेल की, सयाजीराव हे सनातनी किंवा धर्मभोळे हिंदू राहिलेले नव्हते. युरोपचे असे वेड महाराजांना सदासर्वकाळ राहिलेच. वर उल्लेखिलेले इंग्रज तसेच अन्य व्यक्ती यांनी आपापल्या उदाहरणानेच त्यांच्या मनावर आणखी अनेक गुण बिंबवले असले पाहिजेत. त्यांचा कामाचा पद्धतशीरपणा, कर्तव्यनिष्ठा, नियमितपणा, वक्तशीरपणा, जिव्हाळा, निष्ठा, वात्सल्य, युक्तिवाद, अलिप्त वृत्ती, परिश्रमशीलता, देशभक्ती, आपल्या देशाच्या राजाविषयीचा उच्च अभिमान आणि शेवटी आपल्या राष्ट्रातील प्रातिनिधिक प्रशासनावर असणारा गाढ विश्वास - या सर्व इंग्रजांच्या गुणांविषयी त्यांनी वाचलेले असणार व शिवाय त्यांनी सेवक म्हणून नेमलेल्या लोकांत वा त्यांना भेटलेल्या व्यक्तींत असे गुण त्यांना प्रकर्षाने पाहावयास मिळाले असणार. त्यांच्यासारख्या तीव्र ग्रहणशक्ती असणाऱ्या व्यक्तीवर त्या गुणांचा खोल ठसा उमटलेला असला पाहिजे. आपल्या प्रदीर्घ जीवनात महाराजांना वेगळ्या 'नमुन्या 'चे इंग्रजही भेटले व त्यांना ते कधीच आवडले नाहीत. परंतु एकंदरीत इंग्रजांच्या संगतीतच त्यांना सुखसमाधान वाटे.

अभ्यासाच्या संबंधात आपली कितीही बांधीलकी असली, तरी काळाबरोबर टिकाव धरताना कुतरओढ होत आहे, या जाणीवेचे त्यांना कधीही विस्मरण झाले नाही. त्यांच्यासमोर ठाकलेले कार्य पार पाडण्याच्या संदर्भात ते सदैव सुसज्ज असत. आपल्या अज्ञान स्थितीचा फायदा घेतला जाऊ नये म्हणून 'शालेय' कर्तव्य संपताच ते अन्य बाबतींवरही खूप परिश्रम घेत. आपली बरीचशी कामे आपली आपणच उरकायची, या त्यांच्या सवयीचा त्यांना सर्व आयुष्यभर फायदाच झाला. 1908 साली त्यांचे एक

इंग्रज स्नेही रेव्हरंड एडवर्ड वीडन महाराजांसमवेत वर्षभर राहण्यासाठी आले होते. महाराजांबरोबरच्या आपल्या वास्तव्यासंबंधी वीडन यांनी लेखनही केले. 'ए इयर वुइथ दि गायकवाड ऑफ बरोडा' या त्यांच्या आठवणींच्या संग्रहात सयाजीरावांच्या बडोद्यातील जीवनाची बारकाईची माहिती मिळते. सयाजीरावांनी रोमच्या इतिहासाचा तसेच ग्रोटच्या ग्रीसच्या इतिहासाचा अभ्यास वीडनबरोबर केला. आपल्या या तुलनात्मक अभ्यासाची महाराजांनी खुलासेवार टिपणे काढली होती. पुढे ती टिपणे छापून 'फ्रॉम सीझर टू सुलतान' या ग्रंथरूपाने खाजगी प्रसारासाठी म्हणून प्रकाशित करण्यात आली. सयाजीरावांनी कामाला कधी सोडले नाही आणि कामाने सयाजीरावांना कधी सोडले नाही, असाच योग होता. पुढे जेव्हा कामापुढे रात्रीही अपुऱ्या ठरत तेव्हा त्यांच्याकडून वरचेवर उद्‌गार ऐकू येत, "मी जागा आहे. कारण माझ्यामागे कामाचा लकडा आहे."

सयाजीरावांना निसर्गतःच उत्तम स्मृतीचे वरदान लाभलेले होते. दैनंदिन कामातही या गोष्टीचा प्रत्यय येत असे. विशिष्ट प्रकरणी पूर्वी कोणते हुकूम सुटले होते, हे त्यांच्या सदैव लक्षात राहत असल्याने प्रशासकीय कामात त्यांना आपल्या स्मरणशक्तीचे चांगलेच साहाय्य होत असे. त्यांची जिज्ञासा तर दुर्दम्यच होती. बहुधा त्यांना जगाच्या पाठीवर सफरी करायला लावण्यामागे हीच प्रेरक-शक्ती असली पाहिजे. जे जे म्हणून पाहण्यालायक व महत्त्वाचे होते, ते ते त्यांनी क्वचितच चुकविले. वस्तुसंग्रहालये चित्रप्रदर्शने, वस्तुप्रदर्शने, नाट्यादी करमणुकीचे प्रयोग, ऐतिहासिक महत्त्वाच्या वास्तू वा स्थळे, निसर्गसौंदर्य, प्रयोगशाळा, प्रचंड उद्योगसमूह, विविध संस्था अशा सर्व गोष्टी त्यांनी जातीने पाहिल्या, अधाशी म्हणावे, असे ते एक वाचक होते आणि त्यांच्यापुढे आलेल्या कोणत्याही बाबीचा अभ्यास करण्यास त्यांनी कधी कंटाळा केला नाही. आणि जे जे म्हणून उपयुक्त असे त्यांना इतरत्र आढळले, ते ते आपल्या राज्यात अमलात आणायचा त्यांनी सतत विचार केला. प्रयोग करणे आणि नवनवे पायंडे पाडणे ही त्यांच्या शासनाची दोन वैशिष्ट्ये होती. त्यातूनच त्यांचे खरेखुरे व्यक्तिमत्त्व प्रतीत होते.

आपल्या अनुभवाच्या शाळेतून सयाजीरावांनी एक दुर्मिळ सद्‌गुण संपादन केला. तो म्हणजे मानवी प्रमादांविषयी सहानुभूती. आपले सामान्य मूळ आणि आपल्यातील उणीवा यांचे त्यांना भान असे आणि म्हणून माणसाच्या दोषांकडे ते समतोल वृत्तीने, समंजस बुद्धीने आणि सहानुभूतिपूर्वक पाहू शकत. राज्यकर्ता या नात्याने दोषी ठरलेल्यांना शिक्षा करण्याचे प्रसंग त्यांच्यावर आले, पण त्या शिक्षापात्र ठरलेल्या व्यक्तींविषयी त्यांनी मनात कधी आकस ठेवला नाही.

महाराजांचे राजकीय जीवन प्रदीर्घ, यशस्वी, मधून कधीतरी क्लेशदायक परंतु एकंदरीत सुखासीन गेले असले, तरी त्यांचे कौटुंबिक जीवन बरेच शोककारक होते. तरीही महाराजांनी ते साध्यानुकूल करून घेतले. कवळाणे येथील पहिल्या बारा वर्षांतील जीवनातल्या फारच थोड्या आठवणी पुढील आयुष्यात त्यांच्या स्मरणात राहिल्या.

त्याविषयी म्हणण्यासारखे आकर्षण नव्हतेच; थोडीफार भुरळ मात्र वाटे. दत्तकविधान होऊन राज्यसूत्रे हाती आल्यावर महाराज एक सर्वस्वी वेगळ्याच विश्वात वावरू लागले. असे सांगतात की, खुद्द महाराणी चिमणाबाईसुद्धा त्यांच्याकडे महाराज या दृष्टिकोनातून पाहत, अर्थात तीच गोष्ट मुलांची होती. मुलांच्या महाराजांकडून ज्या अपेक्षा होत्या, त्या ते कधीच पूर्ण करू शकले नाहीत. आपल्यावर ठेवल्या जाणाऱ्या सक्त देखरेखीबद्दल मुलेही नेहमी तक्रार करीत असत. महाराजांनी आपल्या मुलांकडून वाजवीहून अधिक अपेक्षा बाळगल्या होत्या आणि त्यातही वडील व मुले यांच्यात आत्मीयतेचा संवाद नसताना! सार्वभौम सत्तेकडून कोणत्याही स्वरूपात येणाऱ्या आदेशांचा व नियंत्रणांचा तिरस्कार करणारे महाराज खुद्द स्वतःच्या अपत्यांना हुकूमशहा वाटावेत, हे त्यांच्या वृत्तीवरील कुतूहलपूर्ण भाष्यच ठरावे. परंपरा मोडणारे महाराज आपल्या कन्येच्या वरसंशोधनाच्या बाबतीत मात्र परंपरेचे गुलाम व्हावेत, हेही चमत्कारिकच म्हटले पाहिजे. त्यांच्या पुत्रांनी त्यांचा आज्ञाभंग केला नसला, तरीपण त्यांच्या कन्येने मात्र त्यांना आज्ञाभंगाची पहिली चुणूक दाखविलीच.

काही म्हटले तरी, महाराजांचे घरगुती जीवन म्हणजे एक दुर्दैवांची मालिकाच होती. ते आधी दुःखी होतेच; पण एकामागून एक काळाचे फटके खाऊन ते अधिकाधिक दुःखी बनत गेले. हे आघात ते सहन करू शकले, कारण त्यांचे मनोबळ खंबीर असून त्यांच्या ठायी अलिप्तता बाणलेली होती.

सयाजीराव हे स्वतःही एक रुग्णाइतच होते. त्यांची प्रारंभीची दणकट तब्येत फार काळ टिकली नाही. तरीसुद्धा नियमित व्यायाम, मर्दानी खेळ व उत्तरायुष्यातील लांबवर पायी चालत जाण्याचा व्यायाम यांच्या बळावर त्यांनी आपल्यातला कार्योत्साह टिकवून धरला होता. आमवाताच्या अधूनमधून उद्‌भवणाऱ्या चेंगट दुखण्याविरुद्ध त्यांनी जो नेटाने लढा दिला तो या दुर्दम्य चैतन्यामुळेच. दत्तकविधान झाल्यानंतर आणि शिक्षण चालू होते अशा काळात ते आणि त्यांचे बंधू संपतराव यांना भरपूर मसाला घातलेले लोण्यातील मटण भोजनात देण्यात येई आणि ते त्याचा अगदी मनापासून आस्वाद घेत, पण टिकाऊ आरोग्यासाठी भाज्या अधिक खाल्ल्या असत्या, तर फायदेशीर झाले असते, असे एकदा महाराज म्हणाल्याचे सांगितले जाते.

देशी संस्थानचा राज्यकर्ता म्हणून कोणावरही विश्वास ठेवू नये, अशी शिकवण त्यांना देण्यात आलेली होती. देशी संस्थानांच्या प्रशासनाच्या पूर्वानुभवानुसार राजा सर टी. माधवरावांनी हा मुद्दा सयाजीरावांच्या मनावर वारंवार बिंबविला होता. खुद्द बडोद्याच्या पूर्वेतिहासात अशी अनेक उदाहरणे घडून आलेली होती की, सत्ताधाऱ्यांनी आपल्या मर्जीतल्या व्यक्तींवर फाजील विश्वास टाकावा आणि अशा घोडचुकीमुळे जबरदस्त किंमत मोजावी लागावी. यापासून सयाजीरावांनी महत्त्वाचा व पुरेपूर धडा घेतला होता. परिणामी त्यांना स्नेही म्हणावे असे फार थोडे होते आणि शत्रू तर त्याहूनही थोडे

होते. मात्र त्यांना माणसांची पारख उत्तम होती आणि कोणत्याही योग्य कार्यासाठी योग्य माणूस हुडकून नेमण्याची ते व्यवस्था करीत असत. उदार दृष्टी आणि उत्तम कार्यक्षमतेसाठी पारितोषिक देऊन चीज करण्याचे धोरण यामुळेच त्यांना हे शक्य झाले.

'सिलेक्टेड लेटर्स' (निवडक पत्रे) या ग्रंथावर नजर टाकली, तरी आपल्या इंग्रज मित्रांशी त्यांचा मोठ्या प्रमाणावर पत्रव्यवहार चालत असे, असे आढळेल. एलियट आणि नेव्हिन्स यांच्यासारखे माजी सहकारी, सर जॉन वॉटसन आणि कर्नल एम. जे. मीड यांच्यासारखे माजी रेसिडेंट, लॉर्ड लॅमिंग्टन आणि लॉर्ड रे यांच्यासारखे माजी गव्हर्नर, जनरल बर्डवूड आणि सर जॉन पुलेस्टन यांच्यासारखे ब्रिटिश अधिकारी, तसेच आपल्या हिंदी मित्रांपैकी दादाभाई नौरोजी, करसपजी दादाचंदजी यांच्यासारखे माजी दिवाण, तशाच इतर अनेकानेक व्यक्ती यांच्याशी महाराजांचा पत्रव्यवहार होता.

समाजात मिसळण्याची वृत्ती आणि विनोदबुद्धी हे महाराजांचे नजरेत भरणारे खास पैलू होते. जात्या ते भिडस्त असल्याने तर त्यांच्या या पैलूंची विशेष अपूर्वाई वाटते. बडोद्यात क्लबपद्धतीचा जीवनक्रम सुरू करण्यास त्यांनी प्रोत्साहन दिले. त्यांच्या या क्षेत्रातील आस्थेचे उदाहरण म्हणजे सयाजी विहारक्लब. या क्लबला त्यांनी उदार आश्रय दिला. सामाजिक गाठीभेटी घडून येण्याची जुनी स्थळे आणि निमित्ते झपाट्याने नष्ट होत असताना, त्यांच्या जागा नव्यांनी घ्यायला हव्यात, असे त्यांना मनोमन वाटे. सर टी. माधवरावांच्या काळापासून राज्यातील बडे बडे अधिकारी आणि खात्यांचे प्रमुख यांनी एकत्र जमण्याचे एक हमखास संकेतस्थळ होते. तेथे ही मंडळी मनमोकळ्या गप्पाष्टका करण्यासाठी जमत. नंतर डॉ. बटुकराम आणि संपतराव यांनी नियमित सदस्यत्व असणाऱ्या एका क्लबची स्थापना केली. त्यासाठी महाराजांनी जागा उपलब्ध करून दिली व त्यालाच पुढे 'सयाजी विहारक्लब' हे नाव देण्यात आले. 10 एप्रिल 1899 रोजी महाराजांच्याच हस्ते त्याचे औपचारिक उद्‌घाटन झाले. त्या उद्‌घाटनाच्या भाषणात महाराजांनी आपले युरोपातील गमतीचे अनुभव खुमासदारपणे सांगितले. फेब्रुवारी 1926 मध्ये क्लबमध्ये स्त्रियांनाही प्रवेश देण्याचे ठरले. तत्कालीन सामाजिक स्थितीत ती एक खरोखर क्रांतीच समजली गेली.

गेल्या पन्नास वर्षांच्या कालावधीत हिंदुस्थानच्या मानचित्रात अत्यंत प्रगतीशील असे संस्थान म्हणून बडोद्याला एक खास स्थान प्राप्त झालेले आहे. अनेक बाबतींत त्याला महत्व दिले जाते. भव्य राजप्रासाद आणि सुंदर सुंदर इमारती तेथे आहेत. त्यांचे दरबार समारंभ थाटामाटाचे व भपकेबाज असत. दसरा आणि ईद या सणांच्या निमित्ताने 'स्वाऱ्या' निघत, त्या म्हणजे मोठे आनंदोत्सवच असत आणि ते पाहण्यासाठी सभोवतालच्या प्रदेशातील लोक मोठ्या संख्येने गर्दी करीत. विश्वकुटुंबी वृत्तीच्या लोकवस्तीमुळे बडोद्यावर एक खास वेगळाच शिक्का होता. महनीय व्यक्तींकडून अधून मधून दिल्या जाणाऱ्या भेटी, विद्वानांची आणि प्रतिष्ठित लोकांची संस्मरणीय व्याख्याने,

राष्ट्रीय पातळीवरील अखिल भारतीय सभापरिषदा, उद्याने, वस्तुसंग्रहालये, प्राणिसंग्रहालय, नगरातील एकूण स्वच्छता व आरोग्यदायी हवामान - अशा एकूण सर्व गोष्टींमुळे बडोद्याची कीर्ती सर्वत्र पसरली होती, पण या सर्वांमागील प्रेरक चैतन्यशक्ती स्वतः महाराजच असत; मग तेथे भरलेले एखादे पुष्पप्रदर्शन असो वा आलेल्या शाही पाहुण्याच्या सन्मानार्थ मेजवानी असो.

महाराजांवर, एक जन्मजात राज्यकर्ता म्हणून परमेश्वरी वरदहस्तच होता. आपले उपकारकर्ते आणि प्रजानन यांचे स्मरण ठेवून त्यांच्या अपेक्षा पूर्ण करण्यासाठी त्यांनी आयुष्यभर प्रयत्न केला. आपल्या हाती सोपविलेले राज्य म्हणजे एक विश्वस्त निधीच होय, असे ते मानीत. आपल्या जबाबदाऱ्यांचे त्यांना भान असे आणि लोकांना सतत आपल्याविषयी विश्वास वाटावा, असा त्यांचा प्रयत्न असे. आपल्या प्रजेचा नेता म्हणून त्यांना जनसमुदायाला प्रेरणा द्यावी लागे, लोकांचा विश्वास संपादन करावा लागे आणि सुसंस्कृत, सुखी आणि संपन्न समाजाच्या ध्येयसृष्टीकडे आपल्या जनतेची वाटचाल घडवून आणावी लागे. एका स्वकीय संस्थानचा राजा या नात्याने हे सारे साधण्यास त्यांना चांगली अनुकूलता लाभली होती.

कामकाजाच्या निमित्ताने किंवा सहज मौजेची सफर म्हणून त्यांच्या राजवटीपूर्वी व नंतर बडोद्याला भेट दिलेल्या लोकांनी नोंदलेली माहिती किंवा लिहिलेले वृत्तांत पाहिल्यास महाराजांनी बडोदा संस्थानचा चेहरामोहरा कसा उज्ज्वल करून टाकला होता, ते स्पष्ट होते. सयाजीरावांचे दत्तकविधान होण्यापूर्वी बडोद्याची सामाजिक, आर्थिक व राजकीय परिस्थिती किती शोचनीय होती, ते सर रिचर्ड मीड यांच्या नेतृत्वाखालील आयोगाने विस्तृतपणे नमूद करून ठेवले आहे. त्यानंतर मात्र तिसऱ्या सयाजीरावांच्या त्रेसष्ट वर्षांच्या कारकीर्दीचे एक नवे युगच अवतरले ! सुदैवाने मीड व मेलव्हिल यांच्या सहकार्याने राजा सर टी. माधवराव यांनी लोककल्याणकारी प्रशासनाचा भक्कम पाया आधी घालून ठेवला होता. त्यावरच पुढे सयाजीरावांना व्यापविस्ताराचा इमला उभारावयाचा होता. त्यांनी हे कार्य ज्या पद्धतीने केले, ती पद्धती त्यांच्या काही दिवाणांना व रेसिडेंटना रुचली नव्हती; पण आपण काय करीत आहो, यांची महाराजांना मात्र चांगली जाणीव असे. आपल्या राजवटीच्या प्रारंभीच यापुढे आपल्या संस्थानाचे स्वामी आपले आपणच राहावयाचे, असा निर्णय त्यांनी ठामपणे घेतला होता. आपल्या पाल्याचा स्वतःच कारभार हाकण्याचा आता निश्चयच झालेला दिसतो, हे ध्यानात येताच चतुर माधवराव योग्य वेळीच आपल्या पदावरून आपण होऊन दूर झाले. लवकरच जमाना असा आला की, दिवाणांनी राजाची निवड करण्याऐवजी महाराज स्वतःच दिवाणांची निवड करू लागले. तदनंतरच्या काळात हरेक क्षेत्रात सुधारणांचा योजनाबद्ध कार्यक्रम अमलात येऊ लागला. प्रत्येक खेड्यात वा शहरात सुधारलेल्या कारभारासाठी शाळा, ग्रंथालय, पाणीपुरवठा- योजना, रुग्णालय आणि ग्रामपंचायत अशा पाच बाबी अवश्यमेव

असल्या पाहिजेत, असा त्यांचा कटाक्ष असे. पुढील आकडेवारीवरून हा मुद्दा अधिक स्पष्ट व्हावा : -

| | **सन 1881 मधील संख्या** | **सन 1939 मधील संख्या** |
|---|---|---|
| 1. इंग्रजी शाळा | 13 | 128 |
| 2. मातृभाषेच्या शाळा | 204 | 2414 |
| 3. ग्रंथालये | 1 | 1504 |
| 4. सहकारी-संस्था (पतपेढ्या) | संपूर्ण अभाव | 1125 |
| 5. ग्रामपंचायती | संपूर्ण अभाव | 2104 |
| 6. नगरपालिका | कसब्यात 26 | 41 |
| 7. लोहमार्ग (रेल्वे) मैल | 60 | 723 |

आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे सर्वसाधारणपणे सुस्तपणा आणि उधळपट्टी यांविषयी सर्वत्र प्रसिद्धी असणाऱ्या सार्वजनिक बांधकाम खात्याने कित्येक जोड-रस्ते, नाले-मोऱ्या, पूल, व पाटबंधारे यांची बांधकामे जारीने केली. समाजाच्या सर्वांगीण उन्नतीच्या या कार्यक्रमाचा परिणाम म्हणजे इतरत्र 'मागासलेला' (बडोद्याच्या लोकसंख्येत हा जवळजवळ 38 टक्के होता) आणि 'पुढारलेला' समाज या दोहोंत जेवढी विषमता आढळून येई,तेवढी ती बडोदा राज्यात नव्हती. शिक्षणाला मिळालेल्या जोरदार चालनेमुळे मागास वर्ग आणि समाजातील इतर वर्ग यांत लक्षणीय तफावत आढळून येत नसे. संस्थानातील साक्षरतेचे सरसकट प्रमाण 26.7 टक्के होते; तर अगदी अंत्यजांमधीलसुद्धा प्रमाण येथे 16.9 टक्केपर्यंत होते. मुस्लिमांत 30.2 टक्के तर हिंदूंत 25.5 टक्के साक्षरता होती. भिन्न भिन्न समाजांमध्ये डोळ्यांत खुपण्यासारखी विषमता नसणे या उघड जाणवणाऱ्या घटकामुळे राज्यातील विविध समाजांचे संबंध मैत्रीचे राहिले. सयाजीरावांना सामाजिक न्यायाविषयी कमालीची कळकळ होती आणि पूर्वग्रह व असहिष्णुता यांबद्दल कमालीची घृणा होती. जातीची जुलूमजबरदस्ती, अस्पृश्यतेची प्रथा आणि अन्य अनिष्ट रूढी यांवर त्यांनी जी भाषणे केलेली आहेत. त्यावरून हे स्पष्ट होते. या रूढींविरुद्ध जणू ते वर्षानुवर्षे लढा देत होते. आपल्या हीरकमहोत्साच्या प्रसंगी प्रजाजनांना दिलेल्या संदेशात त्यांनी म्हटले होते, "अस्पृश्यतेविषयी संयम पाळून बोलणे अशक्य आहे. मानवी समानतेच्या व्यापक दृष्टीकोनातून ज्यांना आपले बंधू आणि भगिनी मानले पाहिजे, त्यांच्यावर आपण हा अनैसर्गिक कलंकच लादलेला आहे. मी आणि माझे प्रशासन माणसामाणसात कसलाही भेद करीत नसतो. आपल्या या सर्व लक्षावधी बांधवांना स्वाभिमान आणि सुधारणेची आशाआकांक्षा यांपासून पूर्णपणे वंचित

ठेवणाऱ्या वरिष्ठ वर्गाचा नैतिकदृष्ट्या अधःपात होणे अपरिहार्यच आहे." हे शब्द म्हणजे नुसती पोकळ वल्गना नव्हती. त्या महोत्सवानिमित्त निर्माण केलेल्या एक कोटी रुपयांच्या निधीचा विनियोग होत असताना मागासवर्गाकडे खास लक्ष पुरविण्यात यावे असा आदेशही महाराजांनी दिलेला होता.

हे सारे साध्य करण्यासाठी केवळ सरकारी खातीच परिश्रम करीत होती. असे नाही; खुद्द राज्यकर्ता त्याहूनही अधिक परिश्रमपूर्वक झटत होता. 1882-83 ते 1921-22 या चाळीस वर्षाच्या कालावधीत एकूण 13810 हुजूर-हुकूम काढले गेले असावेत, असा अंदाज व्यक्त केलेला आहे. वर्षातील एकूण दिवसांपैकी प्रत्यक्ष कामकाजाचे म्हणून 345 दिवस होते. असे मानल्यास दररोज एक हुजूर हुकूम निघत होता, असा हिशेब होतो. यांपैकी 10,372 हुकूम खुद्द सयाजीरावांनी काढलेले होते. उरलेले हुकूम चिमणाबाई, खाजगी कारभारी, दिवाणसाहेब किंवा सल्लागार मंडळाने काढलेले होते.

दादाभाई नौरोजी किंवा माधवराव यांनी आणलेली माणसे एकतर सेवानिवृत्त तरी झाली होती किंवा संस्थानी नोकरी सोडून तरी गेली होती. अर्थात त्यानंतरच्या काळात आपली माणसे महाराजांना स्वतःलाच निवडावी लागली आणि खरोखरच या निवडीच्या बाबतीत महाराजांची कल्पकता आणि शहाणपणा दिसून आला. दिवाणपदी श्री. धामणसकर, तर सल्लागार मंडळाचे सदस्य म्हणून जयसिंगराव आंग्रे, यशवंत वासुदेव आठल्ये आणि विनायकराव पंडित या मंडळींची निवड खुद्द महाराजांनी केलेली होती. संस्थानच्या हिशेबाच्या व्यवस्थेत सुधारणा करण्याच्या दृष्टीने त्यांनी रजनीनाथ रॉय यांची खास नेमणूक केली. अंबालाल साकरलाल देसाई आणि वासुदेव गोपाळ भांडारकर यांचे न्याययंत्रणा नीट गतिमान करण्यात विशेष साहाय्य झाले. श्रीनिवास राघव अय्यंगार, रोमेश चंद्र दत्त आणि बिहारीलाल गुप्ता हे त्यांचे दिवाण, उत्तम प्रशासक तर होतेच, पण पट्टीचे विद्वानही होते. बडोद्याला या लोकांच्या दीर्घ अनुभवाचा फायदा मिळाला. सी.एन. सेडन आणि टेकचंद दिवाण यांच्यासारख्या ब्रिटिश भारतात सनदी नोकरीत असणाऱ्या अधिकाऱ्यांनी बडोदे प्रशासनाचा कारभार करताना ब्रिटिश सरकारकडील नोकरीतील आपल्या समृद्ध अनुभवाचा उत्तम उपयोग केला. टेट, लिट्लडेल आणि क्लार्क यांसारख्या इंग्रज गृहस्थांनी उच्च शिक्षणाच्या क्षेत्रात चांगलीच कामगिरी बजावली. ए.जी. ॲलन यांनी शेतकीसुधारणेचा कार्यक्रम अमलात आणला. असे कित्येक गुणी, बुद्धिमान परदेशी लोक इतर खात्यांतूनही होते. हे धोरण एक प्रकारे शहाणपणाचेच होते. दिवाणपदी माणूस नेमताना प्रायः गुजराती व महाराष्ट्रीय या संस्थानातल्या दोन प्रमुख समाजांतील व्यक्ती न निवडता बाहेरची माणसे आणण्यात समाजातील भिन्न भिन्न गटांचा नीट समतोल राखण्याचा महाराजांचा विवेकी दृष्टीकोनच आढळून येतो.

राज्यकर्ता या नात्याने योग्य जागी योग्य माणसाची निवड करण्यात महाराजांनी

सूज्ञता दाखविली, एवढेच नव्हे तर नेमलेला हुद्देदार जेष्ठ वा कनिष्ठ असो, त्यांनी त्याला समानतेने वागवले. काही खास लायक व्यक्तींना शक्य तितक्या खात्यांतून फिरवून सर्व तऱ्हेच्या कामाचा अनुभव घ्यायला द्यावयाचा, असे त्यांचे एक धोरण असे. दिवाण श्री. मनुभाई मेहता हे अशा धोरणाचे एक नमुनेदार उदाहरण होय. कॉलेजातील प्राध्यापक म्हणून त्यांनी काम सुरू केले, व नंतर क्रमाक्रमाने हुजूर कामदार, सुभा, न्यायमंत्री, नायब दिवाण, खाजगी कारभारी, अमात्य आणि तत्सम विविध पदांवर त्यांनी काम केलेले होते. दिवाण झाले, तेव्हा जवळजवळ सर्व खात्यांतील कार्यानुभव त्यांच्या गाठीला होता. आणखी एक उदाहरण बडोदा गॅझेटियरकर्ते रावबहादुर गोविंदभाई एच्. देसाई यांचे देता येईल. आपल्या चाळीस वर्षांच्या नोकरीत ते साध्या कारकुनापासून तो थेट नायब दिवाणपदापर्यंत चढत गेले. दरम्यान अनेक खात्यांतून त्यांनी काम केलेले होते. जनगणना-आयुक्त एस्. व्ही. मुकर्जी हे असेच आणखी एक उदाहरण होय. अशी कितीतरी उदाहरणे सहज सांगता येतील. थोडक्यात म्हणजे कोणत्याही व्यक्तीच्या शक्तिसामर्थ्याचा सर्वोत्तम उपयोग महाराजांनी करून घेतला आणि कोणाच्याही हातून घडलेल्या चांगल्या कार्याचा परामर्शही तेवढ्याच औदार्याने घेतला. सयाजीरावांनी राजरत्न, राजमित्र, राजधुरंधर इत्यादी किताब निर्माण केले होते. पण किताबती बहाल करून गौरव करण्याचा त्यांचा हा उत्साह कधी कधी उतू गेल्याचेही दिसते. उदा. गादीचे भावी वारस प्रतापसिंहराव यांना 'विक्रमादित्य' अशी पदवी देऊन त्यांचा केलेला सन्मान !

सयाजीरावांच्या राजवटीचा एक शेवटचा पैलूही नोंदविणे आवश्यक आहे. जेव्हा जेव्हा म्हणून ते राजधानीत असत, तेव्हा तेव्हा ते जिल्ह्यातून दौरे आखीत असत. 1881 ते 1921 या कालावधीत त्यांनी आपल्या राज्यातून पस्तीस वेळा दौरे केले. त्या वेळी बडोद्याच्या प्रदेशातून अशीही एक अफवा प्रचलित असे की, अवतीभवती काय चाललेले आहे, याचा तपास घेण्यासाठी महाराज गुप्त वेषाने शहरात फिरत असतात. महाराजांच्या जिल्हा पातळीवरील दौऱ्यात मध्येच थांबवून लोक महाराजांची गाठभेट घेऊ शकत व महाराज त्यांची गाऱ्हाणी ऐकून त्यांच्या निवारणासाठी तात्काळ जरूर ते आदेशही देत असत. न्यायाविषयी मनोमन आस्था आणि सर्वांना समान संधी वा वागणूक देण्याबद्दल त्यांची विशेष ख्याती होती. त्यांच्या खास आस्थेवाईकपणाचा लाभ समाजातील सर्वात दुर्बल घटकाला अधिक मिळत असे. कित्येक स्त्रियाही त्यांच्या आत्यंतिक प्रेमादरास पात्र ठरल्या.

राज्यकर्ता या नात्याने आपले जे स्थान आहे, त्याचा सयाजीराव विशेष गांभीर्याने विचार करीत. आपल्या प्रतिष्ठेला किंवा इज्जतीला ते खूपच जपत. 8164 चौरस मैल क्षेत्रफळ व्यापणाऱ्या आणि 24,43,007 एवढी लोकसंख्या असलेल्या एका मोठ्या

प्रथम श्रेणीच्या देशी संस्थानाचे ते अधिपती होते. आपले हे स्थान टिकविण्याप्रीत्यर्थ त्यांना सार्वभौम सत्तेबरोबर अखंड लढा द्यावा लागला.

सयाजीराव म्हणजे परस्परविरोधी गोष्टींचे एक आश्चर्यकारक असे मिश्रण होते. त्यांचे व्यक्तिमत्व दुभंगलेले होते. महाराज हा इतिहासातील एक योगायोगच होता आणि त्यांची प्रदीर्घ राजवट ही सुद्धा अशी एक घटना होती की, बडोद्याच्या वा गुजरातच्याच नव्हे; तर भारताच्याही इतिहासात तिला चिरंतन स्थान मिळाले पाहिजे.

Lasertypeset at Fine Impressions, New Delhi-110 026 and printed at Tarang Printers, Delhi-110 092.